# कमान्य टिळक आणि राजर्षी शाहू

## एक मूल्यमापन











धनंजय कीर

# लोकमान्य टिळक राजर्षी शाहू महाराज

## एक मूल्यमापन



धनंजय कीर







श्रीगजानन बुक डेपो प्रकाशन, मुंबई २८

लेखकाचे इतर ग्रंथ :

1 Veer Savarkar ( Second edition )
2 Dr. Ambedkar : Life And Mission ( Third edition )
3 Lokamanya Tilak : Father of the Indian Freedom Struggle ( Second edition )
4 Mahatma Phooley : Father of our Social Revolution ( Second edition will be shortly out )
५ डॉ. बाबासाहेब आंबेडकर.
६ महात्मा फुले : आमच्या समाजक्रांतीचे जनक.
७ महात्मा फुले : समग्र वाङ्मय ( डॉ. स. गं. मालशे ह्यांच्या सहकार्याने संपादन )
८ महात्मा फुलेकृत 'शेतकऱ्याचा असूड' ( डॉ. स. गं. मालशे ह्यांच्या सहकार्याने संपादन )

किंमत ९ रुपये



पहिली आवृत्ती १ ऑगस्ट १९७१ । १८९२

प्रकाशक :
आर. व्ही. रघुवंशी
श्रीगजानन बुक डेपो
भवानीशंकर रोड,
कबुतरखाना
दादर, मुंबई २८

मुद्रक :
य. गो. जोशी
आनंद मुद्रणालय
१५२३ सदाशिव, पुणे ३०

ती. भिकाजी तात्या कनगुटकर

आणि

ती. सौ. सुभद्राबाओी कनगुटकर

यांना

## अनुक्रम

# प्रस्तावना

लोकमान्य टिळक आणि राजर्षी शाहू महाराज ह्यांच्या जीवनकार्यावर मी जी व्याख्याने शिवाजी विद्यापीठाच्या विद्यमाने श्रोतृसमुदायापुढे वाचली, ती आता ग्रंथरूपाने प्रसिद्ध होत आहेत. वेळेच्या अभावी घाईत लिहिलेल्या त्या व्याख्यानांत आता मी आवश्यक तेथे सुधारणा करून काही भरही टाकली आहे. टिळक आणि शाहू ह्यांचे कार्य नि विचारप्रणाली यांच्या मूल्यमापनाचा हा अल्पसा प्रयत्न आहे.

हा ग्रंथ त्या कालखंडातील महाराष्ट्राचा छोटासा इतिहास आहे. आणि इतिहास म्हणजे त्या त्या कालखंडातील त्या त्या लोकांच्या सामाजिक, सांस्कृतिक, धार्मिक, राजकीय नि आर्थिक विचारांचे, आशा आकांक्षांचे, घडामोडींचे नि स्थितीचे प्रतिबिंब असते. त्या घटनांचे, घडामोडींचे नि विचारप्रवाहांचे ते एक प्रकारचे आविष्करण, पृथक्करण नि विवेचन म्हणजे अर्थनिरूपणही असते. कोणतेही राष्ट्र आपला इतिहास बाजूला ठेवून उभे राहू शकत नाही. इतिहास हे मानवी समाजाचे एक अखंड, अभंग नि अविभाज्य असे छायाचित्रच होय.

काय घडले नि कसे घडले हे इतिहास निवेदन करतो. टिळक नि शाहू ह्या दोन महान व अलौकिक व्यक्तींच्या कालखंडात कोणते विचार प्रमुख होते, कोणत्या प्रेरणा समाजास स्फुरवीत होत्या, कोणत्या घटना घडल्या व त्यांची कारणे कोणती ह्यांचे दर्शन घडते. वाचकांनी याचा शांतपणे व निर्विकार मनाने विचार करावा. जुनी भांडणे, तंटे नि वैरे पुढे चालविण्यासाठी इतिहासाचा अभ्यास करावयाचा नसतो. त्या कालखंडातील विचारप्रवाहाला का व कशी कलाटणी मिळाली याचा विचार करावयाचा असतो. त्या विचारप्रवाहातून नि प्रेरणांतून स्वातंत्र्य, मानवी समानता नि बंधुता ह्यांवर अधिष्ठित अशी समाजरचना करण्याचा सुविचार निर्माण झाला आहे. त्या तत्त्वप्रणालीचा धिक्कार करून भेदाभेदावर अधिष्ठित अशी समाजरचना ठेवू पाहणे हा कुविचार ठरला आहे.

अलीकडे समाजसुधारणेच्या प्रश्नासंबंधी आणि इतिहासासंबंधी चरित्ररूपाने वा प्रबंधरूपाने नवीन माहिती उपलब्ध होत आहे. ती वाचून आणि त्यावर मनन करून समाजक्रांतीचा वास्तव इतिहास लिहिला पाहिजे. ते कार्य करीत असता समाजसुधारकांचा वा समाजक्रांतिकारकांचा यथार्थ गौरव करावा; पण सामाजिक

सुधारणेच्या विरोधकांचा किंवा प्रतिगाम्यांचा उल्लेख :निंदाप्रचुर व अतिरंजित भाषेत करण्याचा मोह आवरावा हे उचित होय.

परंतु जसजशी समाजसुधारकांची चरित्रे प्रसिद्ध होऊ लागली तसतसे त्या कालखंडातील विचारांचे, घटनांचे नि कृतींचे फिरून मूल्यमापन होऊ लागले आहे. ते मूल्यमापन पाहून ज्या व्यक्तींना टिळकांच्या सामाजिक विचारांची नि कृतींची खंत वाटते, त्या व्यक्ती, टिळक फार तर सनातनी होते असे म्हणता येईल, ते प्रतिगामी होते असे म्हणता येणार नाही, असे आता समर्थन करीत आहेत.

एका टिळकभक्ताने तर निदान वेदोक्तासंबंधीच्या टिळकांच्या भूमिकेला संशयाचा फायदा मिळावा म्हणून एक नवीन युक्तिवाद पुढे आणला आहे. वेदोक्तासंबंधी लिहिलेले अग्रलेख हे मुळी टिळकांचेच कशावरून? असा त्यांनी संशय प्रकट केला आहे. हा भारतातील एका तेजस्वी आणि महान संपादकावर घोर अन्याय आहे. वेदोक्तप्रकरणावरील अग्रलेख टिळकांनी लिहिले असे टिळकांचे सहकारी संपादक आणि टिळकचरित्रकार साहित्य-सम्राट केळकर यांनी टिळक चरित्रात म्हटले आहे. टिळकांचे अग्रलेख सतत लिहून घेणारे लेखनिक आप्पाजी विष्णु कुलकर्णी ह्यांच्या ' लो. टिळक ह्यांचीं गेलीं आठ वर्षें ' ह्या ग्रंथावरून तीच गोष्ट सिद्ध होते. शिवाय ' लो. टिळकांचे केसरींतील लेख भाग ४ था ' ह्यात ते लेख प्रसिद्ध करण्यात आले आहेत. यास्तव ते लेख टिळकांचेच आहेत, ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आणि सत्य आहे. तरी सुद्धा ' लो. टिळकांचे केसरींतील लेख भाग १ ला ' ह्यातील प्रस्तावनेत सावधगिरी म्हणून केळकरांनी अशा शंकेखोरांना सांगून ठेविले आहे की " जे लेख टिळकांनी संपादकीय म्हणून स्वीकारले ते एका अर्थाने त्यांचेच झाले ! "

लो. टिळकांचे जीवितकार्य होते राजकीय महापुरुषाचे. त्यांची प्रेरणा राजकीय होती. राजर्षी शाहू महाराजांचे जीवनकार्य होते सामाजिक महापुरुषाचे. त्यांची प्रेरणा सामाजिक होती. टिळकांचे जीवन ही एक राजकीय स्वातंत्र्याची गीता आहे, तर शाहूंचे जीवन ही एक नव्या जगाची, नव्या समाजरचनेची, सामाजिक न्यायाची व मानवी विकासाची गाथा आहे. टिळकांची सामाजिक भूमिका ही त्यांनी राजकीय गरजा लक्षात घेऊन घेतली होती, हे म्हणणे यथार्थ वाटत नाही. त्यांना सामाजिक शिक्षण आणि साजिक समीक्षण ' तूर्त ' नको होते, हेही समर्थन लंगडे पडते. त्यांनी समाज-सुधारणेस नि सामाजिक समीक्षणास प्रत्यक्ष कडवा नि विध्वंसक विरोध केला, हेच सत्य आहे. त्यांनी सामाजिक सुधारणेवर

म्हणजे सामाजिक समतेवर व सामाजिक न्यायावर भर दिला नाही म्हणून त्यांची शक्ती काही दुणावली नाही. उलट ती उणावली.

खऱ्या देशभक्तीचे स्वरूप प्रामुख्याने सामाजिकच असले पाहिजे हे आपण विसरून चालणार नाही.

स्वतंत्र भारताच्या राजकीय स्वातंत्र्याचे संरक्षण करणे, सरकारी अधिकारी आपली कामे कशी बजावतात हे करड्या नजरेने, बेडर वृत्तीने नि निःपक्षपात बुद्धीने पाहाणे म्हणजे टिळकांचा प्रताप आठवणे होय. कडवे, त्यागी नि तेजस्वी कार्यकर्ते तयार करणे आणि नव्या पिढीत ज्ञान नि सामर्थ्य ह्यांची आवड निर्माण करणे म्हणजेच लो. टिळकांचे स्मरण करणे होय. Down with Pauperism, Inequality, Untouchability and Illiteracy ' ' गरिबी, असमानता, अस्पृश्यता आणि निरक्षरता हटाव ' ही घोषणा महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यात घुमविणे म्हणजेच राजर्षी शाहूंचे स्मरण करणे होय.

'ह्या ग्रंथाचे श्रेय शिवाजी विद्यापीठाचे कर्तृत्वसंपन्न नि लोकप्रिय कुलगुरू डॉ. आप्पासाहेब पवार ह्यांना आहे. त्यांनी आपल्या प्रेमळ नि उत्कट आग्रहामुळे ती व्याख्याने मजकडून करवून घेतली. आता ती ग्रंथरूपाने प्रसिद्ध करण्यास शिवाजी विद्यापीठाने मला संमती दिली. ह्याविषयी डॉ. आप्पासाहेब पवार आणि शिवाजी विद्यापीठ ह्यांचा मी ऋणी आहे.

श्री. रमेश रघुवंशी यांना प्रकाशन व्यवसायात भाग घेऊन काही समाज-शिक्षणाचे कार्य करावेसे वाटते. त्यांनी माझा हा ग्रंथ मोठ्या उत्साहाने प्रकाशनासाठी घेतला. त्यांच्या ध्येयाला चालना मिळावी म्हणून त्यांना सहकार्य दिले. त्यांना मी यश चिंतितो.

राजर्षी शाहू महाराज यांच्यासंबंधी माहिती गोळा करीत असता, ज्या व्यक्तींनी मला काही महत्त्वाची साधने पुरविली, त्यांपैकी चरित्रकार नि कोशकार श्री. गं. दे. खानोलकर, महाराष्ट्राचे जेष्ठ, जाणते व समतावादी नेते माधवरावजी बागल आणि कागलचे डॉ. डी. ए. घाटगे, संपादक ' करवीर ' यांचे मी मनःपूर्वक आभार मानतो. इतरांचा मी आभारी आहेच. आनंद मुद्रणालयाचे चालक नि कामगार यांचेही मी आभार मानतो.

भागेश्वर भुवन<br>
दिलीप गुप्ते रस्ता, मुंबई १६<br>
दि. १४ जुलै १९७१

**धनंजय कीर**



स्वातंत्र्य संग्रामाचे जनक
लोकमान्य टिळक





# राष्ट्रसंजीवक नेता

. १ .

राष्ट्र गुलामगिरीत खितपत पडले असता त्याला राष्ट्रसंजीवक मंत्र देऊन, त्याच्यात नवीन चैतन्य निर्माण करणारे लोकमान्य टिळक ह्यांचे आधुनिक भारताच्या इतिहासात अनन्यसाधारण असे स्थान आहे, हे विचारवंतांना आणि इतिहासकारांना मान्यच करावे लागेल. टिळक हे सर्वसामान्य नेते किंवा सामान्य राजकारणी पुरुष नव्हते. प्रत्येक पिढीत नेते वा राजकारणी पुरुष अनेक असतात. परंतु ज्याला खऱ्या अर्थाने महापुरुष असे संबोधिता येईल असा टिळकांसारखा क्वचितच एखाददुसरा पुरुष आढळत असतो.

महापुरुष दोन प्रकारचे असतात. पहिल्या प्रकारचा महापुरुष हा राष्ट्रावर गुलामगिरीचे संकट ओढवले असता त्याच्यात स्वाभिमान, स्वातंत्र्येच्छा व विजिगीषू प्रवृत्ती ही चेतवून, त्यातील जनतेत स्वदेशाभिमान व राष्ट्राभिमान जागृत करीत असतो. जनतेला स्वातंत्र्याचा मंत्र देऊन स्वराज्यासाठी लढावयास प्रखर प्रेरणा देत असतो. दुसऱ्या प्रकारचा महापुरुष समाजातील जुन्या चालीरीती, जुनी समाजरचना, जुनी मूल्ये बदलून, समाजातील अन्याय दूर करण्याचे प्रयत्न करीत असतो. न्याय्य नि उदार अशा तत्त्वांच्या पायावर नवसमाजाची उभारणी करून, सर्वांना समतेचे, बंधुत्वाचे व स्वातंत्र्याचे हक्क प्राप्त करून देण्याचा तो प्रयत्न करीत असतो. टिळक हे पहिल्या प्रकारचे महापुरुष होत.

गेल्या तीनशे वर्षांत, राष्ट्रावर गुलामगिरीचे संकट ओढवले असता, जनतेस स्वातंत्र्याचा आणि स्वराज्याचा मंत्र देणारे व त्याच्या सिद्धीकरिता तिला सज्ज करणारे दोन महापुरुष होऊन गेले. पहिले छत्रपती शिवाजी महाराज, दुसरे लोकमान्य टिळक.

ब्रिटिश राजवट १८१८ साली महाराष्ट्रात सुरू झाली. अंतस्थ कलहामुळे पोखरलेले मराठ्यांचे हिंदवी स्वराज्य नालायक नि अदूरदृष्टीच्या राज्यकर्त्यांच्या

स्वार्थांधतेमुळे कोलमडून पडले. कालानुरूप सामर्थ्याची साधने संशोधून त्यांचा अवलंब न केल्यामुळे त्या राज्याचा महत्त्वाकांक्षी, धूर्त, पाताळयंत्री ब्रिटिश मुत्सद्यांच्या आक्रमणाखाली धुव्वा उडाला आणि राष्ट्राच्या मानेवर गुलामगिरीचे जोखड येऊन पडले.

तथापि भारतातील मद्रास, अयोध्या किंवा बंगाल ह्या भागांमध्ये जशी ब्रिटिश सत्ता घर करून बसली, तशी ती भारताच्या ह्या स्वातंत्र्यभूमीत–महाराष्ट्रात–निश्चितपणे, निर्भयपणे राज्य करू शकली नाही. महाराष्ट्रात ब्रिटिश सिंहासनाखाली अधूनमधून असंतोषाच्या दाहक ज्वालांचा भडका उडतच राहिला. उमाजी नाईकाने बंड केले. पुणे जिल्ह्यातील कोळ्यांनी बंडे केली. १८५७ साली ब्रिटिश सत्ता उलथून पाडण्यासाठी जे मोठे युद्ध झाले, त्याचे प्रवर्तक व नेते नानासाहेब, रावसाहेब, तात्या टोपे, झाशीची लक्ष्मीबाई आदी मंडळी ही महाराष्ट्रीयच होती. त्यानंतर १८७९ साली वासुदेव बळवंत फडके यांनी महाराष्ट्रात बंड केले. ब्रिटिश राज्य उलथून पाडून हिंदी प्रजासत्ताक राज्य स्थापन करण्याची त्यांनी घोषणा केली होती.

वासुदेव बळवंतांच्या बंडाचा पाडाव झाला. त्या बंडाच्या वेळी टिळक कायद्याचा अभ्यास करीत होते. वासुदेव बळवंत हे पुण्यास राहात असता त्यांच्या व्यायामशाळेत टिळक शारीरिक शिक्षण घेत असत. पराभूत झालेल्या वासुदेव बळवंतांचा अभियोग पुण्यात चालला. तो पाहण्यासाठी शेकडो लोक न्यायालयाकडे जात असत. त्यांत टिळक आणि आगरकर हे दोघे होते. देशाच्या उन्नतीविषयी विचार करणाऱ्या या दोघांच्या मनावर वासुदेव बळवंत यांच्या पराभवाचा परिणाम झाला असला पाहिजे. जनतेने पाठिंबा न दिल्यामुळे फडक्यांचा पराभव झाला, हे त्यांच्या लक्षात आले. आपण लोकांना नवीन दृष्टीने शिक्षण दिले तरच त्यांच्यांत आत्मतेज स्फुरून व स्वदेशाभिमान जागृत होऊन, देशोद्धारासाठी त्यांतील तरुण पुढे येतील, असे त्यांना वाटले. यासाठी ते दोघे निबंधमालाकार विष्णुशास्त्री चिपळूणकरांना जाऊन मिळाले आणि त्यांनी तत्कालीन जनतेच्या ध्येयशून्य व प्रवाहपतित आयुष्यक्रमाविरुद्ध बंडाचे निशाण १ जानेवारी १८८० रोजी फडकाविले. महाराष्ट्राला नवशिक्षण, नवसंदेश, नवविचार देणारी एक अभूतपूर्व शाळा त्यांनी स्थापन केली. त्यांनी तरुणांना स्वावलंबनाचे, स्वदेशसेवेचे, राष्ट्राभिमानाचे धडे देऊन, स्वतःच्या त्यागाने व तेजाने त्यांना देशोद्धारासाठी त्याग करावयास प्रेरणा दिली.

ह्या आधीच्या काळात १८४२–४३ च्या सुमारास कलकत्त्यात ' ब्रिटिश इंडियन सोसायटी '[1] स्थापन झाली होती. भारतातील ती पहिली वहिली राजकीय संस्था. ' सरकार शेतकऱ्यांच्या परिस्थितीत सुधारणा करण्यासाठी झटणार आहे ' असे तिच्या जमीनदार सभासदांना कळताच त्यांना मोठाच धक्का बसला. ह्यानंतर पुण्यात ' डेक्कन सोसायटी ' नावाची पहिली राजकीय संस्था १८५२ साली स्थापण्यात आली. तिचे सभासद सरदार, जहागीरदार आणि तरुण देशभक्त होते. ब्रिटिश लोकसभेपुढे हिंदी लोकांची गाऱ्हाणी मांडायची असे त्यांचे ध्येय होते. परंतु सरकारने त्यातील काही महत्त्वाकांक्षी व्यक्तींना नोकरीत बढती देऊन त्यांची अन्य स्थळी बदली केल्यामुळे, ती राजकीय संस्था चार–सहा महिन्यांतच बंद पडली.

मुंबईत २६ ऑगस्ट १८५२ रोजी मुंबईचे नेते नाना शंकर शेट, डॉ. भाऊ दाजी लाड, नौरोजी फर्दुनजी आणि दादाभाई नौरोजी ह्यांनी ' बॉम्बे असोशिएशन '[2] नावाची एक राजकीय संस्था स्थापन केली होती. तिचे उद्दिष्ट ब्रिटिश लोकसभेपुढे हिंदी लोकांची गाऱ्हाणी मांडून राज्यशासनामध्ये हिंदी लोकांना अधिकाराच्या जागा द्याव्या असे होते. कलकत्ता आणि मद्रास येथील राजकीय संस्थांच्या सहकार्याने कार्य करावयाचे हे 'बॉम्बे असोशिएशन'चे वैशिष्ट्य होते. पुढे काही वर्षांनी तिचे काम थंड पडत गेल्यामुळे, दादाभाई नौरोजी ह्यांनी २२ मे १८६९ रोजी मुंबईत ' ईस्ट इंडिया असोशिएशन ' नावाची दुसरी एक राजकीय संस्था काढली. हिंदी संस्थानिकांचा पाठिंबा मिळविण्यासाठी दादाभाई नौरोजींनी प्रयत्न केला. त्याला काशीनाथ त्रिंबक तेलंग आणि डॉ. भाऊ दाजी लाड ह्यांनी विरोध केला. त्या दोघांचे म्हणणे असे होते की, बौद्धिक, नैतिक आणि पारंपारिक दृष्ट्या नव भारताच्या आकांक्षेमध्ये हिंदी संस्थानिक भागीदार होऊ शकणार नाहीत.[3] पुढे २ एप्रिल १८७० रोजी पुण्यात गणेश वासुदेव जोशी तथा सार्वजनिक काका आणि सदाशिव गोवंडे ह्यांनी 'सार्वजनिक सभा' स्थापन केली. ह्या संस्थेने लोकांची नि मुद्रणालयांची गाऱ्हाणी सरकारपुढे मांडण्याचे कार्य केले.

---

1. *Political India*, 1832–1932, Edited by Sir John Cumming 1932.
2. G. D. Vol. 3 of 1852.
3. R. P. Masani, *Dadabhai Naoroji, The Grand old Man of India*, P. 111.

१८८३ साली इल्बर्ट विधेयकाने हिंदी न्यायाधिशांना, युरोपियन गुन्हेगारांना शिक्षा देण्याचा अधिकार देऊ केल्यामुळे, भारतविरोधी युरोपियनांनी हलकल्लोळ उडविला. ते विधेयक युरोपियनांच्या चळवळीच्या वाऱ्याने उडून गेले. त्यामुळे भारतात खळबळ उडाली. हिंदी नेत्यांना स्वतःची अशी एक अखिल भारतीय स्वरूपाची राजकीय संस्था स्थापन करण्याची आवश्यकता तीव्रतेने भासू लागली. त्याप्रमाणे मुंबई, कलकत्ता, मद्रास, पुणे येथील निरनिराळ्या राजकीय संस्थांमधील नेत्यांनी एकत्र येऊन २८ डिसेंबर १८८५ रोजी मुंबईत राष्ट्रीयसभा स्थापन केली.

राष्ट्रीयसभेच्या संस्थापनेस जरी इल्बर्ट विधेयक हे तात्कालीक कारण घडले असले तरी, वासुदेव बळवंतांच्या बंडामुळे ब्रिटिश राज्यकर्ते बेचैन होऊन, त्यांनी राष्ट्रीयसभा ही संस्था हिंदी नेत्यांच्या साहाय्याने स्थापली, हेच सत्य असावे असे वाटते. जिचे पितृत्व इंग्रज मुत्सद्यांकडे नि मातृत्व हिंदी नेत्यांकडे होते, ती राष्ट्रीयसभा हे एक राजकीय असंतोषाची वाफ जाण्यासाठी ठेवलेले झडप[4] असावे, असे ह्यूम आणि महाराज्यपाल लॉर्ड डफरीन यांनी ठरविले होते. आरंभी आरंभी राष्ट्रीयसभेचे अध्यक्ष, ब्रिटिश राज्य निरंतर राहावे, अशी प्रकटपणे नि प्रामाणिकपणे भाषणे करीत.

ब्रिटिश साम्राज्याला विरोध करण्यास अवतीर्ण झालेली आशियातील पहिली शक्ती म्हणजे हिंदी राष्ट्रीयसभा होय. त्या राष्ट्रीयसभेचे पहिले अधिवेशन पुण्यात होणार होते. परंतु तेथे पटकीची साथ सुरू असल्यामुळे ते अधिवेशन मुंबईत भरले. राष्ट्रीयसभेच्या पहिल्या अधिवेशनाला टिळक उपस्थित नव्हते. १८८९ सालपर्यंत ते राष्ट्रीयसभेच्या कार्यात विशेषसा भाग घेत नव्हते.

त्याकाळी महाराष्ट्राचे नेतृत्व महात्मा जोतीराव फुले, लोकहितवादी गोपाळराव देशमुख, न्यायमूर्ती माधवराव रानडे, डॉ. भांडारकर, न्यायमूर्ती तेलंग, नारायणराव चंदावरकर आणि मामा परमानंद ह्यांच्याकडे होते. त्याकाळी महाराष्ट्रात जी खुद्द जनतेने चालविलेली असे म्हणता येईल अशी राजकीय चळवळ नव्हती. म. जोतीराव फुल्यांनी कनिष्ट वर्गात शैक्षणिक, सामाजिक आणि धार्मिक समतेसाठी आणि मानवी हक्क संपादन करण्यासाठी मोठी चळवळ केली. त्यांनी शेतकऱ्यांची संघटना करून जमीनदार नि सावकार यांच्याविरुद्ध लढा केला. सरकारकडे त्यांची

4 W. Wedderburn, Allan Octavian Hume, P. 77

गाऱ्हाणी मांडून त्यांना न्याय मिळवून देण्याचा प्रयत्न केला.

ब्रिटिश राज्याबरोबर आलेले नवे ज्ञान, नवे विचार आणि नवी यंत्रे ह्यांच्यामुळे महाराष्ट्रात बौद्धिक पुनरुज्जीवनाचे युग सुरू झाले. त्या विचारांच्या मंथनातून फुले, लोकहितवादी, रानडे, भांडारकर यांनी ज्ञान, व्यासंग, विचारांचा समतोलपणा ह्यांवर अधिष्ठित अशी उदारमतवादी विचारसरणी निर्माण केली. ह्या विचारांना गोपाळ गणेश आगरकर ह्यांनी पुढे व्यक्तिस्वातंत्र्य नि बुद्धिप्रामाण्यवाद ह्यांची धार दिली. ह्या विचारांच्या दृष्टीतून धार्मिक, सांस्कृतिक, आर्थिक समस्यांची तपासणी सुरू झाली. समाजाची नवीन पायावर उभारणी करू इच्छिणाऱ्या महाभागांनी ते ज्ञानयुग सुरू केले होते.

परंतु त्या महाभागांना वाटे की, ब्रिटिश राज्य हे भारतास देवाने दिलेले वरदान आहे. ब्रिटिश साम्राज्यसत्तेच्या टाचेखाली तुडविल्या जात असलेल्या भारतास, राजकीय स्वातंत्र्य शक्य तो लवकर प्राप्त करून कसे घ्यावे ह्याकडे त्या महाभागांचे असावे तेवढे लक्ष नव्हते. त्यामुळे उपरिनिर्दिष्ट मतप्रणालीपासून स्फूर्ती घेतलेले महाराष्ट्रातील नेमस्त पुढारी नि भारतातील अन्य प्रांतांतील तत्सम नेमस्ताग्रणी जेव्हा राजकारणाविषयी विचार करीत, तेव्हा ते प्रबळ अशा ब्रिटिश साम्राज्य सत्तेच्या नव्या यंत्रणेने आणि पाश्चिमात्य संस्कृतीच्या प्रभावामुळे दिपून, भांबावून गेल्यासारखे दिसत.

राष्ट्रीयसभेचे पुढारी वर्षातून एकदा सुट्टीच्या दिवसांत एखाद्या मोठ्या शहरी एकत्र जमून देशकालपरिस्थितीविषयी सुमधुर, सुसंबद्ध नि विद्वत्तापूर्ण अशी भाषणे करीत. प्रार्थनापूर्वक ठरावही करीत आणि पुन्हा नित्याच्या कामकाजात वर्षभर गढून जात. परकीय सत्तेचे गुणगान करावे, राज्यकर्त्यांच्या भलेपणाविषयी ग्वाही द्यावी आणि त्यांच्याकडून राज्यकारभारात क्रमशः सुधारणा होत जाईल अशी भीत भीत अपेक्षा करावी, असा त्यांचा कार्यक्रम असे. बोलून चालून ती वरिष्ठ वर्गातील सुशिक्षित अशा मूठभर व्यक्तींची चळवळ. त्या चळवळीशी लोकांचा असा काहीही संबंध नव्हता. राष्ट्रीयसभेच्या अध्यक्षांचे जनतेला क्वचित दर्शन होत असे. फेरोजशहा मेथांसारख्या नेत्यांची झोपमोड होऊ नये म्हणून स्थानकावर राष्ट्रीयसभेचा अध्यक्ष व स्वागतमंडळी तिष्ठत बसत ! नेत्यांना कोणी प्रश्न विचारला तर त्याचे त्याला तुच्छतेने उत्तर मिळे किंवा सिंहगर्जना होई ! राष्ट्रीयसभा म्हणजे एक श्रीमंतांचा, जमीनदारांचा व वकिलांचा मामला ! पारतंत्र्याच्या अंधाराने देश वेढलेला होता. जनतेतील आत्मविश्वास नाहीसा झाला होता. रूढी-

प्रियता, अशिक्षितपणा व अज्ञान यांमुळे जनतेच्या मनावर एक प्रकारची अवकळा पसरली होती. तिला मोहनिद्रेतून जागृतावस्थेत आणण्यासाठी एका गतिमान प्रेरक शक्तीची आवश्यकता होती.

टिळकांनी सुमारे अकरा वर्षे शिक्षणक्षेत्रात भरीव नि ठसठशीत कार्य केल्यावर १८ ऑक्टोबर १८९० रोजी डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या सभासदत्वाचा त्यांनी राजीनामा दिला. ते स्वतः कर्तृत्ववान, संघटनाचतुर आणि धैर्यशाली असले तरी, त्या संस्थेतील सहकाऱ्यांशी बरोबरीने वागणे त्यांना जमत नसे. तापटपणे तोडून बोलून त्या संस्थेत ते वादळ उठवीत.

त्यापूर्वीच टिळकांचे धैर्य नि त्याग हे गुण महाराष्ट्रात दिसून आले होते कोल्हापूरच्या शिवाजी महाराजांवर होत असलेल्या अन्यायाला 'केसरी–मराठ्या'ने वाचा फोडली. त्या प्रकरणात टिळकांना 'मराठ्या' चे संपादक म्हणून आणि आगरकरांना 'केसरी'चे संपादक म्हणून चार महिन्यांची शिक्षा होऊन ते २६ ऑक्टोबर १८८२ रोजी सुटले.

. २ .

सुटकेनंतर टिळक–आगरकरांचा महाराष्ट्रात पराक्रमी नि तेजस्वी तरुण पुढारी म्हणून गौरव झाला. मुंबईत महात्मा जोतीरावांचे सहकारी नारायणराव लोखंडे यांनी व पुण्यात महात्मा जोतीराव यांनी त्यांचा सत्कार केला होता. महात्मा जोतीरावांच्या आग्रहावरून रामशेठ उरवणे हे जोतीरावांचे श्रीमंत मित्र टिळकांना दहा सहस्र रुपयांस न्यायालयात जामीन राहिले होते. तथापि, टिळक महाराष्ट्राच्या राजकीय क्षितिजावर उगवले १८८९ साली. त्या काळी रानडे, भांडारकर, मुंबईचे तेलंग आणि फेरोजशहा मेथा ह्यांसारख्या विद्वानांच्या नि पहिल्या श्रेणीच्या कर्तृत्ववान पुढाऱ्यांच्या हातून महाराष्ट्राचे नेतृत्व हिसकावून घेणे ही गोष्ट सोपी नव्हती. रानडे, भांडारकर, तेलंग हे ब्रिटिश सरकारच्या नोकरीत असल्यामुळे त्यांच्या धैर्यास नि कार्यपद्धतीस नेमस्तपणाचा बांध पडे. टिळकांनी सरकारी नोकरी कधीच केली नाही. त्यामुळे ते आपल्या अंगच्या कर्तृत्वाला नि लोकसेवेला निर्भयतेचे तेज चढवू शकले.

सन १८८९ मध्ये लाचखाऊ कमिशनर आर्थर क्राफर्ड यांच्या प्रकरणात बडतर्फ झालेल्या मामलेदारांचा कैवार घेऊन टिळकांनी निर्भयतेने त्यांची बाजू मांडली. त्यांना न्याय मिळवून देण्याचा आटोकाट प्रयत्न केला. टिळकांच्या निर्भय

कार्यामुळे सरकारविरुद्ध झगडणारा जनतेचा कैवारी उदयास आला असे त्या वेळी सर्व महाराष्ट्रास वाटले. मामलेदारांना न्याय मिळावा म्हणून टिळक झटले. परंतु त्यांची कानउघाडणी करून ते म्हणाले, " आम्ही विद्याप्रसाराची कितीही बढाई मारली तरी सत्याभिमान, एकनिष्ठा वगैरे ज्या गुणांनी राष्ट्रे अभ्युदयास येतात ते गुण आमच्यामध्ये हवे तितके आले नाहीत असे म्हणावे लागते. " ह्या प्रकरणानंतर त्यांनी संमतीवयाच्या विधेयकाच्या बाबतीत सनातन्यांची बाजू घेऊन, रानडे, तेलंग, भांडारकर यांच्यावर आग पाखडली. " शरीराचा एखादा भाग सडल्यास तो भाग कापून काढावा लागतो, तद्वतच या मंडळीसंबंधाने आपणांस वर्तन केले पाहिजे. "[५] असे कठोरपणे म्हणून रानडे, भांडारकर आणि तेलंग हे विद्यालंकृत दुर्जन[६] आहेत असेही त्यांनी म्हटले. ह्या प्रकरणात टिळकांचा पराभव झाला. परंतु ते सर्वसाधारण जनतेचे अग्रणी ठरले.

टिळकांच्या नेतृत्वाला धाडसाची, धैर्याची नि त्यागाची धार होतीच. त्याबरोबरच त्यांनी जागतिक कीर्तीचे पंडित डॉ. भांडारकर आणि तेलंग यांच्याप्रमाणेच आपणही त्याच तोलाचे विद्वान आहोत हे सिद्ध केले. टिळकांचे वाचन अफाट होते. त्यांचे वाचन स्वतंत्रपणे, मनःपूर्वक अखंडपणे सुरू असे. एखाद्या विषयावरील सर्व उपलब्ध ग्रंथ मिळवून सखोल वाचन करण्यात ते गर्क असत. त्यांनी गणित, संस्कृत, इतिहास, धर्मशास्त्र, ज्योतिष, निर्बंधशास्त्र यांचा सखोल अभ्यास केला होता. म्हणूनच ते रानडे, भांडारकर, तेलंग यांच्यापुढे संमतिवय-विधेयकाच्या प्रकरणातील वादविवादात टिकाव धरू शकले. यापूर्वी त्यांनी काही प्रबंध वाचले होते. शेवटी १८९३ साली त्यांचा 'ओरायन' हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. पुढे १९०२ साली 'आर्क्टिक होम इन दी वेदाज' हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. ह्या दोन ग्रंथांमुळे त्यांना आंतरराष्ट्रीय कीर्ती मिळाली. तलस्पर्शी विवेचक बुद्धी असलेला एक अव्वल दर्जाचा भारतीय पंडित म्हणून त्यांचा लौकिक जगभर पसरू लागला.

टिळकांनी आपल्या नेतृत्वाला असे धैर्याचे, त्यागाचे नि विद्वत्तेचे तेज दिल्यामुळे महाराष्ट्रातील इतर पुढारी त्यांच्यापुढे निष्प्रभ पडू लागले. गोपाळ कृष्ण गोखले टिळकांचे प्रतिस्पर्धी. त्यांचा मानसन्मान वरिष्ठ वर्गात. जनतेशी त्यांचा आकर्षण वाटण्याएवढा संपर्क नसे; किंवा त्यांच्या दर्शनाचा त्यांना सहसा योग येत

---

५. केसरी, २४ मार्च १८९१.

६. केसरी, ७ एप्रिल १८९१.

नसे. उलट टिळकांच्या धडाडीच्या, निर्भय नि त्यागी नेतृत्वामुळे त्यांच्याकडे महाराष्ट्रातील तरुण आकृष्ट झाले.

क्राफर्ड प्रकरणाचा शेवट झाल्यावर आणि डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या सभासदत्वाचा राजीनामा दिल्यानंतर, टिळक प्रांतिक परिषदांमध्ये धडाडीने भाग घेऊ लागले. राष्ट्रीयसभेच्या कार्याकडे लक्ष देऊन टिळक ते कार्य कळकळीने करू लागले. त्या काळी राष्ट्रीयसभेची कार्य करण्याची बैठक अर्ज, प्रार्थना, निषेधदर्शक नापसंती यांवर अधिष्ठित होती. राष्ट्रीयसभेच्या मानचित्रात सामान्य जनतेला स्थान नव्हते. जनता हेच खरे शक्तिकेंद्र आहे ह्याची तिच्या नेत्यांना जाणीव नव्हती. टिळकांच्या राजकारणाचा नि जीवनाचा पाया निष्कामकर्मयोग हा असल्यामुळे युगप्रवर्तकाच्या धैर्याने ते राष्ट्राच्या प्रश्नाकडे पाहू शकले. राष्ट्रीयसभेच्या मंडपात वर्षातून एकदा पांडित्यपूर्ण, आखीव, रेखीव भाषण करणाऱ्या नेत्यांना त्यांनी खडसावून सांगितले की, ' तुम्ही जनतेची शक्ती जागृत केली पाहिजे. जनतेत जागृती झाली तर तीच आपल्या राजकीय स्वातंत्र्याच्या मागणीची प्रभावी शक्ती ठरेल. ' सामान्य जनता अश्रू नि घाम गाळीत होती. ती काळोखात खितपत पडली होती. पारतंत्र्याविरुद्ध जनतेला चेतविले पाहिजे हे प्रथम ओळखणारा पहिला राजकारणी नेता म्हणजे टिळक. तेच त्यांनी आपल्या जीवनाचे एकमेव ध्येय ठरविले. जनशक्तीच्या रहस्याचे मर्म नि महत्त्व राष्ट्रीयसभेच्या नेत्यांच्या गळी उतरविण्यासाठी आणि राष्ट्रीयसभेला लोकाभिमुख करण्यासाठी त्यांनी आपली वाणी आणि लेखणी तेजस्वी रीतीने वापरली, अगदी तलवारीसारखी वापरली.

जुन्या नि ज्येष्ठ नेत्यांची शस्त्रे म्हणजे प्रार्थना, व्यासपीठ आणि निषेधदर्शक नापसंती, तर टिळकांची शस्त्रे वाणी, वृत्तपत्र, व्यासपीठ आणि जनतेचा क्षोभ. टिळकांसारखा दक्ष, धाडसी आणि प्रभावी संपादक भारतात झालाच नाही. ते भारतीय वृत्तपत्रसृष्टीतील नेपोलियनच होत. एक हजार तलवारींपेक्षा चार बंडखोर वर्तमानपत्रांची शक्ती अधिक प्रबळ नि प्रलयकारी असते, असे नेपोलियन म्हणत असे. ते टिळकांच्या बाबतीत सत्य ठरते. अशा संपादकाचे प्रमुख गुण म्हणजे मजकुरातील वाचनीयता, अनादराचा भाव, व्यक्तित्व, निर्भयता नि उच्च ध्येय हे होत. टिळकांची भाषा घणाघाती, ओघवती, ओजस्वी, तिखट, तर्ककर्कश नि मर्मभेदक असे. त्यांनी सरकारी अरेरावांना चापले. स्वदेशातील ब्रिटिशधार्जिण्या नेत्यांवर अग्निअस्त्रे फेकली. स्वपक्षीयांना उत्तेजन नि धैर्य दिले. त्यांच्या ठायी पारतंत्र्याविषयी कमालीचा तिरस्कार निर्माण केला. गणपतिउत्सव नि शिवाजी-

उत्सव यांसारखे उत्सव राष्ट्रजागृतीसाठी वापरून, सामान्य जनता नि कामगार यांना जोडून त्यांनी आपल्या पाठीमागे लोकांचे बळ निर्माण केले. जनता आणि राजकारण यांना एकत्र जोडणारा केवळ भारतातीलच नव्हे तर आशियातील पहिला नेता म्हणजे टिळक.

. ३ .

इंग्रजांचे राज्य म्हणजे देवाचे वरदान असे मानणाऱ्या नेत्यांना टिळक सांगत की, सुतारकी व विणकाम यांवर आपले पोट भरणाऱ्या दोन कोटींहून अधिक भारतीयांच्या तोंडचे अन्न कोणी काढून घेतले असेल तर ते इंग्रज सरकारने. इंग्रज लोक क्षत्रियांपेक्षा जात्याच अधिक वैश्य आहेत. त्यांचे नाक दाबा म्हणजे तोंड उघडेल. जुने नेते म्हणत, इंग्रज सरकारने शांतता दिली. त्यावर टिळक म्हणत, हो, पण भाकरी नेली. कोणी म्हणाले, सरकारने आगगाड्या दिल्या. त्यावर ते उत्तर देत, मृतावर अलंकार काय उपयोगाचे ? " इंग्रज लोक देशावर चरत आहेत आणि जर एतद्देशीय लोकांच्या बुद्धीची, करामतीची, शौर्याची, व्यापाराची व इतर प्रगतीची वाट बंद करीत आहेत ती तशीच राहिली तर बंड होईल, " असा ते सरकारला इशारा देत.

सन १८९६ च्या शेवटी महाराष्ट्रात दुष्काळाने कहर उडविला. शेकडो माणसे प्राणास मुकली. जनावरे मेली. त्या वेळी टिळकांनी शेतकऱ्यांना धीर दिला. ते म्हणाले, " कर्ज काढून सारा भरू नका. आपसात लूटमार करू नका. त्यामुळे सर्वांचा नाश होईल. सरकारी कनिष्ठ अधिकाऱ्यांना घाबरू नका. त्यांच्या रागाची कदर करू नका. मृत्यूच्या जबड्यात असतानासुद्धा तुम्ही धैर्य दाखवीत नाही. आम्ही ह्या दुष्काळाला तोंड देऊ, परंतु ह्या मेंढरांसारख्या वागणाऱ्या भित्र्या लोकांना काय करावे ? असला दुष्काळ लंडनमध्ये पडला असता आणि तेथील मुख्य प्रधान हिंदुस्थानच्या गव्हर्नरजनरलसारखा जर उदासीन राहिला असता, तर त्याचे सरकार एका आठवड्यात पत्त्यांच्या बंगल्यासारखे कोलमडले असते ! " टिळकांनी सार्वजनिक सभेच्या वतीने निवेदने काढून सरकारला सळो की पळो करून सोडले. त्यामुळे सार्वजनिक सभा सरकारच्या रोषाला बळी पडणार आणि इतकी चांगली संस्था नष्ट होणार, अशी भीती दादाभाईंनी लंडनहून प्रदर्शित केली होती.

दुष्काळाच्या वेळी इंग्रज महाराज्यपाल एल्जिन साहेब बडोद्यास मेजवानी

झोडीत होते. ते पाहून टिळक म्हणाले, "लोक उपाशी मरत आहेत. अशा वेळी मेजवानी झोडणाऱ्या व्हाईसरॉयांस जाब विचारण्याची सांप्रत परिस्थिती नाही याविषयी वाईट वाटते." अशा तिखट अन् बोचक लिखाणामुळे क्षोभ निर्माण होई. त्यावर टिळकांना पुढच्या विधिमंडळात मज्जाव करावा अशी 'टाइम्स ऑफ इंडिया' वृत्तपत्राने सरकारास सूचना केली! गांधीजींना टिळक हिमालयासारखे वाटले तो हा काळ!

टिळकांनी व्यासपीठाचे रूपांतर जनतेची शक्ती संघटित करण्यात केले. आपले वर्तमानपत्र हे एक अफाट शक्तीचे शस्त्र बनविले. शेतकऱ्यांच्या चळवळी उभारल्या. विद्यार्थी-वर्गाला चेतना दिली. ब्रिटनमधील कापड खपण्याच्या दृष्टीने हिंदी कापडावर ब्रिटिश सरकारने जकातीचा कर बसविताच, टिळकांनी विदेशी कापडावर बहिष्कार टाकण्यासाठी आघाडी उभारली. देशी उद्योगधंद्यांस चालना दिली. क्रांतिकारकांना स्फुरविले. सर्वत्र प्रक्षोभ निर्माण केला. सर्व बाजूंनी चळवळ पेटविली. वीरत्व, धाडस नि त्याग हे गुण दादाभाईंच्या नि रानड्यांच्या अंगी नसल्यामुळे ते लोकाग्रणी होऊ शकले नाहीत. जनतेला ते गुण टिळकांच्या अंगी आढळल्यामुळे ते लोकाग्रणी नि लोकमान्य झाले.

ह्याचा परिणाम हिंदी राष्ट्रीय चळवळीवर व्हावा तोच झाला. जनतेच्या मनावर टिळकांच्या तेजस्वी संदेशाचा नि गुणांचा प्रभाव जसजसा प्रखरतेने पडू लागला, तसतसे त्यांच्यावरील सरकारी दडपण वाढू लागले. शिवाजी उत्सवाच्या वेळी चाफेकर बंधूंपैकी दामोदर चाफेकरांची टिळकांनी कानउघाडणी केली होती. त्या वेळी चाफेकरांनी "शिवाजीचे उद्गार" नावाची कविता म्हटली होती. त्यातील शिवाजी म्हणतो, "आपले मराठे हे परकीय राज्यात षंढासारखे वागून दुःखे भोगीत आहेत, हे पाहून वाईट वाटते." व्याख्यानानंतर चाफेकरांना एका बाजूला घेऊन टिळक म्हणाले, "इतरांना षंढ म्हणतोस असा तू कोण लागून गेलास शूर मर्द? जर तुझ्यासारखे तरुण मर्द असते तर रँड जिवंत कसा राहिला असता!" असावधपणे उच्चारलेला हा मंत्र लागू पडला. रँडचा वध करण्याची चाफेकरांची मनीषा होतीच. ती ह्यामुळे पेटली असावी आणि २२ जून १८९७ रोजी रँडचा वध झाला. प्लेग काळात पुण्यातील जनतेला त्याच्या सोजिरांनी छळले होते.

रँड वधामुळे भारतात नि इंग्लंडमध्ये हाहाकार उडाला. सरकार सैरावैरा धावू लागले. ब्रिटिश वृत्तपत्रे आणि ब्रिटिशधार्जिणी हिंदी वृत्तपत्रे नि पुढारी

टिळकांच्या नावाने आरडा–ओरडा करू लागले. त्या वेळी टिळकांनी सरकारला डाफरून विचारले की, ' सरकारचे डोके ठिकाणावर आहे काय ? ' ' राज्य करणे म्हणजे सूड उगविणे नव्हे. ' टिळक रॅन्डसाहेबांच्या खुनाच्या वातावरणास जबाबदार आहेत असे समजून, सरकारने टिळकांवर १८९७ सालच्या जुलै महिन्यात खटला भरला. खटल्याचा निकाल लागण्यापूर्वी मोतिलाल घोष ह्यांनी टिळकांना सुचविले की, ' क्षमा मागून सुटका करून घ्या. ' ' सरकारची क्षमा मागून महाराष्ट्रात राहणे म्हणजे अंदमानात राहण्यासारखेच आहे. जर राजकारणात भाग घ्यावयाचा असेल तर हा धोका पत्करलाच पाहिजे, ' असे टिळकानी त्यांना बाणेदार उत्तर दिले ! टिळक नुसते पत्रपंडित नसून ते महान रणपंडित आहेत हे यावेळी दिसून आले. टिळकांना १४ सप्टेंबर १८९७ रोजी न्यायमूर्ती स्ट्रॅची ह्यांनी दीड वर्षाची शिक्षा ठोठावली. टिळक एकाग्रतेने निकाल ऐकत होते. ते शांत होते. भीतीचा लवलेशही त्यांच्या चेहऱ्यावर दिसत नव्हता.

सर्व महाराष्ट्र हळहळला. न्यायालयातील निर्णयानंतर ' लंडन टाइम्स ' म्हणाला, ' आता राजद्रोह नि क्षोभ पसरविणारे दख्खनमधील ब्राह्मण धडा घेतील ! ' त्याला काय माहीत की सुटल्यावर टिळक हे परशुरामासारखे पुन्हा लढाईस उभे राहतील म्हणून ! १८९७ साली राष्ट्रीयसभेच्या अमरावती अधिवेशनामध्ये टिळकांच्या शिक्षेचा उल्लेख करून सुरेंद्रनाथ बानर्जी सद्गदित होऊन म्हणाले की, ' सर्व राष्ट्र टिळकांसाठी दुःखाश्रू ढाळीत आहे. ' त्याबरोबर मंडपातील सर्व प्रतिनिधी उठून उभे राहिले ! आणि भारतीय स्वातंत्र्याचा कोंबडा आरवला ! टिळकांनी आपल्या त्यागाने भारतीय नेतृत्वाची कल्पना बदलली. गुलामगिरीत खितपत पडलेल्या देशातील नेतृत्व कर्तृत्वपूर्ण, निर्भय आणि त्यागी असले पाहिजे. विश्वविद्यालयीन पांडित्यपूर्ण भाषणांनी राष्ट्राचा प्रश्न सुटत नसतो. त्या त्यागी नेतृत्वाच्या कष्टातून नि तुरुंगवासातून स्वातंत्र्याचा झगडा पुढे जातो. राष्ट्राच्या गुलामगिरीचे पाश तोडताना तुरुंगवास भोगणे हे अपरिहार्य पण पुण्यप्रद कर्तव्य आहे, हे प्रथम टिळकांनी भारतीय तरुणांच्या मनावर बिंबविले. त्यांच्या त्यागाच्या नि देशभक्तीच्या अमृतसिंचनाने देशभक्तांच्या दोन पिढ्या निर्माण झाल्या. टिळक महाराष्ट्राचे अग्रगण्य नेते म्हणून ओळखले जाऊ लागले.

टिळकांच्या सुटकेसाठी अनेक प्रयत्न झाले. विश्वविख्यात कीर्तीचे पंडित मॅक्स मुल्लर ह्यांनी लंडनमधील अनेक नामांकित व्यक्तींच्या साहाय्याने पंडित टिळकांच्या सुटकेसाठी प्रयत्न केला. ' विद्वान् सर्वत्र पूज्यते ' हे सत्य अबाधित

आहे, ह्याचा हा पडताळाच. मॅक्स मुल्लरांनी आपण संपादन केलेला 'ऋग्वेद' हा ग्रंथ टिळक तुरुंगात असताना त्यांना पाठविला. त्यावरून टिळकांना आर्यांचे मूळ वसतिस्थान उत्तर-ध्रुवाजवळ असावे अशी स्फूर्तिदायक कल्पना सुचली. तुरुंगातील कदान्न खाऊन प्रकृतीने टिळक खंगले होते. त्यांचे ओठ काळे ठिक्कर पडले होते. शेवटी ६ सप्टेंबर १८९८ रोजी पंचावन्न ग्रंथांचे ओझे बरोबर घेऊन टिळक तुरुंगाबाहेर पडले.

. ४ .

सुटकेनंतर टिळकांनी काँग्रेसला लोकाभिमुख करण्याचे आपले महान कार्य ' पुनश्च हरि ॐ ' म्हणून हाती घेतले. इंग्रजी बोलणाऱ्या व इंग्रजी जाणणाऱ्या मूठभर लोकांच्या सभा-संमेलनांमध्ये स्वराज्याचा प्रश्न अडकून पडला होता, तो त्यांनी जनतेकडे नेऊन भिडविण्याचा निर्धार केला. टिळकांच्या त्यागामुळे नि लोकोत्तर धैर्यशाली वृत्तीमुळे त्यांच्याकडे काँग्रेसमधील तरुण गट आता आकृष्ट होऊ लागला. १८९८ सालच्या मद्रासच्या अधिवेशनात टिळकांनी स्तब्धता पाळली. ते अधिवेशनास जात असता जनतेने त्यांचा अनेक स्थानकांवर स्वयंस्फूर्तीने जयजयकार केला. काँग्रेसच्या मवाळ पुढाऱ्यांना वाटले की, काँग्रेस आता जहालांच्या ताब्यात जाणार. तेव्हा शंकरन् नायर ह्यांनी फेरोजशहा मेथा ह्यांना तार केली की, ' तुम्ही आला नाहीत तर काँग्रेस हातची जाईल ! ' मद्रासमध्ये टिळकांना थाटाची मेजवानी देण्यात आली. सत्कार झाले. राष्ट्रीय नेतृत्व बदलत जात होते, त्याची ही पावती होती. टिळकांची कीर्ती आता समुद्राच्या लाटांप्रमाणे सर्व भारतात पसरू लागली.

अठराशे नव्याण्णव साली लखनौला काँग्रेस भरली. मुंबईचे राज्यपाल लॉर्ड सॅन्डर्स्ट यांच्या राज्यकारभाराविरुद्ध ठराव मांडतो, असे टिळकांनी म्हणताच, काँग्रेसचे अध्यक्ष रमेशचंद्र दत्त यांची पाचावर धारण बसली. टिळक हे भयंकर महत्त्वाकांक्षी पुरुष आहेत असे पुढाऱ्यांना वाटून ते भयचकित झाले. रमेशचंद्र म्हणाले, ' टिळकांचा ठराव येत असेल, तर मी राजीनामा देईन ! ' हा धक्का देऊन टिळक थांबले नाहीत. पुढे सातारा येथे प्रांतिक परिषद भरली असता सॅन्डर्स्टच्या राज्यकारभाराचा निषेध करणारा ठराव त्यांनी आणला. राजमान्य मवाळांची तिरपीट उडाली. शेवटी ठरावातील आशयाची नोंद करण्याचे ठरून ते प्रकरण मिटले. काँग्रेसच्या नेत्यांनी जरा धीर दाखवावा, थोडा कणखरपणा दाखवावा,

मवाळ व मिळमिळीत तत्त्वे नि साधने ही सोडून द्यावी, जनतेची गाऱ्हाणी सरकारपुढे निर्भयपणे मांडावी, यासाठी टिळक प्रयत्न करीत होते.

१९०० साली लाहोर येथे काँग्रेसचे अधिवेशन भरले. अध्यक्ष सर नारायण चंदावरकरांविषयी टिळकांचे फारसे चांगले मत नव्हते. लाहोर अधिवेशनात लाला लजपतराय, टिळक, विपिनचंद्र पाल ह्या त्रिमूर्तींचा संगम झाला. काँग्रेसच्या राजमान्य पुढाऱ्यांना लोकमान्य आवडत नसत. परंतु लोकांनी त्यांना लाहोरात डोक्यावर घेतले, असे लजपतरायांनी ह्या अधिवेशनासंबंधी लिहिलेल्या आपल्या आठवणीत म्हटले आहे. लाहोर येथील अधिवेशनात देशातील आर्थिक परिस्थितीची पाहाणी करावी असा जो जी. सुब्रमण्य अय्यर यांनी ठराव आणला होता, त्याला टिळकांनी पाठिंबा दिला.

कलकत्त्याच्या १९०१ सालच्या राष्ट्रीयसभेत टिळकांचे प्रचंड स्वागत झाले. तेथील जनतेने टिळकांचा ' जिवंत हुतात्मा ' म्हणून जयजयकार केला.

१९०२ साली नि १९०३ साली टिळक काँग्रेसच्या अधिवेशनाला उपस्थित राहू शकले नाहीत. ताईमहाराज यांच्या दत्तक प्रकरणात त्यांना गुंतवून सरकारने त्यांचा ' पार्नेल ' करावयाचे ठरविले होते. आयर्लंडच्या स्वराज्य चळवळीचे अध्वर्यू पार्नेल ह्यांना एका बाईच्या काडीमोड प्रकरणात बदनाम करून ब्रिटिशांनी त्यांना राज-कारणातून उठविले होते. तसाच मुंबईसरकारने टिळकांच्या बाबतीत घाट घातला होता. ताईमहाराजांचे पती बाबामहाराज हे टिळकांचे परम स्नेही होते. त्यांना मरणसमयी दिलेला शब्द टिळकांनी अनंत यातना, अपसमज, निंदा, आर्थिक तोटा सोसून हरिश्चंद्राप्रमाणे वचन म्हणून पाळला. ह्या ताईमहाराज प्रकरणात मुंबईच्या वरिष्ठ न्यायालयाने टिळकांना सत्र न्यायाधिशाने दिलेली शिक्षा रद्द करून, ते निर्दोष आहेत असा ३ मार्च १९०४ रोजी निर्णय दिला. त्या अग्निदिव्यातून तावून सुलाखून निघाल्यामुळे टिळकांचे विमल चारित्र्य बावनकशी आहे अशी सर्व भारताची खात्री झाली.

१९०३ साली टिळकांनी काँग्रेसच्या नेत्यांना पुन्हा चेतना दिली. काँग्रेसच्या नेत्यांनी कार्यप्रवण व्हावे, नुसती पोकळ भाषणे करू नयेत, अशी चेतावणी त्या समयास ह्यूमसाहेबांनीही दिली होती. त्यावर काँग्रेसच्या पुढाऱ्यांना उद्देशून टिळक म्हणाले, ' नुसती वेडकांसारखी हंगामी ओरड करू नका ! सनदशीर चळवळ हवी तर तीच का होईना पण ती तरी कसून करा. ' पुढील वर्षी मुंबईत काँग्रेस भरली तेव्हा जुने पुढारी आणि नवे पुढारी असा वाद घालू नका, असे जुने पुढारी म्हणू

लागले. त्यावर दादाभाईंनी लंडनहून टिळकांना लिहिले की, टिळकांनी काँग्रेसच्या नेत्यांवर टीका करून काँग्रेसचे भंजन करू नये.

ब्रिटिश महाराज्यपाल लॉर्ड कर्झन ह्यांनी बंगालची फाळणी करण्याची योजना १२ ऑगस्ट १९०५ रोजी जाहीर केली. ती १६ ऑक्टोबर रोजी कार्य-वाहीत आणली. बंगालची फाळणी रद्द करण्यासाठी वंगवीर पुढे आले. 'फाळणी-विरुद्ध चळवळ थांबवू नका, सर्व देश तुमच्या पाठीमागे आहे,' अशी टिळकांनी कलकत्त्यात गर्जना केली आणि वंगभंगाच्या चळवळीचे लोण सर्व हिंदुस्थानभर पसरविले. त्यामुळे टिळक अखिल भारतीय नेते झाले. बहिष्काराची चळवळ त्यांनी शिगेला पोहोचविली. अशा वेळी १९०५ साली बनारस काँग्रेसच्या अध्यक्षपदी नामदार गोपाळ कृष्ण गोखले विराजमान झाले. बुद्धीने, सेवेने नि कळकळीने गोखले काही कमी नव्हते. परंतु त्यांची कार्याची भाषा इंग्रजी, श्रोतृसमुदाय इंग्रजी जाणणारा, त्यांचे कर्तृत्व गाजे परिषदात नि विधिमंडळात. राजदरबारी व काँग्रेसच्या वरिष्ठ वर्तुळात त्यांना मोठा मान होता. भल्या भल्या ब्रिटिश मुत्सद्यांशी नि अर्थ-शास्त्रज्ञांशी त्यांनी अनेकदा दोन हात करून त्यांना आपल्या ज्ञानाने नि बुद्धीने चकित केले होते. बनारसला 'पूना का राजा' असा त्यांचा गौरव झाला.

गोखल्यांनी बंगालच्या फाळणीबद्दल सरकारचा निषेध केला. परंतु ब्रिटिश राजपुत्राच्या अभिनंदनाचा ठराव विषयनियामक समितीत येताच टिळकांनी नि लजपतरायांनी त्याला विरोध केला. पंडित मदन मोहन मालवीय यांना वाटले, आता सरकार काँग्रेसवर तुटून पडणार. घोडेस्वार पलटण मंडपाजवळ येणार आहे, अशी गावात वार्ता पसरली होती. गोखल्यांनी चिमणलाल सेटलवाडांना तार करून फेरोजशहा मेथांना बनारसला पाठविण्याची विनंती केली. समेट घडवून आणण्याच्या दृष्टीने गोखल्यांनी लजपतरायांना बोलावून टिळकांचे आणि बंगाली नेत्यांचे मन वळविण्यास सांगितले. टिळकांनी राष्ट्राचा गाडा पुढे नेण्याच्या उद्देशाने तडजोड केली. राजपुत्राच्या अभिनंदनाच्या ठरावाच्या वेळी जहाल पुढाऱ्यांनी उपस्थित राहू नये; मात्र बंगाल्यातील नेत्यांनी बहिष्काराची जी चळवळ सुरू केली आहे, तिला मवाळांनी पाठिंबा द्यावा, अशी तडजोड झाली. काँग्रेसने तसा ठराव संमत केला. टिळकपक्षाचा विजय झाला.

१९०६ साली राष्ट्रीयसभेचे अधिवेशन कलकत्त्यास भरले. टिळक अध्यक्ष होऊ नयेत म्हणून वृद्धयाचे दादाभाई नौरोजींना पाचारण करण्यात आले. दादा-भाईंनी लंडनहून येऊन नव भारताची म्हणजे स्वराज्याची घोषणा केली. टिळकांनी

' स्वराज्य ' ह्या मंत्राचा प्रथम उच्चार ११ मे १८९७ च्या केसरीतील अग्रलेखात केला होता. त्या काळापासून त्यांचे ' स्वराज्य ' संपादनाकडे कसे लक्ष होते हे दिसते. आपल्या अग्रलेखात ते म्हणाले होते की, ' हिंदुस्तानवासी लोकांना स्वतंत्रता मिळणे ती इंग्रजी राज्यछत्राच्या छायेखाली मिळावयाची, किंवा उत्साह-वर्धक व सतेज अशा स्वराज्यरूपी सूर्याच्या लखलखीत उन्हात मिळावयाची हा प्रश्न आजच आपल्यापुढे मांडला गेलेला नाही. ' तो मंत्र काँग्रेसच्या गळी उतर-विण्यास त्यांना आठ वर्षे झगडावे लागले.

कलकत्त्यात फेरोजशहा मेथा नि टिळक यांची चकमक उडाली. फेरोजशहा मेथांच्या राजकीय मतांचा नि प्रतिष्ठेचा सूर्य कलकत्त्यात जवळ जवळ अस्तास गेला. ' बहिष्काराचा, राष्ट्रीय शिक्षणाचा, स्वदेशीचा, ' असे तीन ठराव करून काँग्रेसने राजमान्य मवाळांना नि शब्दपंडितांना काँग्रेसमध्ये आता जागा नाही असेच जणू जाहीर केले. दादाभाईंना ब्रिटिशसत्तेविरुद्ध वाढत चाललेला द्वेष विझविण्यासाठी म्हणून आणण्यात आले; परंतु त्यांनी त्यावर घासलेट ओतले, असा अँग्लो-इंडियन वृत्तपत्रे गोंगाट करू लागली. ' स्वराज्य ' हे काँग्रेसचे ध्येय ठरले; स्वदेशी, बहिष्कार आणि राष्ट्रीय शिक्षण ही साधने ठरली. टिळकांना परम आनंद झाला. दादाभाई देवदूत आहेत, असा त्यांचा त्यांनी गौरव केला. ' आपली शक्ती संघटित करा. बळ वाढवा. स्वराज्य हे आपले ध्येय ठरले. बहिष्कार हे प्रभावी शस्त्र आहे. कार्यास लागा, राणीचा जाहीरनामा काँग्रेसच्या अस्तित्वा-शिवाय निघाला, त्या वेळी सनदशीर चळवळ होती कुठे ? राज्यकर्त्यांना तुम्हांस शांत करावयाचे होते. पुढील वर्षी आमचे पुढे पाऊल पडेल नि काही वर्षांत आमची सर्व तत्त्वे मान्य होतील. ' असा त्यांनी कलकत्त्यात जहालांना स्फूर्तिदायक संदेश दिला.

पुढील काँग्रेस नागपुरास भरणार होती. परंतु तेथे टिळक अध्यक्षपदी निवडून येतील म्हणून फेरोजशहा मेथांनी काँग्रेस सुरतेला, आपल्या बालेकिल्ल्यात नेली. तेथे सुरतेला कुरुक्षेत्राचे स्वरूप प्राप्त झाले. जहाल आणि मवाळ दोन्ही पक्ष दंड थोपटून उभे राहिले. वीरांनी अस्त्रे आणि शस्त्रे पाठीवरील भात्यात ठेवली होती. टिळकांना वाटे, मेथा-गोखले यांचा पक्ष कलकत्त्याच्या ठरावांत बदल करणार. ते मिळमिळीत करणार. कारण मार्च १९०७ मध्ये सुरतेला प्रांतिक परिषद भरली असता त्यात मेथांनी ' बहिष्कार ' नि ' स्वदेशी ' ह्या ठरावांना मूठमाती दिली होती. बाहेर स्वदेशीची चळवळ भडकली होती. विदेशी कापडाच्या होळ्या पेटत

होत्या. तरुण मंडळींनी राष्ट्रीय शाळा सुरू केल्या होत्या. इतक्यात सरकारने लजपतरायांना हद्दपार केले. त्यामुळे टिळकांचा संताप अनावर झाला. ' ही परिस्थिती सुधारली नाही तर राष्ट्र म्हणून कोणी तुम्हांस सन्मान देणार नाही. या परिस्थितीचा जर तुम्हांस राग येत नसेल तर तुम्ही मेलेले बरे. या धरणीला कृतघ्न लोकांचा भार नको, ' असे त्यांनी ह्या समयास जळजळीत उद्‌गार काढले.

पराक्रमी मनुष्याची ऐतिहासिक भूमिका संपली म्हणजे त्याला काळाची पावले, काळाचा संदेश, ओळखता येत नाही. तसे फेरोजशहा मेथांचे झाले होते. गोखल्यांनी काँग्रेसमध्ये येणाऱ्या ठरावाची प्रत इतर नेत्यांना दिली. परंतु जहाल मंडळींना योग्यवेळी दिली नाही; कारण त्यांच्या ठरावांत त्यांनी कुठेकुठे थोडा बदल केला होता, असे मागून कळले. तडजोड होईना तेव्हा अध्यक्ष रासबिहारी घोष यांच्या निवडणुकीसंबंधी काही उपसूचना मांडावयाची आहे, असे टिळकांनी स्वागत-समितीच्या अध्यक्षांना कळविले. त्यावर खडाजंगी होऊन दोन्ही पक्षांतील कार्यकर्त्यांची जुंपली. त्यांत सुरेंद्रनाथ बानर्जींच्या अंगावर जोडा फेकण्यात आला. तो सुरेंद्रनाथ बानर्जींच्या गालावर बसून फेरोजशहा मेथा यांच्या अंगावर पडला ! टिळकांवर तेथे कोणी हात उगारला असता तर रक्ताच्या थारोळ्याने मंडप भरून गेला असता. टिळक सुपारी खात तेथेच व्यासपीठावरील खुर्चीत बसले होते. लढाई सुरू झाली म्हणजे नेपोलियन तेथेच डुलकी घेई. तशाच प्रकारची ही धीरगंभीर वृत्ती ! तेथे उपस्थित असलेले इंग्लंडचे नेव्हिनसनसाहेब म्हणाले, ' अरे खरा पुरुष तो हाच ! '

काँग्रेस मोडली. त्याला मुख्यतः जबाबदार मवाळ पुढारी. टिळकांचा पक्षही त्यात दोषी होता. टिळकांना जर बहुमताची शाश्वती असती, तर त्यांनी आपले ठराव विषयनियामक समितीत संमत करून घेतले असते. परंतु हा झगडा तत्त्वांचा होता. ' साम्राज्यांतर्गत वसाहतीचे स्वराज्य ' मागणाऱ्या आणि ' संपूर्ण स्वराज्य ' मागणाऱ्या दोन तत्त्वप्रणालींमध्ये हा झगडा चालला होता.

. ५ .

त्यानंतर थोड्याच दिवसांत देशांत क्रांतिकारकांनी बॉंब उडविण्यास सुरुवात केली. देशात क्रांतिकारक चळवळ उग्र स्वरूप धारण करू लागली. वंगवीर खुदीराम बोस ह्यांनी ३० एप्रिल १९०८ रोजी इंग्रज अधिकाऱ्यांवर मुझफरपूर येथे बॉम्ब टाकला. त्यावर केसरीत ' देशाचे दुर्दैव ' ' बॉम्बगोळ्याचे रहस्य ' आणि

' हे उपाय टिकाऊ नाहीत ' असे तीन लेख प्रसिद्ध झाले. त्यामुळे टिळक पकडले गेले. त्यापूर्वीच 'काळ'कर्ते परांजपे आणि काही इतर साप्ताहिकांचे संपादक पकडले गेले होते. त्या सर्वांना शिक्षा झाल्या.

टिळकांनी आपला अभियोग स्वतःच धैर्यशालीपणे चालविला. टिळकांच्या अटकेचा निषेध कामगारांनी हरताळ पाडून केला. टिळकांच्या अभियोगाकडे लेनीन-सारख्या नेत्यांचे, ऑस्ट्रेलियातील आणि युरोपमधील काही राजकारणी लोकांचे लक्ष होते. भारतमंत्री मोर्ले टिळकांवर अभियोग करू नये अशा मताचे होते. डोळ्यात तेल घालून ब्रिटिश महाराज्यपाल मिंटो आणि भारतमंत्री मोर्ले हे अभि-योगाचा वृत्तांत दररोज वाचीत असत. ज्यूरीत सात ब्रिटिश आणि दोन हिंदी गृहस्थ होते. शेवटी २२ जुलै १९०८ रोजी पार्शी न्यायमूर्ती दावर यांनी ' कुजके मन ' आणि ' हिंदभूमीला मिळालेला शाप ' असे लोकमान्यांचे वर्णन करून त्यांना सहा वर्षांची काळ्या पाण्याची शिक्षा ठोठावली. शिक्षा देण्यापूर्वी त्या निस्तब्ध आणि गंभीर वातावरणात रात्री ९ वाजता लोकमान्यांच्या दिव्यवाणीत धीरगंभीरपणे त्या पामरास उत्तर मिळाले, " मला सांगायचे असे फारच थोडे आहे. ज्यूरीने मला दोषी ठरवले तर खुशाल ठरवो. पण मी सांगतो की मी निर्दोषी आहे. या न्यायासनापेक्षा वरिष्ठ अशी लौकिक गोष्टींचे नियंत्रण करणारी शक्ती आहे. आणि कदाचित ईश्वराची अशीच इच्छा असेल की माझ्या दुःख भोगण्यानेच मी अंगीकारलेले कार्य पुढे सरावे. "

बहुतेक सर्व ब्रिटिश पत्रांनी नि अँग्लो-इंडियन वर्तमानपत्रांनी ब्रिटिश सत्तेचा जबरदस्त वैरी कारावासात गेल्यामुळे निःश्वास सोडले ! राष्ट्रीय वर्तमानपत्रांनी सरकारचा निषेध केला. राष्ट्रोन्नतीसाठी टिळकांना हा पुन्हा तुरुंगवास भोगावा लागला. ते अलौकिक असे कर्मयोगी. त्यांनी तो काळ मंडालेच्या कारागृहात कर्म-योगाच्या तपश्चर्येत घालविला. तेथे ' गीतारहस्य ' ग्रंथ लिहून त्यांनी पुन्हा एकदा राष्ट्रास संदेश दिला.

सहा वर्षे वनवास भोगून टिळकांनी पुन्हा १९१४ साली राजकीय चळ-वळीत निर्भयतेने पुढाकार घेतला. त्यांना शिक्षा झाल्यानंतर काँग्रेसची अधिवेशने जेमतेम भरत. फेरोजशहा मेथा युरोपच्या प्रवासास गेले; लाला लजपतराय अमेरिकेत नि विपिनचंद्र पाल लंडनमध्ये होते. राष्ट्रीयसभेचा ' राम ' वनवासास गेल्यामुळे काँग्रेसमध्ये मध्यंतरीच्या काळात ' राम ' उरला नव्हता. थोड्याच दिवसांत गोखले निवर्तले. फेरोजशहा मेथा कालवश झाले. पहिले महायुद्ध सुरू झाले तेव्हा टिळकांनी

तरुणांना युद्धशास्त्राचा अनुभव मिळावा म्हणून धूर्तपणे ब्रिटिश लष्करात भरणा व्हायला सांगितले. त्यात त्यांची दूरदृष्टी नि देशरक्षणाविषयी तळमळ व वास्तववाद ही दिसून येतात. नंतर त्यांनी 'स्वराज्याची चळवळ' सुरू केली. ' स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे आणि तो मी मिळविणारच, ' हे त्यांचे वचन त्यावेळी लोकप्रिय झाले. त्यापूर्वी २ मे १९०८ रोजी अकोल्यास ते प्रथम म्हणाले होते की, स्वराज्य हा प्रत्येकाचा जन्मसिद्ध हक्क आहे.

टिळक आणि ॲनी बेझंट यांच्या त्या स्वराज्याच्या चळवळीने पुन्हा एकदा भारत राजकारणामध्ये तळपू लागला. १९१६ साली टिळकांनी लखनौ काँग्रेसमध्ये प्रवेश करताच त्यांचा जयजयकार झाला. आपल्या त्यागाने, धैर्याने नि तेजाने त्यांनी काँग्रेसचा गाडा पुढे नेला. काँग्रेस–भंजक ठरलेले टिळक आता काँग्रेसचे विधाते ठरले. ऑगस्ट १९१८ मध्ये मॉन्टेग्यु-चेम्सफर्ड सुधारणा जाहीर झाल्या. त्यात ' स्वराज्य हे आमचे अंतिम धोरण आहे ' असे ब्रिटिश सरकारने मान्य केले. भारताने ब्रिटिश सरकारकडून हे धोरण वदवून घेतले. त्यात टिळकांचा सिंहाचा वाटा होता; नव्हे मुख्यतः तेच कारणीभूत होते. पुढे टिळक चिरोलवर अभियोग करावयास लंडनला गेले. आपल्या ' इंडियन अन्रेस्ट ' ह्या ग्रंथात चिरोलने असे म्हटले होते की, भारतातील अत्याचारी कृत्यांमागे टिळकांचे कार्य नि लेखन यांची चिथावणी आहे आणि ब्रिटिश राज्य उलथून पाडणे हाच त्यांच्या भाषणांचा उद्देश आहे. टिळकांच्या नीतिमत्तेवरही त्यांनी शिंतोडे उडविले होते. चिरोलने आपली बदनामी केली असा चिरोलवर टिळकांचा आरोप होता. पण ज्यूरीला चिरोलचे वकील कार्सनसाहेब आणि सरन्यायाधीश डार्लीग ह्यानी सांगितले की, जर टिळकांचा ह्या अभियोगात जय झाला, तर ब्रिटिश अधिकाऱ्यांना हिंदुस्थानात राज्य करणे अवघड होईल. त्यामुळे त्या अभियोगात टिळकांचा पराभव झाला. त्यात त्यांचे फार मोठे आर्थिक नुकसान झाले. लोकांनी त्यांना निधी अर्पण करून ते भरून काढले. अभियोगाचा निकाल विरुद्ध लागला तरी आंतरराष्ट्रीय राजकीय मुत्सद्यांचे भारतीय स्वातंत्र्याकडे लक्ष वेधून घेण्यासाठी टिळकांनी लंडनमध्ये असताना अनेक प्रयत्न केले.

. ६ .

इंग्लंडहून परत आल्यावर टिळकांनी अमृतसर काँग्रेसला जात असता वाटेत महाराज्यपाल नि भारतमंत्री यांना तार पाठविली. त्यात ते म्हणाले, "बादशहास

मेहेरबानांनी असे कळवा की जाहिरनामा आणि माफी याबद्दल ' इंडियन होमरूल लीग ' आणि हिंदी लोक यांचे कृतज्ञपणे आणि राजनिष्ठपणे आभारी आहोत आणि त्या बाबतीत लोकांकडून प्रतियोगी सहकारिता मिळेल असे बादशहास आश्वासन द्या. "

टिळकांची महात्मा गांधींशी अमृतसर काँग्रेसमध्ये चकमक उडाली. टिळकांना शह देण्यासाठी गांधीजी नि मालवीय यांनी श्रद्धानंद यांजकडे बोलणी केली होती. गांधीजींच्या कर्तृत्वावर नि कार्यशक्तीवर टिळकांचा विश्वास होता. टिळक नि गांधीजी दोघेही कर्मयोगी, निर्भय व त्यागी. टिळकांची राहणी साधी. साधेपणात गांधीजींनी टिळकांपुढे भलतीच मजल मारली. दोघांचेही वक्तृत्व साधे, सरळ. टिळक गांधीजींपेक्षा अनेक पटींनी विद्वान, तर गांधीजी टिळकांपेक्षा इंग्रजी भाषेत वरचढ. टिळक परप्रांतीय भाषेत व्याख्यान देऊ शकत नसत. गांधीजी हिंदीत व्याख्यान देत. टिळक म्हणत, मी कायदेशीर चळवळ करतो, तर गांधीजी म्हणत, मी कायदेभंग करतो.

मात्र गांधीजींचे खिलाफतीचे धार्मिक राजकारण टिळकांना फारसे पसंत नव्हते. " असहकारितेला लागणाऱ्या त्यागाकडे लोक वळले, तर आपण तुमच्य चळवळीला पाठिंबा देऊ, " असे टिळकांनी गांधीजींना सांगितले होते. गांधीजींची चळवळ सुरू झाली, तर गांधीजी व आपण दोघांसही सरकार पकडील, म्हणून लंडनला जाऊन तेथे कार्य करण्याचा टिळकांचा बेत होता.[७] तसे वृत्त प्रसिद्धही झाले होते.[८] परंतु ह्या पुरुषोत्तमाचे जीवितकार्य समाप्त होण्याचा समय आला होता. स्वातंत्र्याच्या चळवळीचा गाडा अशा रीतीने स्वराज्याच्या मार्गावर आणून ठेवून, लोकमान्यांनी आपले अवतारकार्य १ ऑगस्ट १९२० रोजी संपविले.

* *

७ खाडीलकरांचा लेखसंग्रह, भाग दुसरा, पृ. १५०–५१.

8 *The Hindu Missionary*, 5 *January* 1920.

# विचारप्रणाली

. १ .

महापुरुष हा कालानुरूप अशी आपली साधने आपणच निर्माण करतो. त्याचे धोरण परिस्थितीच्या परिपाकातून निर्माण होते, हे खरे असले तरी त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा व स्वयमेव कर्तृत्वाचा त्याच्या कालखंडावर परिणाम होतो नि त्यावर त्याचा ठसाही उमटतो, हे तितकेच खरे. शिवाजीनंतर टिळकांनी भारतास त्याच्या परवशतेच्या काळात स्वराज्याचा मंत्र दिला. यास्तव आधुनिक भारताच्या इतिहासात टिळकांचे स्थान अनन्यसाधारण आहे.

बहुजनसमाजाची प्रचलित भावना बदलून शिवाजी आणि टिळक ह्या दोन महापुरुषांनी त्यांना कार्यप्रवण केले. लोकसंग्रह केला, संकटे सोसली आणि निंदाही सोसली. स्वराज्यस्थापनेत जे जे आडवे आले, त्यांचा त्यांचा काटा शिवाजीने अगदी कठोरपणे काढला. त्याच दृष्टीने टिळकांनी आपल्या प्रतिस्पर्ध्यां-वर कठोर हल्ले केले. ज्या ज्या भारतीयाने–मग तो कितीही थोर नि कीर्तिमान असो–ब्रिटिशांची थोरवी गायिली, राज्यकर्त्यांच्या सदिच्छेवर आणि सद्भावनेवर भारताच्या राजकीय भवितव्यासाठी अवलंबून राहा असे म्हटले, वा ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या धोरणाची वा राज्यकारभाराची अघळपघळ स्तुती केली, त्या त्या भारतीयावर टिळकांनी आग पाखडली. जर्मन पँझर तुफानी तुकडीप्रमाणे त्यांचा प्रतिपक्षावर हल्ला होत असे. शंभर सिंह गर्जना करीत अंगावर येत आहेत असे प्रतिस्पर्ध्यांना वाटावयाचे. एक जबरदस्त अश्वशक्तीचा वाफेचा रूळ जणू आपल्या अंगावरून जात आहे, असा त्यांना भास होई. कार्ल मार्क्स वा लेनीन हे जसे आपल्या प्रतिस्पर्ध्यांवर निकराने तुटून पडत, तसेच टिळक आपल्या प्रति-स्पर्ध्यांवर तुटून पडत. टिळकांच्या राजकीय लेखांतून त्यांच्या तेजस्वी व्यक्तिमत्त्वाचा साक्षात्कार होतो व त्यांचे दिव्यदर्शनही घडते.

ज्या पुढाऱ्यांना स्वमत प्रस्थापनेत राष्ट्राचे हित आहे असा प्रबळ

आत्मविश्वास वाटतो आणि जे सामर्थ्यवान, महत्त्वाकांक्षी नि निरपवाद चारित्र्याचे असतात ते प्रतिस्पर्ध्यांच्या मतप्रणालीचा पाडाव करण्यासाठी कोणतेही—ज्यावेळी जे अचूक परिणामकारी होईल असे त्यांस वाटते ते—अस्त्र, शस्त्र, तंत्र वापरीत असतात. त्यामुळे त्यांची भाषा पराकाष्ठेची कडक, कडवट, तिखट, मर्मभेदक बनते. 'अमर्षशून्येन जनस्य जंतुना न जातहार्देन न विद्विषादरः !' (आपला अपमान झाल्याचाही ज्या पुरुषाला राग किंवा चीड नाही त्या पुरुषाची मैत्री असली काय आणि द्वेष असला काय सारखेच) हेच टिळकांचे ब्रीद होते.

"आमचे कुलव्रत असे आहे की हायकोर्टाच्या जज्जापासून तो सुबोध-पत्रिकेच्या एडिटरापर्यंत कोणाचीही भीडमुर्वत न धरता, किंवा माझा बाप, काका, मामा, भाऊ, बायको, मुलगे यांचे अमुक मत आहे याचा विचार न करता जे आपणास खरे दिसेल ते सरकारपुढे मांडावे," असा त्यांचा बाणा होता.

टिळकांच्या घणाघाती आणि कित्येकदा विखारी टीकेमुळे अनेक पुढारी घायाळ झाले. खासगी जीवनात अत्यंत निर्मळ, निरहंकारी, उदारहृदयी नि निष्कलंक असणारे टिळक राजकारणात काही वेळा अत्यंत एककल्ली नि असहिष्णू बनून प्रतिस्पर्ध्यांवर कठोरपणे व निकराने प्रहार करीत. असे प्रहारी नि निर्घृण हल्ले प्रतिस्पर्ध्यांवर भारतीय राजकारणात दुसरे कोणी क्वचितच केले असतील. घायाळ झालेले प्रतिस्पर्धी टिळकांचे जालीम बोल जन्मभर विसरले नसतील. आणि आश्चर्य असे की टिळकांच्या चारित्र्याकडे दोषैक दृष्टीने पाहून त्यांचे चारित्र्य मलिन करण्यास त्यांचे शत्रूही धजले नाहीत. इतके त्यांचे चारित्र्य विमल नि निर्मळ होते.

टिळकांची राजकीय शिकवण अत्यंत निर्भय आणि स्फूर्तिदायक होती. 'असंतोषः श्रियो मूलं ।' हे त्यांच्या जीवनाचे सूत्र होते. 'असंतोष हे सर्व भावी उत्कर्षांचे, प्रयत्नांचे, ऐश्वर्याचे, मोक्षाचे बीज आहे. यशप्राप्तीला असंतोष हे साधन आहे.' हे सूत्र लोकांच्या मनावर बिंबविण्याचा ते प्रयत्न करीत. सर व्हॅलेंटाइन चिरोल यांनी टिळकांना 'भारतीय असंतोषाचे जनक' म्हटले आहे, ते यथार्थच आहे. 'परमेश्वराच्या नावाप्रमाणे स्वराज्याची घोषणा झाली पाहिजे. या बुद्धीप्रमाणे प्रत्येकाने तन, मन, धन अर्पण करण्यास तयार झाले पाहिजे. शरीरास जसे चैतन्य तसे राष्ट्रास स्वातंत्र्य. पूर्ण स्वातंत्र्य असल्यावाचून राष्ट्राची उन्नती कधीही व्हावयाची नाही. पारतंत्र्य म्हणजे विष. स्वातंत्र्य म्हणजे दूध. राजकीय गुलामगिरी म्हणजे नरक, राजकीय स्वातंत्र्य म्हणजे स्वर्ग. स्वातंत्र्य

देवींच्या अधिष्ठानाकरिता श्रीरामाप्रमाणे वनवास किंवा अज्ञातवास सोसल्याशिवाय स्वराज्याची प्राप्ती होऊ शकत नाही. पूर्ण स्वातंत्र्य असल्याशिवाय राष्ट्राची पूर्ण उन्नती व्हावयाची नाही. ' अशी त्यांची तेजस्वी शिकवण होती.

" जरी तुम्ही उपेक्षित आणि अपमानित आहात, तरी ही राज्यव्यवस्था अशक्य करण्याची तुमच्यात जी शक्ती आहे त्याविषयी जर तुम्ही जागृत राहिलात तर तुम्ही तसे घडवू शकता. आठ आण्यांच्या मोठ्या रोजगारावर तुमच्या जागा इंग्रजांना मिळू द्या ! तुम्ही ब्रिटिश राजवटीत दुःखी आहात असे सरकारला सांगा. तुमच्याजवळ शस्त्र नाही. पण तुमच्याजवळ तितकेच मोठे शस्त्र आहे. ते म्हणजे स्वदेशी. जे सरकार साहाय्य, पैसा, कष्ट आणि माहिती यांसाठी तुमच्यावर अवलंबून आहे, त्याचा गाडा तुमची तशी इच्छा असेल तर थांबलाच पाहिजे, " असा त्यांचा स्फूर्तिदायक संदेश होता.

तथापि, टिळकांचे लक्ष गेलेल्या स्वराज्याकडे असल्यामुळे येणारे स्वराज्य कसे असावे, त्यात सर्वांना समानतेचे अधिकार असावे की काय याविषयी त्यांनी फारसा विचार केलेला दिसत नाही. स्वराज्य मिळविणे हेच त्यांचे एकमेव उद्दिष्ट होते. समाजक्रांतिकारक नेते महात्मा जोतीराव फुले आणि न्यायमूर्ती रानडे ह्यांचे येणाऱ्या स्वराज्यात सर्वांना न्याय आणि हक्क मिळाले पाहिजेत असे आग्रहाचे म्हणणे होते. न्यायमूर्ती रानड्यांनी आपल्या अष्टपैलू बुद्धीने व पारदर्शी दृष्टीने देशाची सर्वांगीण प्रगती कशी व्हावी याचा बराच विचार केला होता.

टिळकांचे ' प्रतियोगी सहकारिता ' हे धोरण जशास तसे ह्याच तत्त्व-प्रणालीवर अधिष्ठित होते. प्रसंग व प्रतिस्पर्धी यांनी खिंडीत गाठले असता नरमाईचे धोरण ठेवायचे आणि प्रसंग अनुकूल असून प्रतिस्पर्धी अडचणीत असला तर चढाईचे धोरण ठेवायचे, ह्याच त्याचा अर्थ. शिवाजी ज्या नीतीने औरंगजेबाशी वागला, त्याच नीतीने आपण इंग्रजांशी वागले पाहिजे, असे होते टिळकांचे धोरण. त्यात टिळकांचा व्यवहारवादी दृष्टिकोण आणि मुत्सद्दीपणा दिसून येतो. ' साधुपणाने निवारण होणे शक्य नसेल, तर जशास तसे होऊन दुष्टाचे निवारण करू नये, त्याच्या दुष्ट कृत्यास साधू पुरुषांनी खुशाल बळी पडावे असे आमच्या धर्मग्रंथ-कारांनी कोठेही प्रतिपादन केलेले नाही. आपल्या दुष्ट कृत्याने लोकांचे गळे काप-ण्यास जो पुरुष प्रवृत्त झाला, त्यास इतरांनी आपल्याबरोबर साधुपणाने वागावे असे म्हणण्याचा कोणताही नैतिक हक्क राहिलेला नसतो. ' ' आघाताइतकाच प्रत्याघात ' असा हा अचेतन सृष्टीतील कर्मांचा न बदलणारा कायदा आहे त्याचेच

नात्र जशास तसे. हे सचेतन सृष्टीतील रूपांतर आहे, ' असे त्यांनी स्पष्ट म्हटले आहे.

ह्या तत्त्वासंबंधी गांधीजी आणि टिळक ह्या दोघांमध्ये वादविवाद झाला. टिळक म्हणाले, ' राजकारण हा व्यवहारी जगातील मनुष्याचा डाव आहे. तो संतांचा नव्हे. ' गांधीजींनी त्याचा विपरीत अर्थ केला. ते म्हणाले, "टिळकांच्या मते साधूंना जगात स्थान नाही. " साधूंनी भौतिक जगातील राजकारणाच्या डावपेचात भाग घेऊन आपणास मलिन करून घेऊ नये. मनुष्य स्वतः कितीही उच्च नैतिक पातळीवर जीवन जगत असला, तरी ह्या व्यवहारी जगात कुठेतरी त्याला आपल्या साधुपणाला मुरड घालावी लागते. तसे वागण्यात त्या साधुपुरुषाचा हेतू मात्र निःस्वार्थी असावा, असे टिळकांचे मत होते. ते यथार्थच होते.

'गीता' हे महाभारताचे रहस्योपनिषद आहे. सर्व वैदिक धर्मांचे सार आहे. 'गीता' हे वेदान्तातील नीतिशास्त्र होय,असे टिळक मानीत.'गीतारहस्य' हा टिळकांचा महान ग्रंथ. तो त्यांच्या तत्त्वज्ञानाचा अमर कोश आहे. कर्मयोग हे देशकालनिरपेक्ष सार्वकालीन सर्वश्रेष्ठ नीतितत्त्व आहे, हेच त्यांनी त्यात विशद करून सांगितले आहे. भारतीय तत्त्वज्ञान अध्यात्मावर अधिष्ठित असल्यामुळे धर्म (नीती), अर्थ, काम ह्यांपेक्षा मोक्षाला त्यात अधिक प्राधान्य दिले आहे. पाश्चात्य दार्शनिकांच्या विचारांचा भर समाजधारणा, सर्वभूतहित आणि व्यक्तीचा पूर्ण विकास ह्या ऐहिक नितिशास्त्रीय तत्त्वांवर आहे. शिवाय नवकर्मपर नि प्रवृत्तीपर अर्थ लावताना टिळकांनी ' कर्मयोग ', ' धर्म ' ह्या संज्ञांचे अर्थ बदलून अद्वैतवादावर, कर्मयोगाचे कलम बसविले आहे, असे काहींचे म्हणणे आहे. ' या कलियुगामाजि । जो तो गीतार्थ योजी । मतानुसार ॥ ' हे कवी वामन पंडितांचे मत उधृत करून, टिळकांनी स्वतःच म्हटले आहे की, ' गीते 'वर जी भाष्ये व टीका सध्या उपलब्ध आहेत त्या निरनिराळे सांप्रदायिक आचार्य व त्यांचे अनुयायी यांच्या आहेत, व त्यामुळे ज्याने त्याने गीतार्थ आपल्या सांप्रदायास अनुकूल होईल अशा रीतीने निरुपिला आहे.[१] असे असले तरी त्यांनी कर्मसंन्यासाच्या सिद्धांतावर हल्ला चढवून प्रयत्नवादाची शिकवण दिली आणि कर्मसंन्यास मार्ग बंद केला हे खरे. यास्तव ' गीतारहस्य ' म्हणजे ' गीता ' अधिक टिळक असेच समीकरण करणे उचित होईल. प्रपंच नि परमार्थ कसा साधावा ही शिकवण देणारा ' गीतारहस्य ' हा ग्रंथ त्यांच्या जीवनाचा

१ संपादक न. चिं केळकर, निबंधकार टिळक, पृ. १६.

वेद आहे. शंकराचार्य, मध्वाचार्य नि रामानुजाचार्य यांच्या इतकेच टिळकांचे पांडित्य, तत्त्वज्ञान, व्यक्तिमत्व नि चारित्र्य भव्य व विमल असल्यामुळे ते त्यांच्या पंक्तीत विराजमान झाले आहेत. टिळक पूर्वकाळात जन्मास आले असते, तर त्यांना प्रतिशंकराचार्यच मानण्यात आले असते. रामदासाच्या ' दासबोधा 'चा टिळकांवर बराच परिणाम झालेला दिसतो. ज्ञानी पुरुषाने लोककल्याणासाठी लोकसंग्रह करावा. मनुष्याने निर्हेतुकतेने आपले कार्य करावे, हा आहे 'गीतारहस्या'चा मथितार्थ.

. २ .

टिळक क्रांतिकारक पक्षाचे नव्हते.[२] ते गांधीजींसारखे असहकारितेचे धोरण चालविणारे होते, गांधीवादाशी त्यांचे बरेच साम्य होते असे विचार मांडणारे गांधीवादाच्या प्रभावळीतील आचार्य नि प्राचार्य टिळकांच्या मृत्यूनंतर पुढे येऊ लागले. ' मी सशस्त्र बंड देखील सनदशीर समजतो. आज ते शक्य नाही इतकेच. जर सशस्त्र बंडाला यश येईल अशी कोणी आठ आणे जरी खात्री दिली तर बाकीच्या आठ आण्यांबद्दल परमेश्वरावर विश्वास ठेवून मी बंड पुकारीन ' हे टिळकांचे उद्गार सर्वश्रुत आहेत. ' जर शक्य असते तर बंड करून ब्रिटिश सरकार येथून नाहीसे केले असते,' असे त्यांनी ब्रिटिश राज्यपाल विलिंग्डन साहेब यांस ठणकावून सांगितले होते. लाला लजपतरायसारखा पुरुष हद्दपार होतो आणि मिंटो जिवंत कसा राहतो, हे त्यांचे उद्गार त्यांच्या मनातील खळबळ व्यक्त करतात. कायदेशीर चळवळ फलद्रूप झाली नाही, तर दुसरा श्रेयस्कर मार्ग पत्करावा लागेल, हे त्यांचे वक्तव्य प्रसिद्ध आहे. कोणताही शेवटचा बंडखोरीचा अती जालीम उपाय ज्याला जो सुचेल तो अवलंबण्यास मी तयार आहे, असे ते म्हणत, त्यातले इंगित हेच होते. आणि म्हणूनच, ' टिळकांचे मार्ग व माझे मार्ग हे काही एकच नाहीत, ते भिन्न आहेत ' असे म. गांधी म्हणत. [२] टिळकांचे मार्ग ' Devilish ' राक्षसी आहेत असे गांधीजींचे म्हणणे होते.[३]

इंग्रज अधिकाऱ्यांना ठार मारा असे टिळकांनी क्रांतिकारकांना प्रत्यक्ष सांगितले नसले, तरी त्यांच्या लढाऊ राजकारणापासून क्रांतिकारकांना स्फुरण चढले यात तिळमात्र शंका नाही. दामोदरपंत चाफेकर, सावरकर, बापट यांच्याशी

2. *Young India*, 13 July 1921.

३. लो. टिळक यांच्या आठवणी व आख्यायिका, खंड १ ला, पृ. ४१३.

असलेले त्यांचे संबंध, बापटांकडून बॉम्ब मॅन्युअल मागवून प्रत्यक्ष बॉम्बचे प्रयोग करून पाहाण्याचे त्यांचे धाडस, नेपाळमध्ये खाडिलकरांकरवी शस्त्रांचा कारखाना काढण्याचे त्यांचे प्रयत्न, गोव्यात एम्डनकडून रणसाहित्य मिळविण्याचे पुण्यातील तरुणांचे प्रयत्न, ह्या सर्व गोष्टी विचारात घेता टिळकांना गांधीवादाच्या अहिंसावादी असहकारितेच्या चौकटीत नेऊन बसविणे हे हास्यास्पद आहे. क्रांतिकारकांच्या त्यागाविषयी टिळकांना आदर वाटे. बाळकृष्ण चापेकर हैद्राबाद संस्थानांतील जंगलात लपून राहिले असता, त्यांच्या अन्नपाण्याची सोय त्यांनी केशवराव कोरटकर यांच्या करवी केली. 'आमच्या एका हिंदी मनुष्याला तुमच्या रशियन मिलिटरी अकादमीमध्ये लष्करी अधिकाऱ्याचे शिक्षण देऊन तयार करून द्याल काय ?' अशी १९०५ साली टिळकांनी मुंबईतील रशियन वकिलातीकडे बोलणी केली होती. तसा पत्रव्यवहारही केला होता. ब्रिटिशांची सत्ता सशस्त्र प्रतिकाराने उलथून पाडण्याचा त्यांचा मानस होता, असे रशियन इतिहासकारांनी म्हटले आहे.[४]

ह्यावरून दिसून येईल की, क्रांतिकारकांच्या कार्याला त्यांचा हार्दिक पाठिंबा होता. त्यांनी गांधीजींप्रमाणे क्रांतिकारकांना आपणहून सरकारच्या स्वाधीन व्हायला सांगून क्रांतिकारकांचा तेजोभंग वा बीमोड करण्याचा प्रयत्न कधीच केला नाही.

नीतीच्या सामान्य नियमाने नेहमीच काम भागत नसून, नीतिशास्त्रातील मुल्य म्हणजे अहिंसेच्या नियमातही कर्तव्याकर्तव्याचा तारतम्य विचार सुटत नाही, असेच त्यांनी सांगितले आहे. यावरून सापेक्ष अहिंसा हे पुण्य आहे असेच त्यांचे मत होते हे सांगावयास नकोच. राजकारणात त्यांनी सत्य-अहिंसेचा काथ्याकूट केला नाही. राष्ट्र बलसंपन्न नि ज्ञानसंपन्न कसे होईल ह्याचीच ते अहोरात्र चिंता बाळगीत असत.

टिळकांनी काहीसा धूर्तपणे व काहीसा मनोभूमिकेमुळे कायदेशीरपणावर भर दिला होता. कायद्याने प्रस्थापित झालेल्या इंग्रजांच्या राज्याविरुद्ध टिळकांनी कायद्याचा अर्थ नि कीस काढून, कायद्याच्या कक्षेत कुशलतेने राहून बंड करण्याची कसरत केली. आपणास राजद्रोह्यांचा मुकुटमणी आणि खुनी म्हणणाऱ्या इंग्लंडच्या 'ग्लोब' वर्तमानपत्रास नि मुंबईच्या 'टाइम्स ऑफ इंडिया' पत्रास त्यांनी नाक घासावयास लावले. टिळक राजद्रोही आहेत आणि अत्याचाराला ते चिथावणी

4. *The Times of India*, 3 June 1963.

देतात असे म्हणणाऱ्या चिरोलवर त्यांनी अभियोग केला. परंतु त्यात त्यांना अपयश आले, हा भाग वेगळा. इंग्रजी राज्यातील न्यायाची वरिष्ठ कोर्टेदेखील जेव्हा सर्वस्वी सरकारच्या कह्यात जातील तेव्हा ते राज्य जाण्यास विलंब लागणार नाही; जेव्हा राज्यसत्ता न्यायदेवतेला बंदिस्त करते तेव्हा राज्यसत्तेचे नैतिक अधिष्ठान ढासळून पडते, राज्यकारभार कोसळतो, अशी त्यांची मनोभावना होती.

मुसलमानांना ऐतिहासिक परंपरा नि नियम दाखवून त्यांच्याशी तडजोड करावी, असे टिळकांचे मत होते. दहा मुसलमानभाई दुखवायचे नाहीत म्हणून दहा हजार हिंदूंनी आपली मते नि मने मारावी हे त्यांना मान्य नव्हते.

एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेची अहोरात्र चिंता वाळगणाऱ्या रानड्यांच्या मताविरुद्ध बंड करून, टिळकांनी हिंदु–मुसलमान दंग्यांची खरी हकीकत देऊन हिंदूंची बाजू निर्भयपणे मांडली. मुसलमानांच्या अरेरावीचा निषेध केला. त्या वेळच्या एका लेखात टिळक म्हणतात, "कायदेशीर हक्क असला तरी सौजन्याने तो हक्क बजाविण्याचा आग्रह धरू नका असा जो मुंबई सरकार व ख्रिस्ती बंधू आम्हांस उपदेश करीत आहेत, तो अगदी एकतर्फी व चुकीचा आहे. मुसलमान लोकांशी सौजन्याने वागू नये अथवा शेजारधर्म पाळू नये, असे आम्ही बिलकूल म्हणत नाही. उलट शेजाऱ्यांकरिता प्रसंगविशेषी झीज सोसण्यासही आपण तयार असले पाहिजे असे आमचे मत आहे. पण हे शेजारधर्म कोठपर्यंत? एकमेकांचा सलोखा आहे तोपर्यंत. शिवाय शेजार धर्म दोघांसही सारखेच लागू आहेत, हेही लक्षात ठेविले पाहिजे....मुसलमानांच्या मशिदीवरून हिंदूंनी वाजत मिरवणूक काढू नये व मुसलमानांनी मात्र आमच्या देवांचा व देवळांचा यत्किंचित् मान राखू नये, हा न्याय कोठला? मुसलमान लोक जर शिष्टसंप्रदाय आणि सौजन्य यांजकडे लक्ष देऊन हिंदू लोकांशी वागण्यास तयार असतील, तर हिंदू लोक त्यांच्याशी सभ्यपणाच्या रीतीने वागण्यास कधीही मागे घ्यायचे नाहीत.[५]"

अशी टिळकांची विचारसरणी असताही त्यांनी मुस्लिम लीगशी लखनौ येथे करार केला. मुसलमानांना इंग्रज सरकार विभक्त मतदार संघ देणार ते त्यांनी एकीसाठी अगोदरच देऊन टाकले. शिवाय हिंदुबहुसंख्याक असलेल्या प्रांतांतील विधिमंडळांतील जागांचे झुकते माप त्यांच्या पदरात टाकले. गांधीजींची खिलाफत चळवळ त्यांना फारशी मान्य नव्हती. मुसलमान एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेने हिंदूंशी

५. लो. टिळकांचे केसरीतील लेख, भाग १ ला, पृ. ३११.

समरस होतील; आपली अहिंसा, सत्य, बंधुता ही उदात्त तत्त्वे ते उराशी बाळगतील ही म. गांधीजींची भावना केवळ भोळीच नव्हती तर इतिहासाला सोडूनही होती. टिळकांची तडजोड ही सामर्थ्यवान नि मुत्सद्दी पुरुषाची होती. वेळ पडली तर मुसलमान नेत्यांच्या देशविघातक धोरणावर नि दुराग्रहावर मात करू, अशी त्यांची खात्री असावी. गांधीप्रणीत हिन्दु-मुसलमान एकी ही जशी काही रजपूत सरदारांनी पडखाऊ वृत्तीने मोगलांशी केली तशीच होती, असे म्हणणे वावगे नाही.

शेतकऱ्यांच्या उन्नतीसंबंधी टिळकांनी लेख लिहिले. परंतु त्यांच्या परिस्थितीत सुधारणा व्हावी म्हणून जेव्हा जेव्हा सरकार प्रयत्न करी तेव्हा तेव्हा टिळक, गोखले, फेरोजशहा मेथा हे श्रीमंतांची नि जमीनदारांची बाजू घेऊन सरकारशी भांडत असत. टिळक शेतकऱ्यांची बाजू घेत तेव्हा त्यांच्या लेखांचा नि भाषणांचा सूर असा असे की, शेतकऱ्यांच्या कर्जबाजारी अवस्थेला केवळ सरकार कारणीभूत आहे. सावकार वा जमीनदार हे त्या विपन्नावस्थेला किती जबाबदार आहेत, हे ते कधीच स्पष्टपणे वा निर्भयपणे सांगत नसत. सावकार, जमीनदार व शेतकरी ह्यांना ब्रिटिश राजवटीविरुद्ध उठवणे हेच त्यांचे प्रामुख्याने उद्दिष्ट असे. ' शेतकऱ्यांनो वा सावकारांनो सावध राहा,' 'सावकार मेला आणि कुणबीहि मेला' ' खोतीच्या हक्कावर घाला ' आणि ' कुलकर्ण्यांच्या हक्कावर गदा ' अशी ते ओरड करीत !

सावकार किंवा जमीनदार यांच्यापासून शेतकऱ्यांच्या जमिनींचे रक्षण व्हावे म्हणून एक विधेयक विधि-मंडळांत मुंबई सरकारने १९०१ साली विचारासाठी ठेवले. त्याविरुद्ध सावकारांनी मोर्चा काढला. टिळकांनी त्या विधेयकाविरुद्ध लेख लिहिले. गोखले, मेथादी नेते सभात्याग करून विधिमंडळाबाहेर पडले. टिळकांनी त्यांचे अभिनंदन केले आणि सरकारची मर्मभेदक थट्टा केली. ह्यापूर्वीच महात्मा जोतीरावांनी आणि त्यांचे सहकारी लोखंडे नि भालेकर ह्यांनी शेतकऱ्यांच्या विपन्नावस्थेविषयी ओरड केली होती. गाऱ्हाणी मांडली होती. परंतु त्या काळी ही गाऱ्हाणी टिळक, गोखले आदी नेत्यांना नीट समजली नसावीत, किंवा आपले वतनदार, सावकार नि जमीनदार अनुयायी नाखूष होतील ह्या भीतीने म्हणा, ह्या प्रश्नाविषयी त्यांनी लिहिलेच तर गुळमुळीत लिहून मोकळे होत.

टिळकांनी राष्ट्रीय शिक्षणविषयक विचार राष्ट्रोन्नतीच्या दृष्टीनेच मांडले होते. ' पूर्वजांच्या अनुभवांविषयी जे ज्ञान देते त्याला शिक्षण म्हणतात. विद्यार्थ्यांच्या मनात देशाविषयी विचार जागृत करते ते राष्ट्रीय शिक्षण, विद्यार्थ्यांना धार्मिक शिक्षण दिले नसल्यामुळे ख्रिश्चन धर्मोपदेशकांचा ह्या देशावर प्रभाव पडत

आहे. धर्मातीत शिक्षण हे शीलसंवर्धनास पुरेसे नाही. धर्मामुळे जे मतभेद आहेत ते विसरून चालले पाहिजे. त्यात देवाणघेवाण करावी. '

' जरी इंग्रजी भाषा शिकल्यावाचून गत्यंतर नाही, तरी मुलांना इंग्रजी भाषा शिकण्याची सक्ती नसावी. बुद्धी कमीअधिक असली तरी सर्वांवर राष्ट्रीय विचारांचा ठसा उमटला पाहिजे. दादाभाईंची नि रमेशचंद्र दत्तांची पुस्तके शाळेत शिकवून, सरकारी धोरणाने आम्ही दरिद्री झालो आहोत असे आम्ही मुलांना शिक्षण दिले पाहिजे. मला मिळालेले ज्ञान मराठीत मिळाले असते तर हे सर्व बावन्न वर्षांचे ज्ञान मला पंचवीसाव्या अगर तिसाव्या वर्षीच मिळाले असते. विद्यार्थ्यांना औद्योगिक शिक्षणही दिले पाहिजे. ' ' सत्तेचे विकेंद्रीकरण करावे. शासनसंस्था नि न्यायसंस्था यांची फारकत केली पाहिजे. भाषावार प्रांतरचना करावी, ' असे त्यांचे म्हणणे होते. देशात अनेक ठिकाणी राष्ट्रीय शाळा निघाल्या. त्यांतून देशभक्त कार्यकर्ते निर्माण झाले. टिळकांनी दारूबंदीची चळवळही केली होती. आजच्या काळांत टिळकांचे हे विचार बहुतांशी कृतीत आले आहेत. मात्र टिळकांच्या जीवनात प्रांतीयतेच्या भावनेपेक्षा राष्ट्रीय भावनेस प्राधान्य होते हे लक्षात ठेवले पाहिजे.

टिळकांची राजकारणी दृष्टी कुठपर्यंत पोचत होती, ज्ञान आणि सामर्थ्य ह्यांची महती ते राष्ट्रास कसे पटवून देत होते, हे त्यांच्या खाली उद्धृत केलेल्या उद्गारांवरून दिसून येईल. ' आधिभौतिक शास्त्रांची अर्वाचीन काळी अश्रुतपूर्व वाढ झाली असून दृश्य सृष्टीचे मनुष्याचे ज्ञान पूर्वीपेक्षा शेकडोपट वाढले आहे. आणि ' जशास तसे ' या न्यायाने जे प्राचीन राष्ट्र हे आधिभौतिक ज्ञान संपादन करून घेणार नाही त्याचा सुधारलेल्या नवीन पाश्चिमात्य राष्ट्रापुढे टिकाव लागणे अशक्य होय. ' [६] त्यांनी दिलेला हा इशारा राष्ट्रातील धुरिणांना आजही उद्बोधक आहे. ' आशिया खंडाच्या भावी स्थितीचे विचार हिंदुस्थानच्या राजनीतीचा पाया होय. हिंदुस्थान देश आशिया खंडाचे नाक आहे. [७] व आशिया खंडाचे वैचित्र्य आणि स्वातंत्र्य कायम राहिले तरच हिंदुस्थानातील लोकांना काही तरणोपाय आहे. ' भारताच्या हिताच्या दृष्टीने आंतरराष्ट्रीय राजकारणात त्यांनी कोणते धोरण ठेवले असते ते ह्यावरून दिसून येते.

---

६ टिळक–सूक्ति–संग्रह, पृ. १८.

७. कित्ता, पृ. २१.

जुनी, आणि नवीन साम्राज्ये ह्याविषयी टिळकांचे मत मार्मिक होते. ते असे की, ' जुनी हिंदुसाम्राज्ये जित राष्ट्राकडून आपले आधिपत्य मान्य करून घेत. अश्वमेध हीच आधिपत्य स्थापण्याची रीत होती. हिंदी साम्राज्ये जित राष्ट्रांच्या अंतर्गत राज्यव्यवस्थेत ढवळाढवळ करीत नसत. परंतु प्राचीन रोमन साम्राज्य जित राष्ट्रातील लोकांना बरोबरीचे नागरिक हक्क देत नसे. अर्वाचीन साम्राज्ये जित राष्ट्रांच्या राज्यव्यवस्थेत हस्तक्षेप करतात. ब्रिटिश साम्राज्य हिंदुस्थानची पिळवणूक करीत आहे. परंतु एक दिवस तेही नाश पावेल. त्या समयी हिंदुस्थान दुर्बळ नि संरक्षण करण्यास असमर्थ असता कामा नये. '

. ३ .

लोकमान्यांचे मुख्य ध्येय स्वराज्य संपादन करण्याचे असल्यामुळे त्यांनी इंग्रज राज्याविषयी देशात असंतोष भडकविण्याच्या कार्यावर भर दिला. त्यांनी भारताच्या स्वराज्य संपादनाच्या लढ्यास तेज, स्फूर्ती आणि प्रेरणा दिली. त्या काळच्या बहुतेक प्रतिष्ठित पदवीधरांचा कल नेमस्त पक्षाकडे असल्यामुळे जुने नेतृत्व बदलताना सामान्य नवशिक्षित व अर्धवट अशिक्षित लोकांच्या शक्तीच्या बळावर लोकमान्यांना आपले काम पुढे रेटावे लागले. या अर्थानेच त्यांना तेल्यातांबोळ्यांचे पुढारी म्हणत. ते अनुयायी बहुतेक सनातनी वृत्तीचे होते. त्यांचे मुखंड कार्यकर्ते बहुसंख्येने ब्राह्मण समाजातीलच होते. ह्याचा परिणाम असा झाला की, राजकीय बाबतीत प्रगतिशील आणि प्रभावी असलेले टिळक, सामाजिक प्रश्नांबाबत शेवटपर्यंत पुनरुज्जीवनवादी आणि अपरिवर्तनवादी राहिले.

नेतृत्वाविषयी टिळकांचा जो सिद्धांत होता तोही सनातनीपणाला पोषक ठरला. त्या सिद्धांताप्रमाणे ' पुढारी हे लोकांचे धनी नव्हेत तर चाकर होत. जोपर्यंत पुढाऱ्यांचे मत लोकमताहून फारसे भिन्न नसते तोपर्यंत लोकांच्या आदरास ते पात्र होतात. परंतु पुढाऱ्यांचे मत लोकमताहून अगदी भिन्न असले म्हणजे अर्थातच तेवढ्या पुरता तरी काडी मोडून देण्याचा प्रसंग येतो. लोकांचे मत सरकारास कळविले म्हणूनच सार्वजनिक सभेस किंमत आली आहे. रावबहादुरांचे मत कळविले म्हणून नव्हे. हे सभेने लक्षात ठेविले पाहिजे व हे लक्षात न ठेवील, तर आपल्याच हाताने आपल्या पायावर धोंडा पाडून घेईल.....उद्योगधंद्यात, व्यापारात, वैद्यकीत, वकिलीत, शेतकीत, सावकारीत आणि इतर धंद्यांत जो तो आपापल्या मानाने व योग्यतेने कोठे पाच-पंचवीस व कोठे दोन–चारशे लोकांचा

पुढारी होत असतो. लोकांनी अशा तऱ्हेने ज्यास मान दिला आहे अशा शेकडो लोकांस रावबहादुरांचे मत जर ग्राह्य होईल तर रावबहादुरांचे मत लोकमत होईल व रावबहादुर लोकमताचे प्रतिपादक आहेत असे म्हणता येईल. रावबहादुरांचे मत जर शेकडो पुढाऱ्यांस कबूल नसेल, तर या शेकडो लोकांचे मत ते लोकमत व रावबहादुरांचे मत ते व्यक्तीचे मत असे म्हणावे लागेल.'[८]

'प्रत्येकास आपापल्या मताचा थोडाबहुत अभिमान असतोच व त्या अभिमानानेच जो तो आपले मत तडीस न्यावे याबद्दल खटपट करीत असतो. सर्वांची भिस्त लोकसमुदायावर असते. समाज ज्याचे मत घेऊन चालेल त्याचे मत त्यावेळेस खरे मानिले पाहिजे व हे तत्त्व लक्षात ठेवूनच ग्लॅडस्टनसारखे मुत्सद्दी लोकमत जागृत करून आपणास अनुकूल करून घेण्याचा प्रयत्न करीत असतात. आमच्या सुधारकांस ही गोष्ट कळत नाही किंवा जाणून बुजून तिचा ते अव्हेर करतात, ही त्यांची मोठी चूक आहे.'[९]

टिळकांच्या लोकप्रियतेची नि सनातनी वृत्तीची गुरुकिल्ली वरील विचार-सूत्रातच आहे. लोकमताचे आविष्करण करणे हाच त्यांचा देहस्वभाव होता. लोकमताचे नियमन करणे हा त्यांचा बाणा नव्हता. राजकीय जागृती हे ध्येय ठरविल्यामुळेच, लोकमत विचाराच्या मुशीतून बाहेर पडावे असा त्यांनी प्रयत्न केला नाही. लोकक्षोभ आणि लोकमत यात फरक नाही का ?

यास्तव त्यांनी संमतीवयाच्या विधेयकाच्या वेळी सनातन्यांची बाजू घेतली. त्या विधेयकाचा हेतू असा होता की, जर एखाद्याची पत्नी बारा वर्षांची झाली नसेल तर त्याने तिच्याशी संभोग करू नये. ती वयोमर्यादा दहा वर्षांची असावी असे म्हणणे, ही भयंकर गोष्ट होती. ह्या विधेयकास टिळकांनी विरोध करावा हे त्यांना भूषणावह नव्हते. ह्या प्रकरणात 'सरकारचा हस्तक्षेप' हा खरा विरोधाचा मुद्दा नव्हता.

यापूर्वी सरकारने कायद्यान्वये सतीची चाल बंद केली होती. विधवा-विवाहाचा कायदा केला होता. मुलांचे बळी थांबविले होते. गंगानदीच्या घाटा-वरील जोग्यांच्या आत्महत्या थांबविल्या होत्या.

सामाजिक परिषदेच्या कार्यास टिळकांचे मत अनुकूल नव्हते. टिळक

८. लो. टिळकांचे केसरीतील लेख, भाग १ ला–पृ. २२१--२२.

९. किता, पृ. १२६.

सामाजिक परिषदेस उपस्थित राहिले तर सुधारकाग्रणींना तीव्र विरोध करीत असत. १८९१ साली सामाजिक परिषदेत टिळकांनी प्रश्नोत्तरे करून गोंधळ उडविण्याचा प्रयत्न करताच त्या सामाजिक परिषदेचे अध्यक्ष दादासाहेब खापर्डे ह्यांनी त्यांना हकालपट्टीची तंबी दिली. सामाजिक परिषद काँग्रेसच्या मंडपात भरू नये म्हणून टिळकांनी पुढाकार घेतला होता. १८९०साली कलकत्त्याच्या अधिवेशनामध्ये याबाबतचा सनातन्यांचा अर्ज त्यांनीच काँग्रेसच्या अध्यक्षांना नेऊन सादर केला होता.

वेदोक्त प्रकरणात तर सनातनी पुरोहितांची त्यांनी उघड उघड बाजू घेतली. ब्राह्मणेतरांनी वेद वाचण्याचा आग्रह धरू नये असा 'केसरी'त 'मराठे आणि वेदोक्त कर्म'[१०] ह्या मथळ्याखाली अग्रलेख प्रसिद्ध झाला. त्यानंतर रावबहादूर केशव सीताराम बोले त्यांना पुण्यास जाऊन भेटले आणि त्या लेखाचा अर्थ काय असे विचारले. टिळक त्यांना म्हणाले, 'मी तो लेख लिहिलेला नाही.' त्यावर बोले म्हणाले, 'जर तो तुम्हाला मान्य नाही तर तसे प्रसिद्ध करा.' पण तो लेख लोकमान्य टिळकांचाच आहे असे टिळक-चरित्रकार[११] साहित्यसम्राट केळकर ह्यांनी म्हटले आहे. शिवाय "लो. टिळक यांची गेली आठ वर्षे" ह्या कुलकर्णीकृत ग्रंथावरूनही[१२] तेच दिसून येते. राजकीय प्रश्नासाठी खाडिलकरांनी लिहिलेल्या लेखांमुळे टिळकांनी दोन वेळा कारावास भोगला. न्यायालयात सिंहगर्जना केली. परंतु सामाजिक सुधारणेविरुद्ध आलेले 'केसरी'तले लेख त्यांचे स्वतःचे असता ते आपल्या अनुपस्थितीत लिहिले गेले एवढेच सांगून ते स्तब्ध बसत. यावरून काय स्पष्ट होते, हे सांगण्याची आवश्यकता आहे असे नाही.

शिवाजीला वेदोक्त अभिषेक करणाऱ्या गागाभट्टावर महाराष्ट्रातील ब्राह्मणांनी बहिष्कार टाकला तेव्हा शिवाजीने पुरोहित वर्गाखेरीज सर्व ब्राह्मणांना नोकरीतून काढून टाकले.[१३] जर शिवाजीने वेदोक्त पूजा करणे धर्मबाह्य वर्तन होते, तर ब्राह्मणांनी पुरोहितगिरीविना कोणतेच काम करू नये असे शिवाजीने फर्मान काढले ते योग्यच होते.

---

१०. केसरी, २९ आक्टोबर १९०१.

११. पहिला खंड, पृ. ८७१.

१२. आप्पाजी विष्णु कुलकर्णी, पृ. २००.

१३. सरदेसाई, 'हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास,' भाग २, मराठी रियासत; पूर्वार्ध पृ. ४९४, (द्वि. आवृत्ति १९१५)

लोकमान्यांनी हिंदुधर्मलक्षणाची वा ' हिंदू ' ह्या संज्ञेची ' प्रामाण्यबुद्धिर्वेदेषु साधनानामनेकता । उपास्यानामनियमश्चेतद्धर्मस्य लक्षणम् ॥ ' अशी व्याख्या केली. जो वेद प्रमाण मानतो तो हिंदू. परंतु ऐंशी टक्के हिंदूंनी वेद प्रमाण मानावे आणि ते वाचण्याचा आग्रह धरू नये किंवा वेदोक्त संस्कार करण्याचा त्यांनी आग्रह धरणे चुकीचे आहे, कारण त्यांत काही भूषण नाही, बहुमान नाही, देशकार्यही नाही, असे म्हणणे अयोग्य आहे. मुसल्मान जगाच्या पाठीवर कुठेही असला तरी कुराण वाचू शकतो; ख्रिश्चन बायबल वाचू शकतो. ऐंशी टक्के हिंदूंनी आपणांस हिंदू म्हणवून घ्यावे. पण आपला धर्मग्रंथ वाचण्याचा वा अभ्यासण्याचा आग्रह धरू नये, हे टिळकांचे धोरण निखालस पक्षपाती, विघातक नि अन्यायकारक होते. मॅक्स मुल्लरने वेद वाचले तरी त्यांना चालत होते. टिळकांनी देशकालाला प्रतिकूल अशा मताचे प्रतिपादन करावे हे आश्चर्य नव्हे काय? ज्ञानेश्वरांनी म्हटले, ' वेदसंपन्न होय ठाईं । परि कृपणु ऐसा आनु नाहीं । जे कानीं लागला तिहीं । वर्णांच्याचि ॥ येरां भवव्यथा ठेलिया । स्त्री-शूद्रादिकां प्राणियां । अनवसरू मांडू-नियां । राहिला आहे ॥ ' वेदसंपन्न खरा, पण त्याच्यासारखा कृपण दुसरा कोणी नाही. कारण तो ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्या तीन वर्णांच्याच कानी लागला. त्यांनाच आपले हृद्गत कानात सांगतो. याशिवाय जे स्त्रीशूद्रादिक जीव संसार-व्यथेने पीडित झालेले आहेत, त्यांना शिवाव होण्याला सवडच नाही असे म्हणून तो स्वस्थ बसला आहे. म्हणून ज्ञानेश्वर पुढे म्हणतात, ' मला असे दिसते की, तो आपला मागील उणेपणा जाऊन, आपल्यास सत्कीर्ती मिळावी या हेतूने, वाटेल त्याने आपले सेवन करावे म्हणून हा वेदच गीतारूपाने प्रकट झाला आहे.' सहाशे वर्षांपूर्वी ज्ञानेश्वरांनी जे अधिकार मान्य केले ते पुण्यातील ह्या पुनरुज्जीवनवादी मंडळींनी संपुष्टात आणले !

याचा महाराष्ट्रावर अनिष्ट परिणाम झाला. पुनरुज्जीवनवादी विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी सत्यशोधक समाजाच्या चळवळीवर विषारी हल्ले करून महा-राष्ट्रात ब्राह्मण नि ब्राह्मणेतर यांमध्ये तेढ निर्माण करून महाराष्ट्र दुभंगून ठेवला होता, तो आता टिळकांच्या ह्या वेदोक्तासंबंधीच्या धोरणामुळे स्पष्टपणे दुभंगून गेला. टिळकप्रणीत हिंदूंच्या संकुचित व्याख्येमुळे आणखी एक मोठा तोटा असा झाला की, बौद्ध, जैन आणि शीख हे टिळकांच्या हिंदुधर्मापासून दुरावले, कारण ते वेदाला प्रमाण मानीत नाहीत. सावरकरप्रणीत हिंदूंच्या व्याख्येत बौद्ध, जैन नि शीख ह्या सर्वांचा समावेश होतो. हिंदुसमाजाच्या दृष्टीने, एकात्मतेच्या दृष्टीने

सावरकरांची व्याख्या अधिक मूलगामी आहे. ऐतिहासिक दृष्ट्या ती अधिक महत्त्वाची, अपूर्व नि सर्वस्पर्शी आहे.

जातिभेदव्यवस्था स्वराज्याच्या नाशाला कारणीभूत झाली नाही असेच टिळक प्रतिपादन करीत असत. औद्योगिक परिषदेसमोर त्यांनी १८९२ साली त्या-संबंधी प्रबंध वाचला होता. त्यात ते म्हणाले होते की, 'अनुवांशिक धंद्यांची जोपासना करण्यासाठी आणि एकमेकाला साहाय्यक आणि सहकार करण्याच्या हेतूने जातिभेद ही संस्था आर्यवंशामध्ये ऐहिक आणि सामाजिक संघटनेसाठी प्रस्थापित झालेली आहे असे आपण मानले पाहिजे.' ब्रह्मदेशाच्या दौऱ्यावरून आल्यावर टिळक म्हणाले, 'जरी तेथे धार्मिक स्वातंत्र्य होते, स्त्रियांची प्रगती झाली होती, लग्ने प्रौढ वयात होत होती, काडीमोड व विधवाविवाह यांस संमती होती, तरी ब्रह्मीलोक पारतंत्र्यात होते.' यास्तव हिंदी राजकारणात आपण सामाजिक सुधारणेच्या बाबतीत घेतलेला पवित्रा बरोबर आहे, असा त्यांनी निष्कर्ष काढला होता. राजकीय आणि राष्ट्रीय प्रगती ही सामाजिक सुधारणेवर अवलंबून नाही; कदाचित त्या दोहोंमध्ये संघर्षसुद्धा होईल, असेच त्यांना वाटे.

न्यायमूर्ती रानडे यांनी 'रॉयल एशियाटिक सोसायटी'च्या मुंबई शाखेसमोर पेशव्यांच्या दैनंदिनींना लिहिलेली प्रस्तावना वाचली. तीत ते म्हणाले की 'सतराव्या शतकाच्या पूर्वार्धात वांशिक आणि जातीय मत्सर महाराष्ट्रात नव्हता. परंतु अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात ब्राह्मण स्वतःला राज्यकर्ती जात मानू लागल्या-मुळे, कायद्याप्रमाणे होणारी शिक्षा आपल्या जातीला कमीत कमी व्हावी व आपल्याला विशिष्ट अधिकार असावेत असे ते मानीत. ह्यामुळे नीतिभ्रष्टता निर्माण झाली. शिवाजीच्या राज्यपद्धतीत अशा गोष्टी नव्हत्या. सर्वांना समान न्याय आणि सर्व वर्गांचे रक्षण करणे हे जे राज्याचे मुख्य तत्त्व त्याला दुसऱ्या बाजीरावाच्या हाती राज्य गेल्यावर हरताळ फासण्यात आला.'

रानड्यांच्या ह्या उपरोक्त निबंधाला उत्तर देताना टिळक म्हणाले, 'जाति-मत्सरामुळे राज्यात अव्यवस्था माजली हे रानड्यांचे मत ऐतिहासिक दृष्ट्या खरे नाही. मोगलांचे राज्य लयास गेले त्याला कारण त्यांच्यामधील जातीय स्पर्धा नव्हती, तर मोगल सरदारांचा स्वार्थ होता. मराठ्यांचा पाडाव जातिमत्सरामुळे झाला असे म्हणण्यापेक्षा सर्वांना संघटित करून एकोप्याने लढणारे प्रभावी मुत्सद्दी झाले नाहीत म्हणून झाला, असे म्हणणे योग्य. राष्ट्रहितापेक्षा स्वहिताकडे नेत्यांनी अधिक लक्ष दिल्यामुळे मराठ्यांचा नाश झाला.' ह्यावरून असे दिसते की, टिळक अप्रत्यक्षपणे

जातिभेदव्यवस्थेचे समर्थन करीत असत. सामाजिक न्याय व सामाजिक समता ह्यामुळे राष्ट्रीय संघटनेला आणि एकमतेला पुष्टी मिळेल, असे त्यांना वाटले नाही, हे आश्चर्य नव्हे काय ?

टिळकांनी संमतीवयाच्या विधेयकास विरोध केला. लग्नाचे वय वाढवावे अशा उद्देशाने नामदार शास्त्री ह्यांनी १९१५ साली पुढे आणलेल्या विधेयकास त्यांनी विरोध केला. विठ्ठलभाई पटेल ह्यांनी १९१८ साली आंतरजातीय विवाह कायदेशीर ठरविण्यासाठी जे विधेयक आणले, त्यालाही त्यांनी विरोध केला. त्याचे वर्णन त्यांनी 'हिंदू-हिंदूंचे संकरकारक विवाह' असे करून ते विधेयक पुष्कळ अंशी हिंदुधर्माच्या विरुद्ध आहे आणि जरी संकर करणाऱ्या मनुष्याच्या संततीस त्याचा वारसा मिळाला तरी इतरांचा वारसा त्याच्या संततीला मिळू नये असे मत दिले आहे. एखाद्या ब्राह्मणाने शूद्र स्त्रीशी विवाह केला, तर तो ब्राह्मण्यास मुकतो असे त्यांनी म्हटले आहे.[१४] मुलींना सक्तीचे प्राथमिक शिक्षण द्यावे असा पुणे नगरपालिकेत १९२० साली फेब्रुवारी महिन्यामध्ये ठराव आला असता त्या ठरावाला टिळकांनी एका सार्वजनिक सभेत विरोध केला. तेव्हा टिळकांची ती सभा उधळली गेली.

शिवाजी हा सर्व भारताचा राष्ट्रपुरुष मानला जावा, अशी टिळकांनी शिवाजी उत्सवातून मागणी केली. परंतु शिवाजीने मुसलमान झालेले बजाजी निंबाळकर व नेताजी पालकर ह्यांना जसे शुद्ध करून हिंदुधर्मांत घेतले तसे करण्यास टिळक प्रत्यक्षपणे धजले नाहीत. दामले नावाचा ब्राह्मण मुलगा ख्रिश्चन झाला होता. त्याला हिंदू मिशनरी गजाननराव वैद्य ह्यांनी शुद्ध करून पुन्हा हिंदू करून घेतले. दामले यास आपल्या पंगतीस घेऊन पावन करावे व इतरांस उदाहरण घालून द्यावे, असा टिळकांकडे वैद्यांनी आग्रह धरला. परंतु त्याला आपल्या पंगतीस बसविण्याचे टिळकांना धैर्य झाले नाही.[१५] विलायतेहून परत आल्यावर त्यांनी सनातनी ब्राह्मणांच्याकडून प्रायश्चित्त घेतले. मात्र टिळकांच्या स्वधर्माच्या नि स्वदेशाच्या चळवळीमुळे वरिष्ठ वर्गातील हिंदूंचे धर्मांतर थांबले, असे म्हणता येईल. पंडिता रमाबाईंचा कावा ओळखून बाईंनी चालविलेला धर्मांतराचा डाव त्यांनी उधळून लावला हे मान्य केले पाहिजे.

अस्पृश्यांच्या बाबतीत तर टिळकांचे धोरण तसेच सनातनी वृत्तीचे होते.

---

१४. लो. टिळकांचे केसरीतील लेख, भाग ४ था, पृ. ५५४–५५.

15. *The Hindu Missionary*, 29 *December*, 1919.

१९ मार्च १९१८ रोजी कर्मवीर शिंदे ह्यांनी भरविलेल्या अखिल भारतीय अस्पृश्यता निवारण परिषदेत त्यांनी भाषण केले. आपल्या भाषणात ते म्हणाले, "अस्पृश्य वर्गाचा प्रश्न हा राजकीय किंवा सामाजिक दृष्ट्या लौकरच निकालात काढला पाहिजे व तो काढण्यासारखा आहे. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्या तीन मुख्य वर्णांना जे अधिकार आहेत, ते शूद्र वर्णालाही आहेत. मात्र शूद्रांनी वैदिक मंत्र म्हणू नयेत. प्रत्यक्ष देव जर अस्पृश्यता पाळू लागला, तर मी त्याला देव म्हणून ओळखणार नाही. पूर्वी ब्राह्मण लोकांनी ही रूढी निर्माण केली होती." [१६]

हे भाषण आटोपल्यावर परिषदेस उपस्थित असलेल्या अडीचशे नेत्यांनी एक जाहीरनामा प्रसिद्ध केला. त्या जाहीरनाम्यावर सही करणाऱ्या पुढाऱ्याने वैयक्तिक दैनंदिन आचरणात अस्पृश्यता पाळणार नाही, अशी प्रतिज्ञा करावयाची होती. त्या जाहीरनाम्यावर टिळकांनी सही करण्यास नकार दिला.[१७] सनातनी सहकाऱ्यांच्या आग्रहामुळे त्यांनी सही केली नाही, हे उघड आहे. लोकमान्यांनी देवाला दम भरला, परंतु अनुयायांपुढे दम टाकला. आपण 'केसरी'कर्ता म्हणून नव्हे तर केवळ टिळक म्हणून परिषदेस येत आहो, असे टिळकांनी कर्मवीर शिंदे यांना प्रारंभीच निक्षून सांगितले होते, याचे इंगित हेच होते![१८]

टिळक विलायतेस जावयास निघाले होते. इंग्लंडमधील मजूर पुढाऱ्यांची त्यांना सहानुभूती मिळवावयाची होती. 'भारतातील मजूर आणि दलित समाज ह्यांच्या हक्कांसंबंधी तुमचे कोणते धोरण राहील' असे आपणांस इंग्लंडमधील मजूर पुढारी विचारतील, हे टिळकांना माहीत होते. त्याच धोरणामुळे त्यांनी हे वरील भाषण केले असावे, असे रँग्लर परांजपे यांनी म्हटले आहे. ब्रिटिश मजूर नेते कर्नल वेजवूड ह्यांनी टिळकांना लंडनमध्ये तसा प्रश्न विचारला हे खरे आहे. अस्पृश्य व मागासलेल्या जातींकडे हिंदी विधिमंडळांनी विशेष लक्ष द्यावे असे त्यांनी टिळकांना सांगितले. ह्यापूर्वी १० नोव्हेंबर १९१७ रोजी मुंबईतील महार मंडळींनी टिळक, बेझंट आणि जमनादास द्वारकादास यांच्याकडे अर्ज केला होता. 'आम्ही हिंदुधर्माचे आहोत. आम्हांस तुमच्याबरोबर देवदर्शन घडवावे अशी आम्ही

---

16. *The All India Anti-Untouchability Movement*, P. .7.
१७. लो. टिळक यांच्या आठवणी व आख्यायिका, भाग २, पृ. २०५.
१८. कित्ता पृ. २०४.

अनन्यभावे आपणांस विनंती करीत आहो, 'असे त्या अर्जात त्यांनी म्हटले होते.'[१९] ह्या बाबतीत टिळकांनी काही केले नाही हे सांगावयास नकोच. त्यावर 'हिंदू मिशनरी' पत्राने लिहिले की, 'राजकारणामुळे ते लोकमान्य झाले आहेत. समाजकारण किंवा धर्मकारण हे लोकमान्यता देत नाही!' असले सामाजिक समतेचे प्रश्न टिळक श्रमविभागणीच्या मुद्यावर उडवून देत असत. 'सहभोजन आणि आंतरजातीय विवाह हे प्रश्न स्वराज्याच्या प्रश्नापेक्षा अधिक महत्त्वाचे नाहीत; जो कोणी स्वराज्य मिळवील त्याच्या पंगतीस मी जेवेन; सामाजिक बाबतीत काही फेरफार केले पाहिजेत हे खरे. परंतु त्याविषयी स्वराज्य मिळाल्यानंतर विचार करू.' [२०] असे विचार टिळकांनी शेवटी शेवटी व्यक्त केले होते.

याचा अर्थ असा होता की, ब्राह्मणेतर हिंदू हा मनुष्य म्हणून वा आपला तो धर्मबांधव म्हणून टिळक त्याला समान मानत नव्हते. टिळकांना लोकशाहीवादी म्हणत. त्याचा अर्थ ते राजकारणात तडजोडवादी होते. लवचीक होते. मनुष्याविषयी समता ही मनात अभिप्रेत नसेल तर लोकशाहीविषयी बोलणेच खुंटले. ह्याहीपुढे जाऊन टिळकांनी अथणी येथे ब्राह्मणेतरांना उद्देशून अपमानकारक उद्‌गार काढले. आपल्या भाषणाच्या ओघात ते म्हणाले, [२१] "तेली, तांबोळी, शेतकरी यांना कौन्सिलमध्ये जाऊन काय नांगर हाकायचे आहेत, की तागडी धरायची आहे?" [२२] ह्यामुळे ब्राह्मणेतर मंडळीत संताप निर्माण झाला आणि टिळकांच्या सभा सांगली, पुणे, मुंबई येथे उधळविण्यात आल्या. ह्या प्रक्षोभक भाषणामुळे टिळक खऱ्या अर्थाने तेल्या–तांबोळ्यांचे पुढारी होते की कसे हे अप्रत्यक्षपणे स्पष्ट झाले.

. ४ .

सामाजिक बाबतीत ते गोखले आणि दादाभाई नौरोजी यांच्याप्रमाणे तटस्थ वा एकवेळ उदासीन राहिले असते तरी बरे झाले असते. परंतु त्यांनी समाजसुधारणेला सतत विरोध केला. आपल्या सनातनी अनुयायांच्या विचारांचे क्षितिज वाढविण्याऐवजी त्यांनी कुजत जाणाऱ्या, कोसळणाऱ्या समाजरचनेचे समर्थन केले; किंवा

19. *The Hindu Missionary, 7 January*, 1918.
20. *Ibid 29 December*, 1919.
21. *R. P. Paranjape, Young Liberal Series No.* 4, *P.* 4.
२२. प्रबोधनकार ठाकरे, शेतकऱ्यांचे स्वराज्य, पृ. ११३.

जेव्हा समर्थन केले नाहीं तेव्हा स्वराज्यसंपादनाच्या ध्येयाकडे बोट दाखवून सामाजिक अन्यायास मूक पाठिंबाच दिला, असे म्हणणे क्रमप्राप्त आहे. त्यामुळे समाजातील प्रतिगामी प्रवृत्तींना पाठबळ मिळाले. जरी त्यांनी स्थापलेल्या काँग्रेस डेमॉक्रॅटिक पक्षाने ' जाती व रूढी यांमुळे समाजाला भोगावे लागणारे व नागरिकत्वाच्या हक्कावर गदा आणणारे अनेक धार्मिक, सांप्रदायिक अन्याय दूर करण्यात आले पाहिजेत ' असे म्हटले होते, तरी 'हिंदू मिशनरी'च्या संपादकाने म्हटले की, ' सर्व हयात भर ज्यांनी सामाजिक सुधारणांची टवाळी केली त्यांच्या आश्वासनावर कोणीही या बाबतीत विश्वास ठेवणार नाही. टिळक हे पक्के राजकारणी आहेत. परंतु त्यांच्याकडून हे काम होण्यासारखी त्यांच्या मनाची घडण नाहीं. '[२३] सामाजिक समता आणि न्याय यांकडे टिळकांनी आपल्या निर्भीड दृष्टीने पाहिले असते, तर नवीन युगधर्माप्रमाणे ब्राह्मणेतरांना नवीन युगधर्माला नि आर्थिक उत्कर्षाला योग्य अशी समाजरचनेची तळमळ वाटत आहे, हे त्यांना समजले असते.

ह्यावरून असे म्हणता येईल की, काही वेळा महापुरुष आपल्या जन्मकाळच्या परिस्थितीच्या कवचाबाहेर काही बाबतीत पडू शकत नाहीत, तसे टिळकही आपल्या जन्मकाळच्या सनातनी नि पारंपारिक परिस्थितीतून बाहेर पडू शकले नाहीत. काळ पुढे गेला, ते मागे राहिले. त्यांचे अवतारकार्य समाप्त झाल्याचीच ती चाहूल नि चुळबूळ सुरू झाली होती. दुसऱ्या महायुद्धाच्या वेळी चर्चिल साहेब म्हणत, ' आम्ही लोकशाही नि मानवी स्वातंत्र्य ह्यांसाठी लढत आहोत. ' पण चर्चिल साहेब तेच हक्क हिंदुस्थानला द्यायला तयार नव्हते. तीच शोचनीय स्थिती टिळकांची झाली. ते ब्रिटिशांशी स्वराज्यासाठी झगडले. परंतु वरिष्ठ समाजाच्या टाचेखाली चेंगरले गेलेले कनिष्ठ समाज, अस्पृश्य समाज यांच्यापर्यंत स्वराज्याचे हक्क कसे पोचतील याचा त्यांनी विचार केला नव्हता, असे मोठ्या दुःखाने म्हणावे लागते.

आता या प्रश्नाची दुसरी बाजू पाहायची तर समाजसुधारकांनी तरी आपले कर्तव्य नीट पार पाडले काय ? त्यांचे पुढारी लोकहितवादी, रानडे, तेलंग यांनी समाजसुधारणेच्या कार्यात स्वतः नैतिक धैर्य न दाखविल्यामुळे टिळकांनी त्यांना निष्प्रभ करून टाकले. त्यामुळे सामाजिक चळवळीची प्रगती झाली नाही, मोठी हानी झाली हे खरे. रानड्यांची पहिली पत्नी वारल्यानंतर त्यांनी आपल्या बत्ती-

23. *The Hindu Missionary*, 10 May, 1920.

साव्या वर्षी ११ वर्षांच्या मुलीबरोबर लग्न केले. तेलंगांनी आपल्या आठ वर्षांच्या मुलीचा विवाह केला. लोकहितवादींचा मुलगा लंडनहून आल्यावर त्यांनी स्वतः प्रायश्चित्त घेतले. 'अर्थ समिती'पुढे साक्ष देण्यासाठी तुम्ही लंडनला जाता का ?' असे लोकहितवादींना सरकारने विचारताच त्यांनी सामाजिक बहिष्कारास घाबरून नकार दिला. याविषयी 'नेटिव्ह ओपिनियन' पत्राने गोपाळराव देशमुखांवर खरमरीत टीका करून म्हटले, 'सर्व आयुष्यभर त्याग करून अखंड परिश्रम केले आणि चिकाटी दाखविली तरच गोपाळराव ल्यूथर वा तुकाराम यांच्या पंक्तीस बसावयास योग्य होतील.'[२४]

याही पुढे जाऊन लोकहितवादींनी समाजसुधारकांच्या नेत्यास न शोभेल अशी गोष्ट केली. आपल्या नातवंडांची लग्ने त्यांच्या वयाच्या सातव्या वा आठव्या वर्षीच त्यांनी उरकून टाकली. लोकहितवादींची छाती त्यांच्या ख्यातीप्रमाणे या बाबतीत असती तर बरे झाले असते !

समाजसुधारकांचे अग्रणी न्यायमूर्ती रानडे यांचे नाव न घेता 'विविधज्ञानविस्तारा'ने[२५] त्यांच्या भित्रेपणामुळे सामाजिक चळवळीची अतिशय हानी होत आहे, असे खेदाचे उद्गार काढले. ह्या बाबतीत रानड्यांची हजेरी म. जोतीराव फुले यांनीही घेतली होती. समाजसुधारकांचे दुसरे अग्रणी गोपाळ गणेश आगरकर हे समाजसुधारणेच्या क्षेत्रात प्रत्यक्षपणे उतरलेले नव्हते. वर उल्लेखिलेल्या सुधारणा हे उपरोक्त थोर समाजसुधारक करू शकले नाहीत. त्यांच्या सुधारणावादाचा आवाका स्त्रीशिक्षण, प्रौढविवाह, विधवाविवाह, परदेशगमन, स्त्रियांचे हक्क ह्यांपलीकडे गेला नाही. खरे म्हणजे विशेषतः ब्राह्मणवर्गाच्या सुधारणेपलीकडे त्यांचा आवाका कधी गेलाच नाही. रानड्यांचे न्यायप्रिय नि सामाजिक पुनर्रचनेचे विचार कृतीत आणावयास जितके प्रयत्न झाले पाहिजे होते तेवढे झाले नाहीत. समाजसुधारकांनी त्या बिकट काळात केलेल्या कार्याविषयी नि समाजाची मनोभूमिका तयार करण्यासाठी केलेल्या प्रयत्नांविषयी त्यांना भावुकतेने वंदन करून, त्यांनी बहुसंख्य जनतेच्या सामाजिक प्रश्नांचा फारसा विचार केलेला दिसत नाही, असे म्हटले तरी चालेल. त्या महान प्रश्नाची धुरा म. जोतीराव फुले यांनीच आपल्या

२४. *The Native Opinion* चे मत विविधज्ञानविस्तार पुस्तक ११, अंक ११, पृ. २३६ वर दिले आहे.

२५. पुस्तक ११, अंक ९.

शिरावर घेतली. म. फुल्यांचे तत्त्वज्ञान कृतींत आणून सर्व महाराष्ट्रातील बहुजन-समाजाचा कायापालट घडवून आणून, प्रचंड सामाजिक क्रांती घडवून आणली महर्षी शाहूमहाराज ह्यांनी.

टिळकांच्या तत्त्वातून निर्माण झालेल्या आणखी एका गोष्टीचा उल्लेख करणे उचित होईल. समाजसुधारक समाजात फूट पाडतात, असे टिळकांचे म्हणणे होते. योगायोग असा की टिळकांनी स्वतः नवीन पंचांग काढल्यामुळे केव्हा केव्हा असे घडते की ब्राह्मणेतरांचा दसरा असतो तेव्हा टिळक पंचांगाप्रमाणे ब्राह्मण दिवाळी साजरी करतात !

मात्र न्यायाच्या दृष्टीने पाहाता, लोकमान्यांनी स्वराज्याच्या चळवळीचे कंकण हाती बांधून तेच कार्य सर्वस्वी महत्त्वाचे आहे असे धोरण ठेवून, अतुल्य त्यागाने नि अलौकिक धैर्याने ते पुढे रेटले. स्वराज्याच्या चळवळीचा गाडा स्वातंत्र्याच्या रुळावर आणून ठेवला. समाजसुधारक समाजात फारसे मिसळले नाहीत. त्यांनी बोलल्याप्रमाणे वागण्याचे नैतिक धैर्य दाखविले नाही. त्यांचा सर्व भार सरकारवरच असल्यामुळे त्यांच्या हातून व्हावे तेवढे समाजसुधारणेचे कार्य झाले नाही. शिवाय राजकारणात ते मवाळ होतेच.

तथापि स्वराज्य मिळाल्यावर सामाजिक प्रश्न सुटतील हे राजकीय सुधारणावाद्यांचे निदान मात्र खरे ठरले नाही. आणि सामाजिक समतेचा प्रश्न सुटल्यावाचून आर्थिक समतेच्या प्रश्नाची समस्या सुटणार नाही, असा रंग दिसत आहे.

* *

# व्यक्तिदर्शन

. १ .

" मी कोणाचा हेर होऊ इच्छित नाही आणि मी कोणाचा विश्वासघातही करणार नाही, " असे रॅन्ड-खुनासंबंधी चौकशी करीत असलेल्या ब्रुइन-साहेब नावाच्या पोलिस अधिकाऱ्याला टिळकांनी निर्भीडपणे बजाविले.

" माझ्या वृत्तपत्रव्यवसायातील सर्व जीवनात मला हडसून खडसून जाब विचारणाऱ्या दोन विख्यात व्यक्ती निघाल्या. त्या म्हणजे एक टिळक नि दुसरे जर्मनीचे कैसर. ह्या दोन नावांतील जवळिक ही बळेच आणलेली आहे असे कदाचित वाटेल, परंतु ते तसे नाही, " असे सर व्हॅलेंटाईन चिरोल यांनी चिरोल अभियोगातील आपल्या विजयानंतर उद्‌गार काढले.

ह्या दोन्ही उद्‌गारांवरून टिळकांचे निर्भय नि भव्य व्यक्तिमत्त्व आणि संकटाचे पर्वत ओलांडण्यास समर्थ करणारी त्यांची अलौकिक धीर आणि वीर वृत्ती ही प्रत्ययास येतात.

राजकारण हा टिळकांच्या व्यक्तिमत्त्वाचा एक मुख्य पैलू. टिळकांचे व्यक्तिमत्त्व त्यांच्या राजकारणापेक्षा अनेक पटींनी भव्य होते. राष्ट्राच्या पायातील पारतंत्र्याच्या शृंखला तोडण्यासाठी त्यांनी अव्याहतपणे तीस वर्षे लढा लढविला. एका मोठ्या साम्राज्यशाहीशी टक्कर दिली. त्यांचे हे लोकोत्तर जीवन एक भव्य तुफानच होते. त्या तुफानाचा वेग प्रचंड असल्यामुळे त्याचे पडसाद इतर देशांतही उठले.

अशा ह्या भारतीय वीरमणीला खरा आनंद नि ब्रह्मानंद ज्ञानाच्या तपश्चर्येत लाभे. १८९७ साली तुरुंगात असता एके दिवशी रात्री त्यांना एका ऋचेचा अर्थ लागला. त्या वेळी त्यांचे मन हरपले. संशोधकाला गूढ उकलले. गाठ सुटली. त्या अंधार कोठडीत त्या दिव्य आनंदाने ते बेहोष झाले. मंडालेच्या कारावासात वेबरचा ग्रंथ वाचून त्यांनी आपल्या पत्रात लिहिले, ' वेबरचा ग्रंथ वाचला. त्याचा किती आनंद झाला हे काय सांगू ? मला वाटले की, माझ्या बंदिवासापैकी काही

भाग खराच सत्कारणी लागला. ' खरोखर राष्ट्र स्वतंत्र असते तर टिळक एखाद्या महान तत्त्ववेत्त्याप्रमाणे तत्त्वचिंतनात गढून गेले असते. त्यांची ज्ञानलालसा अफाट होती. विश्वाच्या संशोधनाच्या अवगाहनात ते मग्न असत तेव्हा त्यांच्या गरुडध्वज-मंडित मनाचे विमान विश्वसंचार करी.

चित्त विचारशून्य करणे म्हणजेच समाधी असे ते मानीत. ह्या समाधीचे सुख ते कधी कधी आराम-खुर्चीतच घेत. ग्रंथांच्या संगतीत त्यांना समाधी लागे. अशी समाधी त्यांना व्याख्यानास जाणे भाग पडले म्हणजे भंग पावे. तेव्हा ते म्हणत, ' ह्या आनंदातून बाहेर पडणे जिवावर येते. अशा ग्रंथांच्या सहवासात माझा जन्म जायचा. यातच मला फार आनंद वाटतो. पण या दुर्दैवी देशाच्या पायांतील पारतंत्र्याच्या शृंखला कायम ठेवून तो आनंद मी उपभोगणे पापमूलक आहे. ' तशा साधनेत वा व्यासंगात दंग असणारा ज्ञानी पुरुष त्यांना भेटला म्हणजे गल्लीत सुद्धा कूटप्रश्नांचे मंथन सुरू होई. एकदा मध्यरात्री सभेनंतर पाठकशास्त्री नामक गृहस्थांशी त्यांची एका बोळात गाठ पडली. पाठकशास्त्री सुनेच्या पोटात दुखत होते म्हणून सुईणीच्या शोधात आलेले होते. टिळकांच्या घरची मंडळी त्यांना शोधू लागली. पाहतात तो भारतीय कालगणनेसंबंधी त्या दोघांची चर्चा रंगात आलेली ! तिकडे पाठकशास्त्र्यांची सूनही सुखरूप बाळंत होऊन गेली होती !

संस्कृत, गणित, धर्मशास्त्र, तत्त्वज्ञान, ज्योतिर्गणित ह्यांवरील त्यांच्या उदंड व्यासंगामुळे जगातील पंडितांच्या पहिल्या पंक्तीत त्यांना बहुमानाचे स्थान प्राप्त झाले होते. ' आपट्यांच्या कोशातील निम्मे तरी उतारे मी पाठ म्हणेन, ' असे ते सांगत. अशा अफाट ज्ञानाने स्फुरलेले टिळक एकदा म्हणाले, " भाषांतर करण्यासारखी कामे करण्यास मी जन्मास आलेलो नाही. ज्या काळात आपण जन्मास आलो त्यात काही शतके टिकेल अशा कार्याने मी प्रेरित झालेलो आहे. " हे आत्मसाक्षात्काराचे वा आत्मद्दुंकाराचे बोल त्यांनी तीन महान् ग्रंथ लिहून खरे केले. कुठच्याही शास्त्रातील पंडिताची आणि त्याच्या विषयाची एखाद्या सभेस ओळख करून देणे व त्या विषयावर आपल्या विद्वत्तेची जाताजाता छाप टाकणे ही त्यांची हातोटी अवर्णनीय होती. सर जगदीशचंद्र बोस यांच्या वनस्पति-शास्त्रावर त्यांनी सहज असे भाषण केले की सर्व श्रोते चकित होऊन गेले. गणित विषयाचे तर ते नामवंत आचार्यच होते. टिळक नामदार होते. टिळक लोकसंग्राहक होते. टिळक लोकाग्रणी होते. परंतु ज्याच्या प्रकाशाची ज्योत, नावाची गर्जना,

कर्तृत्वाचा प्रभाव नि कीर्तीचा परिमल भारताच्या इतिहासात चिरंतन राहील अशा या 'मनुष्याणाम् सहस्रेषु' पुरुषास कोणी सहेतुकपणे प्रोफेसर टिळक वा पंडित टिळक म्हटले, तर त्यांच्या डोळ्यांत धन्यतेच्या भावनेचे एक प्रकारचे तेज चमकून जाई. त्यातच त्यांच्या जीवनाचे मनोवेधक दर्शन घडते.

टिळकांच्या व्यक्तिमत्त्वाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे त्यांची साधी, निर्मळ राहणी व उच्च विचारसरणी. त्यांच्या समकालीनात असा पुरुष विरळाच. त्यांचे कपडे अगदी साधे असत. कधी कधी मळकट अंगरखा घालून ते घाईघाईत बाहेर पडत. ते त्यांच्या निदर्शनास आणून देण्यासाठी त्यांचे भाचे धोंडोपंत विद्वांस यांची त्यांच्या मागून धावता धावता पुरेवाट होई. नामदार गोखले यांच्या कपड्यांचा झोक पाश्चिमात्य पद्धतीकडे असे. शहरातील टुमदार बगीचा नि कोकणातील नारळ-सुपारीची बाग यात जो फरक तोच ह्या दोघांच्या पोशाखात होता. टिळक इंग्रज मुत्सद्यांच्या भेटीप्रसंगी नीटनेटके कपडे घालीत. ते म्हणत, आपण मराठे, दरबारचा मान राखला पाहिजे. परंतु त्यासंबंधी एक लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट अशी की, ग्रीस देशातील तत्त्वज्ञ–तपस्वी डाओजिनीस याच्या फाटक्या जाकिटातून त्याचा अहंकार डोकावतो, असे प्लेटो हा तत्त्वज्ञानी म्हणे, तसा अहंकार टिळकांच्या साध्या पोशाखातून डोकावत नसे. आपली वृत्तपत्राची कचेरी किंवा 'केसरी'चे मुद्रणालय दाखवून, 'मीच तो टिळक,' असे त्यांनी सांगताच भेटीस गेलेला मनुष्य चकित होत असे.

टिळकांना सुपारी, रानड्यांना तपकीर आणि गोखल्यांना श्रीखंड आवडे. टिळकांच्या घरात कांदा-लसूण वर्ज्य. त्यांना बर्फ टाकलेला सोडा आवडे. 'मी कोकण्या असल्यामुळे मला आंबट दही आवडते,' असे ते म्हणत. त्यांचे हातपाय वळत असले तरी ते अंगमर्दन करून घेत नसत. त्यांच्या देहाला तेलाच्या बिंदूचा स्पर्शही नसे. त्यांना स्नानासाठी पाणी भरपूर लागे. मधुमेहाच्या विकारामुळे त्यांना सातूच्या पुऱ्यांवर राहावे लागे. नुसती वासना किंवा इच्छा असणे यात काही दुःख नसून त्यांतील आसक्ती हे दुःखाचे मूळ होय. म्हणून सर्व प्रकारच्या वासना मारीत न बसता ज्ञात्याने आसक्ती सोडून सर्व कार्य करावे, अशी त्यांची शिकवण असे.

टिळकांच्या पत्नी सत्यभामाबाई ह्या जुन्या रिवाजाप्रमाणे अशिक्षित होत्या. त्या घरचे पाहात. धोंडोपंत विद्वांस हे त्यांचे गृहमंत्री, वासुकाका जोशी त्यांचे वैयक्तिक कार्यवाह, स्नेही, सावकार व कारस्थानपटू सहकारी.

लोकमान्य सकाळी ६–६॥ च्या सुमारास उठत. चहा घेतल्यावर खासगी पत्रे नि वृत्तपत्रे पाहात. ' सकाळी चहाबरोबर काय खाता ? ' असे कोणी विचारल्यास ' मी शिव्या खातो ' असे ते उत्तर देत. कारण प्रतिस्पर्ध्यांच्या कोणत्या ना कोणत्या तरी वृत्तपत्रात त्यांच्यावर लाखोली वाहिलेली असायचीच ! दुपारी जेवण व वामकुक्षी. ते अंथरुणावर किंवा आराम–खुर्चीत पहुडलेले असता झोप लागली नसेल तर उजव्या पायाचा अंगठा हलविण्याची त्यांना सवय होती.

मुलांनी धंदा कोणताही करावा; परंतु त्यात नावलौकिक नि प्रावीण्य संपादन करावे असा त्यांचा मुलांस उपदेश असे. विद्यार्थ्यांना ते म्हणत, ' आपल्या राष्ट्राचा विचार करा व कामास लागा. नुसत्या आहारविहारासाठी मानवजन्म नाही.' टिळक धर्मनिष्ठ होते. धर्मशील होते. ते संतांचे दर्शन घेत. भक्ताने त्यांच्या हातात ताईत बांधला तर बांधून घेत. संताने पाठविलेली भाकर प्रसाद म्हणून सेवन करीत. तुरुंगातून सुटका झाली म्हणजे देवदर्शन घेऊन घरी जात. ऐतिहासिक घराण्यातील पुरुष भेटले तर त्यांना भाविकपणे वंदन करीत. परंतु ते भोळसट नव्हते. ' मला तुम्ही पाचशे रुपये द्याल असा मला स्वप्नात दृष्टांत झाला आहे. ' असे एका लफंग्याने त्यांना सांगताच ते शांतपणे उत्तरले " पण मला अद्याप तसा दृष्टांत झालेला नाही त्याला मी काय करू ? " एक मद्रासी पदवीधर अगदी गहिवरून टिळकांना म्हणाला, " महाराज, आपले पाय आमच्या प्रांताला लागले आहेत, आता हा हा म्हणता प्लेग नाहीसा होईल. " हे ऐकून टिळकांना त्या पदवीधराची कीव आली !

कर्मयोगी अन् स्थितप्रज्ञ टिळक यांचे गृहजीवन कसे होते हे समजून घेण्याची अनेकांना उत्सुकता वाटते. प्रत्येक महापुरुषाच्या जीवनाविषयी सामान्य माणसाला अशी जिज्ञासा वाटते. टिळकांच्या गृहजीवनाचे वैशिष्ट्य म्हणजे ते संसारात असून विरक्त होते व विरक्त असून सांसारिक होते. पत्नीवर व मुलांवर त्यांचे निरतिशय प्रेम होते. तरी घराच्या पुढील भागात पत्नीशी बोलताना ते सहसा आढळत नसत. तरुणपणी सिंहगडावर जात तेव्हा पतिपत्नी एका दगडावर बसत आणि मुले वरखाली पळत. त्यांच्या एका लहान मुलाचा त्यांना अत्यंत लळा लागला होता. त्यांना घरात येताना त्या मुलाने पाहिले म्हणजे तो ओरडून म्हणे, " दादा, गाडी कोकलली ! " टिळक घरात प्रवेश करीत असताना तो मुलगा आढळला नाही, तर तेच स्वतः ओरडत, " दादा, गाडी कोकलली ! "

इंग्रजी धर्तीचे खेळ टिळकांना आवडत नसत. त्यांचे सहकारी न. चिं.

केळकर नि त्यांचे चिरंजीव रामभाऊ हे बॅडमिंटन खेळत असत. टिळकांनी ते पाहून ते जाळेच उडवून दिले. लहान मुलांना त्यांचा बाहू धरून गरगरा फिरविण्यात त्यांना आनंद वाटे.

टिळक मंडालेच्यातुरुंगात असता त्यांना आपल्या पत्नीच्या प्रकृतीची अतिशय चिंता वाटे. ' सौभाग्यवती व मुले यांना म्हणावे की मला माझी काळजी वाटत नाही. त्यांचीच अधिक वाटते. मी लवकर भेटेन. दुःखात आशा हीच जगण्याची आशा. मुली कोण कोठे आहेत ? मुलांची प्रकृती कशी आहे ? अभ्यास कसे आहेत ? व्यायाम घेतात की नाही ?' अशी पत्रांतून ते चौकशी करीत. पुन्हा पुन्हा ते लिहीत, 'सौभाग्यवतीची काळजी अधिक वाटते. आपल्याला काळ तूर्त प्रतिकूल आहे. प्रसंग परीक्षा पाहणार आहे. तिची प्रकृती उन्हाळ्यात बिघडते म्हणून तिने माझ्याकरिता म्हणून तरी सिंहगडाला जावे. ' टिळकांनी असा आग्रह धरला एवढेच नव्हे तर पत्नीला तशी आज्ञा आहे असे तळमळून लिहिले.

सत्यभामाबाई हा आर्यपत्नीचा एक आदर्श. पती मंडालेच्या कारावासात गेल्यावर त्या साध्वीने दागिने, नवे कपडे, चांगले अन्न यांचा त्याग केला. उदासीनपणात मधुमेहाबरोबर झुंजत, पतीच्या प्रकृतीच्या चिंतेने झुरत, खंगत त्या ७ जून १९१२ रोजी कालवश झाल्या. पत्नीच्या मृत्यूची तार वाचून कर्मयोगी टिळकांचे मानवी हृदय दुःखाने तुडुंब भरून वाहू लागले. त्यांनी दुःखी अंतःकरणाने लिहिले, ' तुमची तार पोचली. मनाला फार मोठा धक्का बसला. संकटे आली तर ती मी शांतपणाने सोशीत असतो हे खरे. पण खरेच सांगतो की या बातमीने मात्र मी अगदी हादरून गेलो. आपण हिंदू लोक. तेव्हा नवऱ्याच्या आधी बायको गेली हे व्हावे तसेच झाले, असेच कोणीही म्हणणार. पण तिच्या मरणकाळी मी जवळ नाही इतकेच नव्हे तर बंदिवासात असावे याचेच दुःख वाटते. पण ते होणारच होते. भवितव्यतेला कोण काय करणार ? हीच भीती मला राहून राहून वाटे. आणि शेवटी तसेच घडलेही. पण माझे दुःखकारक उदासपणाचे विचार आणखी सांगून तुम्हाला अधिक कष्टी करू इच्छित नाही. दुःख करीत बसून कोणीही कालाचा दुरुपयोग करू नये. '

. २ .

लोक टिळकांच्या पायांवर लोटांगण घालीत तेव्हा ते म्हणत, ' मी राजा नाही. मी साधू नाही. मी देव नाही. माझे तुम्ही पाय धरू नका. मी तुमच्या-

सारखाच एक मनुष्य आहे. मी अधिक हातपाय हलवितो एवढेच ! तुम्ही अंतर्मुख व्हा म्हणजे देव तुम्हांला तुमच्या हृदयात दिसेल. '

देवाच्या नांवावर टिळकांनी कधी राजकारण केले नाही. देवापुढे बसून त्यांनी एखादे फूल कधी वाहिले नाही. ईश्वरभक्तीविषयी त्यांनी कधी उपदेश केला नाही. स्वतः मुक्तकंठे कधी प्रार्थना म्हटली नाही. ' सामर्थ्य आहे चळवळीचे, जो जो करील तयाचे ' हे तत्त्व त्यांना मान्य. परंतु ते म्हणत, ' भगवंताचे अधिष्ठान प्राप्त व्हायला चळवळीच्या कचेरीत एखादी मूर्ती स्थापन करून तिच्यासमोर नित्य धूप जाळला म्हणजे तेथे भगवंताचे अधिष्ठान येत नाही. भगवंताचे जगात कार्य काय, तर साधूंचे रक्षण, दुष्टांचे निर्दालन आणि धर्माची स्थापना. ही कार्ये जेथे चालत असतील तेथे भगवंताचे अधिष्ठान आपोआपच येते. '

ईश्वराची कृपा म्हणजे काय ह्याविषयीही त्यांनी विवरण केले आहे. कोणतेही मोठे कृत्य होण्यास मनुष्याची कर्तबगारी आणि ईश्वरी कृपा अथवा अज्ञेय साधनाची अनुकूलता या दोन्ही गोष्टी असाव्या लागतात अशी त्यांची श्रद्धा होती. ईश्वर अज्ञेय आहे असा वेदान्तशास्त्राचा निर्वाळा देऊन ते पुढे म्हणतात की अलौकिक गुण असताही त्याचा ( थोर पुरुषाचा ) सर्व संकटांतून बचाव होऊन त्याच्या हातून कार्य निर्विघ्नपणे तडीस जाणे यासही काही अज्ञेय अथवा अदृश्य गोष्टींचे साह्य लागते. मग त्या गोष्टीस कोणी कालाची सद्दी म्हणोत, कोणी पुण्याई म्हणोत, कोणी ईश्वरी कृपा म्हणोत वा कोणी नास्तिक मोठा 'अ' काढून अज्ञेय किंवा अतर्क्य प्रकार म्हणोत. सर्वांचा अर्थ एकच आहे.[1]

टिळकांना नाटक आवडत नसे, गायनही आवडत नसे. ' भगवंताच्या मुखातून गाइलेले गाणे ( गीता ) ऐकल्यामुळे आता मानवी गीत रुचेनासे झाले आहे, ' असे ते म्हणत. तथापि नारायणराव राजहंस यांना गंधर्व पदवी त्यांनीच दिली. नारायणराव जोगळेकर हे नट त्यांच्याच सांगण्यावरून मराठी रंगभूमीस लाभले. ते त्यांच्या निबंध-वर्गातील विद्यार्थी होते. टिळकांच्या लढाऊ राजकारणाने महाराष्ट्रात नाट्यभूमी स्फुरविली नि फुलविली. त्यांनी उद्योगधंद्यांना स्फूर्ती दिली. त्यांच्यात नव्या महत्त्वाकांक्षा निर्माण केल्या. त्यांची पूर्ती व्हावी ह्यासाठी संधी दिली.

पूर्वायुष्यात टिळक आपल्या मित्रांना नि सहकाऱ्यांना ऐसपैस वागण्याची

१. केसरी, १९ मे आणि २७ मे १८९६.

थोडी मुभा देत असे दिसते. टिळकांनी एकदा तापात प्रमाणाबाहेर कोयनेल घेतल्यामुळे त्यांना कमी ऐकू येई. अर्थात् त्यांना मोठ्याने बोलण्याची सवय जडली होती. त्यात त्यांचा आवाज पडला थोडा कर्कश. एकदा बोलण्यावरून बोलणे निघाले की, राजकीय पुढाऱ्यांनी एखादे नाटक केले तर कोण कोणती भूमिका करील. एकजण म्हणाला, 'फेरोजशहा मेथा वठवतील रावणाची भूमिका, गोखले स्त्रीची वा देवाची भूमिका करतील.' मध्येच कोणी विचारले, 'अहो, पण बळवंत-रावांना कोणती भूमिका?' त्यावर एक खट्याळ मित्र बोलला, 'अरे, बळवंतरावांना भूमिका दिली तर नाटक पाहायला कोणीच येणार नाही! बळवंतराव एवढ्या मोठ्याने बोलतात की लोक बाहेर राहूनच नाटक ऐकतील!'

टिळकांच्या देखत कोणी अपशब्द बोलला वा थट्टामस्करी केली तर ते त्या-कडे दुर्लक्ष करीत. स्वतः मात्र अपशब्द उच्चारीत नसत. गोखल्यांच्या देखत कोणी अपशब्द वा अश्लील शब्द उच्चारला, तर ते खाली मान घालीत. भेटीस येणाऱ्या लोकांना टिळकांचे दार सताड उघडे असल्यामुळे टिळकांचे मुख्य लेखन-वाचन मध्यरात्री सुरू व्हायचे. तेव्हा त्यांचा लेखनिक थकलेला असायचा. केव्हा केव्हा त्याला डुलकी यायची. मग सुपारी खात खात, खुर्चीच्या उजव्या हातावर बोटाने ठेका धरीत, किंवा बोटांनी डोकीवर ठेका धरीत अग्रलेखाचा मजकूर सांगावयास आरंभ व्हायचा.

टिळकांनी मराठी वृत्तपत्रीय भाषेला प्रौढता, परिणामकारकता व शैलीदार-पणा ही आणली. त्यांनी राजकीय विषयाची परिभाषा बनविली. मराठी भाषेत नवीन शब्द रूढ केले. 'नोकरशाही' हा शब्द उच्चारताच आज सर्वांना चीड येते. त्या शब्दाच्या पाठीमागे टिळकांचा तीव्र त्वेष आहे. टिळकांनी मराठी भाषेला तत्त्वज्ञानाची परिभाषा दिली. जुन्या मराठीत भक्ती आणि वेदान्त होता. शाहिरांनी नि गोंधळी लोकांनी वीररसाची भर टाकली. ज्ञानेश्वरांनंतर मराठी भाषेत तत्त्वज्ञाना-सारख्या गहन नि महान विषयावर कोणी ग्रंथ लिहिलेला नाही. 'गीतारहस्यातील कांही शब्दांकरिता मला दोनचार दिवस घालवावे लागले आहेत,' असे त्यांनी अनेकदा सांगितले. लेखक म्हणून ज्याला जगावयाचे आहे त्याने ही आस्था नि कळकळ लक्षात ठेवण्यासारखी आहे. टिळकांच्या वाणीचा नि लेखणीचा राष्ट्रात एवढा प्रभाव पडला होता की, टिळक काय म्हणतात हे समजण्यासाठी अनेक परभाषिक मराठी भाषा शिकले. पुणे हे भारतीय राजकारणाचे पुन्हा एकदा केंद्र बनले.

तरुण संपादकांना टिळकांनी केलेला उपदेश मार्मिक आहे. ‘ संपादकाने महत्त्वाचे ग्रंथ वाचले पाहिजेत. संपादकामध्ये पक्षाचा अभिमान असणे हा दोष नसून गुण असतो. मात्र लोकांना सांगण्यासाठी त्याच्याजवळ काही दिव्य संदेश असला पाहिजे आणि त्याला असे वाटले पाहिजे की, ही गोष्ट लोकांना मी जर पटवून दिली नाही, तर देशाचा घात होईल. असे जेव्हा वाटते तेव्हाच वर्तमानपत्रकार व्हावे. ज्या विषयावर लिहावयाचे असेल त्या विषयाचे संपूर्ण अध्ययन करावे. अमकाच मार्ग खरा आहे, असे त्याने निर्भीडपणे, निर्भयपणे व निःशंकपणे सांगितले पाहिजे. आपल्या न्यायालयामध्ये जसा न्यायाधीश, तसा संपादक त्याच्या खुर्चीत. न्यायाधीश जसा आत्मविश्वासाने आपला निर्णय सांगतो तसेच संपादकाने आपले मत स्वच्छपणे ठासून सांगून, हा अमकाच मार्ग खरा असा निर्णय दिला पाहिजे.’ वकील स्वपक्ष नि स्वमत मांडतो. न्यायाधीश दोन्ही बाजू अलिप्तपणे पाहातो. संपादक हा लोकपक्षाचा कुशल, धीट, विचारी व तडफदार वकील आहे, हे टिळकांचे मत लक्षात ठेवण्यासारखे आहे. सर्व बाबतीत राज्यकर्त्यांची री ओढली की लोकशाहीचा कारभार आटोपलाच म्हणून समजावे.

टिळकांचे वक्तृत्व हे दिव्य संदेश देणाऱ्या पुरुषाचे बोल. वक्तृत्व कलेने नटलेले ते बोल नसायचे. संतांची संत वाणी तशी टिळकांची राजकीय वाणी. त्यांचे भाषण हृदयातील स्फूर्तीच्या मुशीतून तेजाने, ओजाने नि ओघाने बाहेर पडे. मने पेटवी. कार्यकर्त्यांना प्रेरणा देई. वाक्ये कशी लहान, साधी, सोपी, सुटसुटीत. टिळकांच्या व्यक्तिमत्त्वातील तीव्र तळमळ, धैर्यशाली कृती, अलौकिक त्याग ही जणू त्यांच्या मुखावाटे लोकांना देशभक्तीचा, देशोद्धाराचा नि त्यागाचा संदेश देत. त्यांचे १९०८ च्या अभियोगातील न्यायाधिशाला दिलेले उत्तर हे तपश्चर्येमधून निघालेले उत्स्फूर्त हुंकार होत. त्यांच्या लेखनशैलीप्रमाणे वक्तृत्वाच्या शैलीतही शब्दांचे अवडंबर व नाटकीपणा यांना थारा नसे. मधून मधून टेबलावर मूठ आपटली की काम भागे. काय बोलायचे ते ठसठशीत, स्पष्ट, स्फोटक. आपल्या मुद्यांचा बचाव करीत न बसता प्रतिपक्षावर एकदम हल्ला करावयाचा हे त्यांच्या भाषणाचे वैशिष्ट्य. त्यांच्या भाषणाची ताकद त्यांच्या हावभावात नसून ती त्यांच्या तळमळीत होती.

भारतासारख्या प्रचंड देशात नेतृत्व संपादन करणे आणि ते टिकविणे ही गोष्ट सोपी नाही. त्यातही लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट ही की, महाराष्ट्रात पुढारी केवळ बुद्धिमान असून चालत नाही. नुसता स्वार्थत्यागी असून भागत नाही, किंवा

निव्वळ धैर्यवान असून निभत नाही. तो नेता ह्या तिन्ही गुणांनी तळपणारा पाहिजे, हे टिळकांच्या नेतृत्वाने महाराष्ट्रास शिकविले आहे. महाराष्ट्रातील प्रथम श्रेणीचे नेतृत्व आगीत निर्भयतेने उडी घेऊन बाहेर पडते. स्वार्थत्यागाची पताका उंच फडकाविते. ध्येयाचा ध्वज प्राण पणास लावून लढविते. ह्यांपैकी कमी-अधिक गुणांनी युक्त असलेली व्यक्ती भारताच्या अन्य विभागांत अग्रणी होऊ शकेल, परंतु महाराष्ट्राचा पुढारी व्हावयाचे म्हणजे तुकाराम महाराज म्हणतात त्याप्रमाणे 'येथे पाहिजे जातीचे येर गबाळ्याचे काम नोहे!' हे तीन गुण ज्याच्या अंगी असतात 'त्याचे पाय माझे जिवीं' असे महाराष्ट्राचे ब्रीद आहे. ह्या गुणांत फुले-टिळकांच्यासारखी निर्मळ चारित्र्याची भर पडली तर दुधात साखर पडल्यासारखेच!

जीवितध्येयाचा साक्षात्कार झालेल्या नेत्याच्या जीवनाला एक प्रकारचे तेज येते. ध्येयवादाने मनुष्याच्या धैर्याला नि निष्ठेला एक प्रकारची धार येते. त्याचे कर्तृत्व प्रत्यक्ष कृतीनेच वाढते. तशीच टिळकांच्या जीवनात त्यांच्या भव्य ध्येयामुळे धैर्याला नि निष्ठेला धार आलेली होती.

टिळक हे मूर्तिमंत धैर्य होते. नेत्याच्या अंगी अचूक नि झटपट निर्णय घेण्याची क्षमता असावी लागते. त्याचा दुसरा गुण म्हणजे तो विचारात नि आचारात निर्भय असावा लागतो. निर्णय घेतला की त्याचे दायित्व, भार त्याने निर्भयतेने उचलला पाहिजे. हे सर्व गुण टिळकांच्या अंगी होते. संकटाच्या वेळी टिळकांचे मन पर्वतासारखे अचल नि प्रशांत राही. ध्येयासाठी अविश्रांत, अहोरात्र खटपट, धडपड करणे, चिंतन करणे ह्या व्यतिरिक्त त्यांना काही सुचतच नसे.

भीती हा शब्दच त्यांच्या समकालीन जगातील समवयस्क पुढाऱ्यांत एकट्या टिळकांच्याच कोशात नसावा, असे म्हटले तर अतिशयोक्ती होणार नाही. पन्नास टक्के यशाची खात्री असली तर बंड उभारीन असे ते बेधडक उघड बोलत. त्यांच्यावरील अभियोगाच्या वेळी आणि कारावासात त्यांनी दाखविलेला आत्मनिग्रह व मनाची स्थिरता ही अलौकिकच होती. टिळक तापट असल्यामुळे ते रागाच्या भरात असहिष्णू उद्गार काढीत. पण संकटाच्या वेळी शांत राहण्याचा त्यांचा धीर गंभीर स्वभाव पाहिला म्हणजे मन थक्क होते.

टिळकांचा एक मुलगा प्लेगने वारला. तरी त्यांच्या मनाची चलविचल झाली नाही. राष्ट्र-उभारणीचे कार्य करीत असता त्यांनी आपल्या हृदयाला कर्तव्यनिष्ठेचा कठडा घातला होता. त्यामुळे ते दुःखाच्या प्रसंगी अविचल राहात.

'आलेली स्थिती मुकाट्याने सहन केली पाहिजे. प्लेगने हल्ली किती तरी मुले मरत आहेत. होळीसाठी घरोघरी गोवऱ्या गोळा करतात, तशी माझ्या घरची एक गोवरी द्यावी लागली,' असे त्यांनी सांत्वन करावयास आलेल्या गृहस्थांना सांगितले. दुसऱ्या दिवशी, त्यांच्या धाकट्या मुलाला ताप आला आहे अशी कुजबूज त्यांच्या कानावर आली. त्या वेळी ते अग्रलेखाचा मजकूर सांगत होते. ते काम संपल्यावरच त्या मुलाची चौकशी करावयास ते गेले.

राजद्रोहाच्या पहिल्या अभियोगाच्या वेळी ते मृत्युपत्र करावयास बसले. पण मृत्युपत्र कर्जासंबंधीच करावयाचे असल्यामुळे त्यांच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले! तरी निर्णयाच्या दिवशी ते हळूच म्हणाले, "आज येतेवेळी घोड्याला एका माणसाचे वजन कमी होणार!" ताईमहाराज प्रकरणात ते जामिनावर सुटले. त्यांना तुरुंगातून आणण्यासाठी त्यांचे सहकारी न. चिं. केळकर गेले असता टिळक त्यांना हसत म्हणाले, 'केळकर माझ्या उपरण्यावर सरकारी शिक्का आहे, आता ते बदलणार नाही!' त्यावर केळकर म्हणाले, 'हे धारिष्ट ईश्वराने फक्त आपल्यालाच दिले आहे!' १८९८ साली तुरुंगातून सुटून आल्यावर सहकारी नि नातलग ह्यांनी त्यांना कळकळीने विनंती करीत म्हटले, 'आता तुम्ही केसरी-वर संपादक म्हणून नाव घालू नका.' त्यावर टिळक शांतपणे म्हणाले, 'हे सतीचे वाण आहे. ज्याचे त्यानेच पत्करले पाहिजे!' आणि 'पुनश्च हरि ॐ' म्हणून, त्यांनी आपले कार्य पुन्हा सुरू केले.

मुंबईचे राज्यपाल लॉर्ड हॅरिस यांच्या स्मारकाची कल्पना टिळकांनी निर्भयपणे मोडून काढण्यात जे साहस पत्करले, त्यावरून आपण सरकारची कदर करीत नाही हे त्यांनी पुन्हा एकदा लोकांना दाखवून दिले. रॅन्डच्या गोऱ्या सैनिकांच्या छळाला लोक घाबरले तेव्हा टिळक लोकांस धीर देत फिरले. सुरत संग्रामाच्या वेळी आजूबाजूस ठोकाठोकी चालली असता टिळक शांतपणे खुर्चीत सुपारी खात बसले होते! राजद्रोहाच्या दुसऱ्या अभियोगाच्या निर्णयदिनी ते दादासाहेब खापर्ड्यांना म्हणाले, 'आजचा रंग काही निराळा दिसतो! बहुतेक काळ्या पाण्याची तयारी दिसते!' आपण दावरला 'सिनीयर' आहोत म्हणून आपणांस दुसऱ्या मजल्यावर ठेवले आहे आणि दावरचे कोर्ट खालच्या माळ्यावर ठेवले आहे, असा नर्म विनोद त्यांना त्या प्रलयकाळी सुचला! लंडन शहरातील रस्ते ते ओलांडू लागले म्हणजे त्यांचे सहकारी भीतिग्रस्त होत. त्यावेळी ते म्हणत, 'अरे, गाडीखाली सापडून मरण्यासाठी टिळक जन्मास आलेला नाही!'

टिळकांचा चेहरा उग्र आणि कठोर दिसत असे. तथापि त्या कठोरतेखालून सहृदयतेची सरस्वती वाहत असे. 'मऊ मेणाहुनी आम्ही विष्णुदास। कठिण वज्रास भेदू ऐसे ॥' हे वचन संतांप्रमाणे त्यांच्याही बाबतीत खरे होते. वज्राप्रमाणे कठोर दिसणाऱ्या टिळकांनी आपल्या एका मित्राची विद्यार्थीदशेत मातेप्रमाणे अहोरात्र शुश्रूषा केली. तो मित्र कालवश झाला. चितेवरून त्याचा पाय निसटून खाली पडला. टिळकांनी तो तोडून चितेत टाकला. सर्व सोबती स्तिमित झाले!

टिळकांचे नेतृत्व सामर्थ्यवान करणारे असे त्यांच्या ठायी गुण होते. ते म्हणजे त्यांची निरभिमानता, सहृदय गुणग्राहकता व औदार्य. त्यामुळेच दोन-तीन वेळा ते स्थानकावर गोखल्यांच्या स्वागतास गेले होते. बेझंटबाईंनी टिळकांच्या विरुद्ध भारतात प्रचार केला होता, तरी बेझंट बाईंच्या स्वागतासाठी लंडन येथे स्थानकावर टिळक उपस्थित राहिले होते. सर डॉ. भालचंद्र यांच्यावर 'गूळ आणि साखर' हा विदारक नि उपहासकारक लेख लिहूनसुद्धा ते त्यांच्याकडे औषधोपचारासाठी गेले होते. 'प्रासाद शिखरस्थोऽपि काको न गरुडायते' हा मर्मभेदक लेख रँ. परांजपे यांच्या मनाला अतिशय झोंबला आहे, असे कळताच ते म्हणाले, 'रँग्लर परांजपे यांनी सार्वजनिक जीवनात एवढा हळुवारपणा ठेवू नये.' दोन घ्यावे, दोन द्यावे असाच त्यांचा खाक्या होता.

भारतीय पुढाऱ्यांच्या मालिकेत टिळकांसारखा दानतीचा नि सढळ हाताचा लोकाग्रणी झालाच नाही, असे म्हटले तर अतिशयोक्ती होणार नाही. त्यांनी आपली कुशाग्र, प्रखर बुद्धिमत्ता नि निबंध–पांडित्य ही विधिज्ञाच्या पेशाकरिता लावली असती तर त्यांनी ऐश्वर्याची अंबारी उभी केली असती. गरीब नि गरजू लोकांना नैबंधिक सल्ला टिळकांनी निःशुल्क दिला. त्यावर एखादा निबंधविशारद ऐश्वर्यसंपन्न झाला असता. 'कामापुरता मामा' हे त्यांच्या पुढारीपणात वैगुण्य नव्हते. ते कुशल संघटक नि निस्सीम लोकसंग्राहक होते.

. ३ .

आपल्या मित्रांना दिलेली वचने मित्रांच्या मरणोत्तर कर्णाच्या उदारतेने त्यांनी पाळली. मित्रांच्या मुलामुलींची लग्नकार्ये केली. त्यांचे संसार थाटून दिले. त्यांचे स्नेही बाबामहाराज ह्यांना दिलेला शब्द पुरा करण्यासाठी त्यांनी एकोणीस वर्षे प्रतिपक्षाशी झगडा केला. मानखंडना सहन केली. आर्थिक नुकसान, शारीरिक नि मानसिक कष्ट सोसले. पदरचे हजारो रुपये खर्च केले. परंतु शब्द पुरा केला.

त्यांचे स्नेही वापट बडोद्यात संकटात सापडले असता त्यांच्या बचावासाठी टिळक अनेक दिवस बडोद्यात अहोरात्र झटले. खरोखर, मित्र म्हटला म्हणजे टिळक, टिळकांसारखा मित्र नाही. 'नुपेक्षी कदा बाळ भक्ताभिमानी' अशी त्यावेळच्या लोकांची भावना होती, ती यथार्थच होती. अनेक देशभक्तांना टिळकांनी गुप्तपणे साहाय्य केले. गुरुदेव टागोरांना पन्नास सहस्र रुपये विनाअट जागतिक दौऱ्यासाठी पाठवून दिले. टागोरांनी ती रक्कम स्वीकारली नाही, ही गोष्ट वेगळी.

टिळकांचा व्याप, खटाटोप, कनवाळूपणा ही सारी अचाट, अफाटच ! त्यांनी केवळ आपल्या अनुयायांनाच थारा दिला असे नाही. त्यांनी अनेक विद्वानांना, कार्यकर्त्यांना व क्रांतिकारकांना साहाय्य केले. ते सर्वांचे मायपोट होते. जो जो देशभक्तीने प्रेरित होऊन कार्य करीत असता अडचणीत पडेल, संकटात सापडेल, त्याला त्याला ते बिनधोक साहाय्य करीत. टिळकांचा गायकवाडवाडा म्हणजे विद्वानांचे, ंडितांचे, प्रवाशांचे, मुत्सद्यांचे, देशभक्तांचे नि संशोधकांचे एक मायेचे आश्रयस्थान, निवाऱ्याची जागा, सुरक्षित बंदर !

आपल्या पक्षातील दुय्यम पुढाऱ्यांची, सहकाऱ्यांची, स्वयंसेवकांची नि कार्यकर्त्यांची आस्थेवाईकपणे, माणुसकीने चौकशी करणारा, सहकाऱ्यांच्या व कार्यकर्त्यांच्या उशाशी रात्री पाणी, कंदिल आणून ठेवणारा, मित्रांसाठी विड्या आणवून ठेवणारा, स्वयंसेवकांस जेवण, अंथरूण आहे की नाही हे बारकाईने स्वतः जातीने पाहाणारा, असा नेता विरळाच ! विपत्काळीसुद्धा आपल्या भक्तांना जेवण घालण्यासाठी पलंग तोडून चुलीस लावणाऱ्या नेपोलियनचेच हे औदार्य. त्यामुळे टिळकपक्षातील कार्यकर्त्यांना असा आत्मविश्वास वाटे की आपल्या पाठीमागे टिळक आहेत, मग भय कसले ? टिळकांचा पाठिंबा म्हणजे धैर्याचा, वित्ताचा नि हृदयाचा ! 'टिळक तारी त्याला कोण मारी' असेच त्यांना वाटावे इतके ते उदारहृदयी होते.

तत्त्वप्रस्थापनेचे कार्य करीत असता टिळक प्रतिस्पर्ध्यांना कठोरपणे नामोहरम करीत. त्यामुळे 'बुद्धीचे सागर' असलेल्या अनेक नामवंत व्यक्ती त्यांच्यापासून दूर राहात. परंतु सहकाऱ्यांसाठी वा मित्रांसाठी, तसे मनात नसूनही, ते आपल्या तत्त्वाला मुरड घालीत. त्यामुळे त्यांच्यावरील अनुयायांची भक्ती अभंग राही.

टिळकांची निर्भय स्पष्टोक्ती व तोडून बोलण्याची सवय ही त्यांच्या विद्यार्थीदशेपासून दिसून आली. त्यामुळे त्यांचे सहाध्यायी त्यांना 'डेव्हिल' सैतान म्हणत. त्यांना केनिलवर्थ कादंबरीतील 'ब्लंट' ह्या नावाने ते संबोधीत ! ह्या स्वभावामुळे वादाच्या भरात प्रतिस्पर्ध्यांच्या गुणावगुणांचा विदारकपणे पाढा वाचणे हे टिळकांना

अपरिहार्य वाटे. टिळकांच्या मते असे करणे यात वाईट काहीच नाही. कारण ते असे म्हणत की, " ज्याला ज्याला म्हणून जगात काही कार्य करावयाचे असते त्याला प्रतिपक्षाचे मन मोडणे प्राप्त होते. आराम-खुर्चीवर बसून ज्याला विचार करावयाचा आहे त्याला कोणाचे मन मोडण्याचा प्रसंग येत नाही व तो पोकळ पोक्तपणा व तात्त्विक सौजन्याच्या हजारो गोष्टी सांगू शकतो. पण अंगीकृत कार्याला अडथळा करणाऱ्या, किंबहुना त्या कार्याची नरडी दाबणाऱ्या प्रतिपक्षाशी झुंजताना मनाचा समतोलपणा राखणे कोणालाही कठीणच जाते. आपणाला अत्यंत प्रिय व पूज्य असलेले जीवितकार्य संशयात जो आणतो, त्याच्याशी सख्य राखणे अशक्य नाही तरी कठीण आहे. आपल्याकडचाच हा अनुभव नाही तर सगळी-कडचा हा अनुभव आहे. "

तथापि ' जरा स्वैराचाराने विटाळलेली लेखणी पुन्हा हाती घ्यावी लागणार नाही अशी आशा आहे, ' अशी त्यांनीच रानड्यांवरील लेखात शेवटी कबुली दिली आहे. भांडारकरांना ते पितृतुल्य समजत. पण त्यांच्यावरही निष्ठुर हल्ले करावयास त्यांनी कमी केले नाही. त्यावर डॉ. भांडारकर मोठ्या दुःखाने म्हणाले,[२] ' मी १८६४ पासून वाङ्मयात्मक वादविवाद करीत आहे. पण माझ्याशी मुद्दाम जाणून-बुजून असभ्यपणाने वागणारा टिळकांसारखा प्रतिपक्षी मला आजपर्यंत आढळला नाही ! त्यामुळे मला या वादविवादाचा कंटाळा-वीट आला आणि हा असाच टाकून मी स्वस्थ बसलो असतो. पण हीच मंडळी त्याच्या अर्थाचा अनर्थ करून लोकांना तिसरेच भासवायची ! सबब स्वस्थ बसणे हे शक्य नसते. ' जरी पुढील एका प्रसंगी टिळकांनी बेझंटबाईंना पूतना मावशी म्हटले तरी सुरतेनंतर टिळकांनी असे कठोर हल्ले प्रतिस्पर्ध्यांवर फारसे केले नाहीत. त्याबरोबर हेही लक्षात ठेवले पाहिजे की सहिष्णुतेचा घोष करणाऱ्या नेमस्तांनी टिळकांसारख्या लोकाग्रणीला काँग्रेसच्या व्यासपीठावर बसू देण्याचा उदारपणा कधीच दाखविला नाही. तरीसुद्धा संवेदनाक्षम मनाच्या नामदार गोखल्यांच्या शेवटच्या आजारीपणात टिळकांनी जरा जपून लिहिले असते तर बरे झाले असते.

आपल्या राजकीय विरोधकांवर कुरघोडी करण्याच्या टिळकांच्या समयज्ञते-मुळे त्यांना साधनांची शुचिता नव्हती असे म्हणणे, तितकेसे ठीक नाही. टिळक

---

२. श्री. ना. कर्नाटकी, गुरुवर्य डॉक्टर सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांचें चरित्र - पृ. २५६.

साधनांच्या शुचितेपेक्षा समयज्ञतेला महत्त्व देत. साधनांची निर्भेळ शुचिता टिळकांच्या टीकाकारांच्या महात्म्यांनाही पाळता आली नाही, हे विसरून चालणार नाही. राजकारणातील नेता हा व्यवहारकुशल नि राजनीतीत प्रवीण असला पाहिजे. तसे टिळक होते. एवढे मात्र खरे की, ह्या अंतर्गत लढ्याचा उपयोग काँग्रेस संघटनेच्या सामर्थ्यासाठी, तिच्या यशासाठी फार झाला. किंबहुना काँग्रेस जनताभिमुख करण्यासाठीच टिळकांना हे व्यक्तिगत लढे द्यावे लागले, असे म्हणावयास हरकत नाही. टिळकांचे मार्ग 'आसुरी' आहेत असे गांधीजींनी त्यांना दूषण दिले होते. पुढे गांधीजींना त्यांच्या शत्रूंनी अशीच दूषणे दिली, हा राजकारणाचा महिमा होय.

जगात सर्वगुण-संपन्न असा कोण मनुष्य झाला? सर्वगुणसंपन्नता ही एका परमेश्वरापाशीच संभवते, असे सांगून टिळक-चरित्रकार साहित्यसम्राट केळकर म्हणतात, 'टिळक सद्वर्तनी होते, म्हणून त्यांच्या विद्वत्तेचे चीज झाले. ते विद्वान् होते म्हणून त्यांच्या स्वार्थत्यागाचा उपयोग झाला. ते स्वार्थत्यागी होते म्हणून त्यांच्या देशभक्तीचे चीज झाले. देशभक्त होते म्हणून त्यांच्या उद्योगाचे चीज झाले. उद्योगी होते म्हणून पराक्रमाचे चीज झाले. पराक्रमामुळे धैर्याचे चीज झाले व टिळक स्वतः धैर्यवान होते म्हणून लोकांना उपदेश करण्याची त्यांना पात्रता आली.' केळकरांचे हे म्हणणे यथार्थ होते.

वरील सर्व गोष्टी लक्षात घेता असे म्हणणे प्राप्त होते की, टिळक क्रमशः कर्त्या पुरुषाचे महापुरुष झाले. कोणताही पुरुष महापुरुष म्हणून जन्मास येत नाही. मनुष्य आपल्या अनेक दोषांवर जसजसा विजय मिळवीत जातो तसतसे त्याच्या अंगी असलेले समाजाला उपयुक्त नि उपकारशील सद्गुण प्रकर्षाने विकसित होत राहातात. परंतु मूळचे काही मानवी नि देशकालपरिस्थितीमुळे अंगी मुरलेले अल्पदोष महापुरुषातही तसेच राहून जातात. १८८० ते १८९१ मधल्या टिळकांपेक्षा १८९७ सालचे टिळक अधिक उज्ज्वल झाले. १८९८ ते १९०८ मधले टिळक भव्य, लोकोत्तर झाले. १९०८ ते १९२० मधले टिळक महापुरुष झाले.

टिळकांचा कालखंड हा ब्रिटिश साम्राज्यशाहीचा वैभवाचा काळ. काँग्रेसच्या निर्धन, निःशस्त्र नि निःसैनिक अशा त्या पूर्वकालात त्यांनी स्वतःची साधने निर्माण केल्याने ब्रिटिश साम्राज्यसत्तेला जबरदस्त धक्का देणारा आशियातील पहिला पुढारी म्हणून या थोर पुरुषास इतिहासात महत्त्वाचे स्थान आहे. 'आम्ही टिळक आणि गांधीजी यांच्यापासून स्फूर्ती घेऊन स्वातंत्र्यासाठी लढलो' असे इंडोनेशियाचे राष्ट्र-

घ्यक्ष डॉ. अहमद सुकार्नो यांनी मुंबईत आपल्या सत्कारास उत्तर देताना ११ जानेवारी १९५८ रोजी उद्‌गार काढले. ह्यावरून टिळकांच्या कार्याचे परिणाम किती दूरवर झाले होते हे दिसून येते. भारतमंत्री मॉन्टेग्युसाहेब यांच्या मते टिळकांच्या समकालीनांत टिळकांएवढा दुसरा प्रभावी पुढारी नव्हता. ' महापुरुष टिळक ' असेच त्यांनी टिळकांचे वर्णन केले आहे. ' भारतातील महान लोकनेता ' असा लेनीनने टिळकांचा गौरव केला आहे.

सरकारला दहशत वाटेल अशा रीतीने सरकारशी झुंज लढत ठेवण्यात, त्यात जास्तीत जास्त लोक सामील करून घेण्यात टिळकांएवढा महान पुढारी त्या काळी दुसऱ्या कोणत्याही प्रांतात नव्हता. राजकारणात टिळकांएवढी तीव्रता, त्याग नि धडाडी पंडित मदन मोहन मालवीय, लाला लजपतराय किंवा सुरेंद्रनाथ बानर्जी हे दाखवू शकले नाहीत. हे जीवितकार्य करीत असताना वैयक्तिक सुरक्षिततेची टिळकांनी कधीच चिंता केली नाही. जनतेसाठी नि देशासाठी त्याग करण्याची सिद्धता ठेवताना त्यांच्या मनाला वैयक्तिक स्वार्थ शिवला नाही. ह्या सर्व गुणसमुच्चयावर जणू मुकुटच असे त्यांचे प्रकांड पांडित्याने प्रकाशणारे विमल चारित्र्य! त्या गुणांमुळे टिळक अमर झाले. त्यागावाचून पूजा नाही हे महाराष्ट्रास नि भारतास पुन्हा एकदा टिळकांनी शिकविले. मायभूमीच्या उद्धारासाठी सुरू झालेल्या झगड्याशी त्यांच्या एवढा समरस झालेला त्यांच्या पिढीत दुसरा पुढारी क्वचितच असेल. देशसेवा नि राजकारण यांत जीवित व्यतीत केलेले आधुनिक भारतातील पहिले राजकीय पुढारी टिळक होत. जो नेता भारताच्या भव्य ध्येयाशी समरस होतो तो भारतीय नेता होतो, हे टिळकांपासून महाराष्ट्रीय नि इतर प्रांतांतील कार्यकर्ते शिकले. टिळकांचे जीवन हे विशाल ध्येय संपादन करण्यासाठी केलेले एक महायुद्धच वाटते. भारतीय जनतेच्या हृदयात नि भारतीय इतिहासात त्यांचे स्थान अढळ आहे. त्यांच्या शत्रूने निंदाव्यंजक म्हणून बहाल केलेली " भारतीय असंतोषाचे जनक " ही पदवी त्यांना भूषणास्पद बिरुदावलीच ठरली आहे.

भारतीय स्वातंत्र्यसंग्रामाचे टिळक हे जनक होत. त्यांनी भारतीय स्वातंत्र्यमंदिराचा पाया घातला. स्वातंत्र्याच्या लढाईचे ते प्रतीक ठरले. ह्यास्तव ते हिंदी जनतेच्या आकांक्षेचे नि स्वराज्याचे मूर्तिमंत अवतार ठरले. त्यांच्या काळात त्यांच्याएवढा लोकोत्तर राजकारणी पुरुष नि लोकप्रिय पुढारी भारतात झाला नाही. त्यांच्या एवढ्या दानतीचा नि चारित्र्याचा नेता भारताच्या गेल्या शंभर वर्षांच्या राजकीय इतिहासात क्वचित झाला असेल. गांधीजी नि अरविंदबाबू, यांनी निर्वाळा दिल्या-

प्रमाणे लोकमान्य टिळक हे आधुनिक भारताचे एक निर्माते होत. जगाच्या इतिहासात त्यांचे स्थान अमेरिकेचे वॉशिंग्टन, इटालीचे मॅझिनी, चीनचे सन्-यत्-सेन, हंगेरीचे कोस्थ यांच्या बरोबरीने मानवांच्या राजकीय स्वातंत्र्याचे एक शिल्पकार म्हणून राहील. जोपर्यंत जगातील राष्ट्रे आपापल्या पूर्वजांपासून स्फूर्ती घेत राहतील, वीरांच्या कथा मुलांना ऐकवतील, त्यागाच्या गाथा गात राहतील, तोपर्यन्त भारतीय पिढ्या कर्तृत्व, त्याग, सेवा, व्यासंग, चारित्र्य, राष्ट्रभक्ती, निर्भयता ह्यांचे स्फूर्तिस्थान म्हणून पिवळसर अंगरखा, जाड भिवया नि जाडजूड मिशा, फुगीर नाकपुड्या, भेदक डोळे, श्यामल कांती, तांबडी पगडी, लाल जोडे, काळी छत्री वा काठी यांनी युक्त अशा लोकमान्यांच्या गंभीर मूर्तीचे श्रद्धेने आणि कृतज्ञतेने स्मरण करतील.



# लोकोद्धारक राजर्षी

. १ .

**शा**हू छत्रपती गादीवर येण्यापूर्वी महाराष्ट्रात १८४८ ते १८९४ ह्या कालखंडात सामाजिक नि राजकीय प्रश्नांसंबंधी तीन विचार-प्रवाह सुरू झाले होते. लोकहितवादी गोपाळराव देशमुख ह्यांनी, मुख्यतः ब्राह्मणांना, आपली शैक्षणिक, सामाजिक, धार्मिक व औद्योगिक सुधारणा करून घेऊन कनिष्ठवर्गाशी बंधुभावाने वागावे, असा उपदेश केला. महात्मा फुले ह्यांनी स्त्रियांच्या नि कनिष्ठ वर्गांच्या शिक्षणाची, सामाजिक समतेच्या नि समानतेच्या हक्काची व समाजक्रांतीची तुतारी फुंकली. गोपाळ गणेश आगरकर यांचा व्यक्तिस्वातंत्र्यवाद नि सामाजिक सुधारणावाद हा बुद्धिप्रामाण्यवादावर अधिष्ठित होता. १८९५ साली झालेल्या त्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या विचारसरणीचे निष्ठेने अनुसरण करून हिरीरीने प्रसार करणारा कोणी प्रभावी वारस पुढे झाल्याचे दिसत नाही.

न्यायमूर्ती रानडे हे राजकारणाला नीतीचे अधिष्ठान देऊ पाहाणारे आणि देशाभिमानाच्या चळवळीला स्वदेशीचा पाया घालून देणारे थोर विचारक होते. परंतु लोकहितवादी, आगरकर नि रानडे ह्यांचे समाजसुधारणाविषयक विचार बहुतांशी ब्राह्मण समाजाशी वा वरिष्ठ समाजाशी निगडित झालेले होते. त्या तिन्ही सुधारकांच्या अनुयायांमध्ये परंपरावादी सुधारक, 'व्युत्पत्तिसुधारक,'[१] थंडे सुधारक, मंद सुधारक, बोलके सुधारक, गरम सुधारक व वागते सुधारक होते; कर्ते असे सुधारक मात्र थोडेच होते. बालविवाह, विधवाविवाह, स्त्रीशिक्षण, सोवळे-ओवळे ह्यांविषयी मतप्रचार करून विधवेला केशवपनापासून वाचवावी; वसन नि भोजन ह्या बाबतीत तिला संन्याशाशी स्पर्धा करावयास लावू नये, अशी ते प्रार्थना करीत असत.

१. न्या. मू. रानडे ह्यांची धर्मपर व्याख्याने, पृ. ३६४.

महात्मा फुले ह्यांचा भर सामाजिक समता प्रस्थापित करणे, जातिभेद नष्ट करणे व कनिष्ठ वर्गांची उन्नती करणे ह्यांवर होता.

फुलेमतप्रणाली हा एक प्रवाह, लोकहितवादी, रानडे व आगरकर ह्यांचा दुसरा प्रवाह आणि विष्णुशास्त्री चिपळूणकरप्रेरित टिळक प्रवाह हा तिसरा प्रवाह; असे तीन विचार-प्रवाह त्या काळी महाराष्ट्रात चालू होते. हा तिसरा प्रवाह समाज-सुधारणेस प्रतिकूल होता; केवळ राजकीय सुधारणेस तो अनुकूल होता. आधी सामाजिक की आधी राजकीय ह्या प्रश्नाचा निकाल, आगरकरांच्या मृत्यूनंतर ' आधी राजकीयच ' असा झाला. शेवटी परंपरावादी राष्ट्रवादाने पहिल्या दोन प्रवाहांवर मात केली. धर्मसुधारणा व सामाजिक सुधारणा घडवून आणण्याच्या हेतूने जन्मास आलेले प्रार्थनासमाज व ब्राह्मसमाज हे निस्तेज झाले. ग्रामीण भागात फुलेविचारसरणी मात्र तग धरून राहिली आणि ती पुढे १९१० पासून प्रभावी होऊ लागली.

उपरोक्त कालखंडात महाराष्ट्रात आर्यसमाज, प्रार्थनासमाज व सत्यशोधक-समाज हे तीन समाज नवविचारप्रचाराचे काम करीत होते. त्यावर विष्णुशास्त्री चिपळूणकरांचा घणाघाती हल्ला होऊन गेला होता. महाराने देवाचे दर्शन घेतले तर देव बाटतो, स्त्री शिकली तर ती विधवा होते, कोणाचाही हात धरून जाते, कुमार्गी होते, अशी त्या काळी समजूत असे. अलुतेबलुते आडवे होऊन गाव-गाड्याच्या चाकातील रवे निखळून पडलेले होते. शिक्षण वरिष्ठ समाजातून खाली झिरपत जाईल, अशी मेकॉलेकृत धोरणाची री वरिष्ठ समाजातील मंडळी ओढत बसली होती. म. फुले ह्यांनी त्या धोरणाला विरोध करून सार्वत्रिक सक्तीच्या शिक्षणाची मागणी केली होती. १८८१–८२ ह्या वर्षी मुंबई प्रांतातील माध्यमिक शाळांत वा महाविद्यालयांत एकही हरिजन विद्यार्थी नव्हता.[2] मग देशी संस्थानां-मधील शाळांत नव्हता हे सांगावयास नकोच. स्थानिक स्वराज्याचे हक्क ब्रिटिश-भारतास नुकतेच देण्यात आले होते.

2. Statement concerning the state of Education of the Depressed Classes in the Bombay Presidency, submitted by Dr. Bhimrao R. Ambedkar, M. A., Ph. D., D. Sc., Bar-at-Law, Member of the Legislative Council, Bombay to the Indian Statutory Commission, p. 10.

मुंबई येथील ब्राह्मणसभा १७ जून १८८८ रोजी स्थापन झाली. तिच्या स्थापनेची पार्श्वभूमी सांगताना 'ब्राह्मण सभेची गेली साठ वर्षे' ह्या ग्रंथाचे लेखक वा. रा. गुळवणे म्हणतात की, "जोतीराव फुले ह्यांनी स्थापन केलेल्या सत्य-शोधकसमाजाने ब्राह्मण समाजावर प्रखर हल्ले सुरू केले होते. वेद, मूर्तिपूजा, चातुर्वर्ण्य आणि पौरोहित्य ही सर्व झुगारून दिली पाहिजेत–किंबहुना त्यामुळेच ब्राह्मणेतर समाज अवनतावस्थेला पोहोचला अशा प्रचाराचा सत्यशोधक समाजाने धूमधडाका सुरू केला. राज्यसत्ता सर्वस्वी इंग्रजांच्या हाती असली तरी कित्येक महत्त्वाच्या नोकऱ्या पटकावण्यात ब्राह्मण समाजाला यश मिळाल्यामुळे ब्राह्मणेतर समाजाचा जळफळाट सुरू झाला. महाराष्ट्रात मराठा समाज बहुसंख्य असल्यामुळे समाजाची धार्मिक गुलामगिरी नष्ट झाल्याशिवाय त्याची उन्नती होणे शक्य नाही अशा मतांचा जोरात प्रचार चालू झाला. काही तरी करून ब्राह्मण समाजाचे नाक खाली करावयाचे असा जणू सत्यशोधक समाजाने विडाच उचलला होता असे म्हणावयास हरकत नाही."[३]

गुळवणे ह्यांनी सत्यशोधकांविषयी काढलेले उपरोक्त उद्गार आणि डॉ. केतकर ह्यांनी आपल्या 'भारतीय समाजशास्त्र' ह्या ग्रंथात गौतमबुद्ध आणि त्याचे कार्य ह्याविषयी जो उल्लेख केला आहे, त्यात बरेच साम्य आहे. डॉ. केतकर म्हणतात : "गौतमबुद्धाच्या वेळेस गौतम जे वातावरण निर्माण करू पाहात होता, ते ब्राह्मण-द्वेष्टे होते यात शंका नाही. तो क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य, शूद्र अशी वर्णपरंपरा मांडीत असे. तो ब्राह्मणांना हीन कुळातील असे उल्लेखी आणि त्याच्या अंगी ब्राह्मणद्वेष इतका भरलेला दिसत होता की, त्यासाठी त्याने विद्याविकासावर देखील आघात केला आहे. इतर ब्राह्मण गणित करतात, ग्रहणे वर्तवितात, मी गौतमभिक्षु या कृत्यांपासून अलिप्त आहे, असा तो लोकांस उपदेश करी."[४]

कोल्हापूर राज्याची राज्यसूत्रे शाहूमहाराजांच्या हाती येईपर्यंत त्यांच्या पूर्वीचे पाच छत्रपती अगदी दुर्बल नि दुर्दैवी ठरले होते. जिच्या नेतृत्वाखाली मोंगलाईवर नांगर फिरवून मराठ्यांनी महाराष्ट्राचे स्वातंत्र्य रक्षण करून नवीन जोमाने तळपत ठेविले, त्या रणरागिणी स्वातंत्र्यलक्ष्मी महाराणी ताराबाईच्या राज्याला उतरती कळा लागली होती. कोल्हापूरच्या प्रजेस साठसत्तर वर्षे स्वप्रभूच्या अमलाखाली

---

३. पृ. १०.

४. पृ. १५०.

राहण्याची फारशी संधीच न मिळता, त्यांना दिवाणशाही, रिजंटशाही आणि कौन्सिलशाही यांच्या बेबंदशाहीत दिवस कंठावे लागले होते. १८२१ साली एका छत्रपतीचा खून झाला. दुसरे यात्रेत मृत्यू पावले. तिसरे महाराज मुखत्यारी मिळाल्याबरोबर परलोकवासी झाले. चवथे मुखत्यारी मिळण्यापूर्वी परदेशात काल-वश झाले. पाचवे महाराज अत्यंत भयंकर मानसिक यातना सोसून अहमदनगरच्या किल्ल्यात मृत्यू पावले.

अनेक वर्षांच्या विपत्तीच्या नि बेबंदशाहीच्या काळानंतर कोल्हापूर राज्याला शिक्षणसंपन्न, तेजस्वी, खंबीर नि समर्थ असा नृपती शाहू छत्रपती यांच्या रूपाने लाभला. शाहू महाराज कागल येथील घाटगे घराण्यातील. त्या वेळी कोल्हापुरात युरोपियन, ब्राह्मण, पारशी ह्या अधिकाऱ्यांच्याच हाती सारी सत्ता होती. बरीच वर्षे छत्रपतीच्या हाती सत्ता नसल्यामुळे तेथे प्राथमिक शिक्षणाची व्यवस्था अत्यंत निकृष्ट होती; संस्थानच्या मांडलिकांवर राजाचे प्रत्यक्ष नियंत्रण नसल्यामुळे ते त्याच्याशी चढेलपणाने वागत असत. इनामदार नि जमीनदार हे कर्जबाजारी झाले होते.

कोल्हापूरच्या राज्यकारभारात १८९४ साली साठ ब्राह्मण अधिकारी असून ११ ब्राह्मणेतर होते. खाजगी खात्यामध्ये ४६ ब्राह्मण असून सात ब्राह्मणेतर होते. त्या वेळी नऊ लाख लोकसंख्येपैकी २६ हजार लोक ब्राह्मण नि तत्सम वरिष्ठ वर्गाचे होते.

. २ .

शाहू छत्रपतींनी २ एप्रिल १८९४ रोजी आपल्या हाती राज्यसूत्रे घेतली असे प्रसिद्ध करून ' केसरी 'कार टिळकांनी ' करवीरक्षेत्री राजकीय कपिलाषष्ठीचा योग ' ह्या आपल्या अग्रलेखात छत्रपतींविषयी शुभेच्छा प्रदर्शित करताना म्हटले की, " हिंदुत्वाचा योग्य अभिमान बाळगून त्याच्या अभ्युदयाकरिता निष्कामबुद्धीने आपला देह झिजविणे हे कोल्हापूरकर महाराजांचे कुलव्रत आहे व ते पाळण्यास श्रीमंत शाहू छत्रपती महाराजांस ईश्वर सुबुद्धी, धैर्य, आणि दीर्घायुष्य देवो व महाराजांस त्याप्रमाणे यशप्राप्ती होऊन त्यांचा सदैव सारखा उत्कर्ष होवो, अशी आजच्या मंगलप्रसंगी प्रार्थना करून हा स्वल्प अभिनंदनपर लेख येथेच संपवितो."[५]

५. प्रकाशक, केसरी–मराठा संस्था, पुणे.
लो. टिळकांचे केसरीतील लेख, भाग १ ला, पृ. ३००.

आणि तो दिवस खरोखरीच केवळ कोल्हापूर संस्थानालाच नव्हे तर अखिल महाराष्ट्राला मंगलदायक ठरला. छत्रपती शिवाजी महाराजांनंतरचा लोकाभिमुख, प्रजाहितदक्ष, जनतेस शहाणी करून सोडणारा, तिची अवनती थोपवून तिला उन्नतीकडे नेणारा असा राजा महाराष्ट्रात प्रथमच अवतरला. तो ज्ञानी असून क्रियाशील होता. तो राजा असूनही रयतेमध्ये मोकळेपणाने फिरणारा होता. त्याने सर्व थरांतील प्रजेचे जीवन जवळून निरीक्षिले. त्यांची शेती आणि वसती पाहिली. त्यांचे अन्न खाऊन पाहिले. रस्ते, शाळा, पाणवठे नि नद्या पाहिल्या.

अनेक वर्षे करवीर राज्यावर पडलेल्या रात्रीच्या निबिड अंधकारानंतर हळूहळू उषेचा उजेड पसरू लागला. अज्ञान, अंधश्रद्धा नि दारिद्र्य हे मानवाचे तीन महान शत्रू आहेत. अज्ञान्यांच्या मनोयंत्राला शिक्षणाची किल्ली दिली की, त्यांच्या उत्कर्षाचे काटे फिरू लागतात. ह्या नवागत तरुण राजाने समाजपुरुषाच्या अंगाला अनेक युगे कीड लावून बसलेला रोग नाहीसा करण्याचे ठरविले. त्यांनी सामाजिक अन्याय दूर करण्यास, समाजाची प्रगती करण्यास खालच्या थरापासून आरंभ केला. बहुजनसमाजाच्या मागासलेपणास शिक्षणाचा अभाव हे कारण आहे, हे त्यांनी जाणले. जनतेच्या शिक्षणासाठी वसतिगृहे स्थापण्याचा संकल्प त्यांनी सोडला. प्रारंभी काही मराठा विद्यार्थ्यांची राजवाड्यात राहण्याची त्यांनी व्यवस्था केली. सुग्रास भोजन, शाळेत न्यायला गाड्या. त्यामुळे मुले लाडावली आणि अभ्यासात गडगडली. तेव्हा ती व्यवस्था त्यांनी बंद केली.

त्यानंतर कॉलेजला जोडून सर्व जातींच्या मुलांसाठी काढलेले वसतिगृह त्यांनी ब्राह्मण अधिकाऱ्याच्या ताब्यात दिले. तेथे दहा वर्षांत फक्त ब्राह्मणच शिकले ! त्यामुळे ती कल्पना सोडून देऊन महाराजांनी जातीजातीत कार्यकर्ते निर्माण केले. त्यांना हाती धरून आणि मार्गदर्शन करून त्यांनी त्यांच्याकडून वसतिगृहे काढविली. त्यासाठी त्यांना मोफत जमिनी दिल्या. त्यांना सोयी करून दिल्या आणि इतर अनेक सवलती दिल्या. इमारती बांधण्यासाठी पैसे दिले. मराठे, जैन, लिंगायत, अस्पृश्यजन, सारस्वत, दैवज्ञ, शिंपी, मुसलमान, वंजारी यांची वसतिगृहे सुरू होताच कोल्हापूर नगरी 'विद्यार्थी-वसतिगृहांची जननी' बनली. आरंभी मुसलमान विद्यार्थ्यांकरिता जागा नव्हती, तेव्हा मराठा वसतिगृहातच त्यांची व्यवस्था करण्यात आली.

महाराजांचे शैक्षणिक कार्य सर्व महाराष्ट्रभर पसरले होते. त्यांनी नाशिक,

अहमदनगर, पुणे इत्यादी ठिकाणी विद्यार्थ्यांसाठी वसतिगृहे बांधून दिली. शिक्षण-संस्थांना सढळ हाताने साह्य केले. हे कार्य त्यांनी जातिधर्मनिरपेक्ष बुद्धीने केले. म्हणूनच त्यांचे नाव भारतात गाजले. महाराजांनी देवस्थानांच्या उत्पन्नाचा मोठा भाग आणि सरकारी धर्मादाय खात्याचा भाग गरिबांच्या शिक्षणाकरिता खर्च केला. त्यावर ऐतखाऊ साधुसंत पोसून कोणी न पाहिलेल्या स्वर्गातील सुखाची त्यांनी पर्वा केली नाही, हे त्यांचे वैशिष्ट्य होय. राजाराम कॉलेजमध्ये १८९४ साली ७९ विद्यार्थ्यांपैकी फक्त ६ विद्यार्थी ब्राह्मणेतर होते. महाराजांच्या मृत्युसमयी २६५ विद्यार्थ्यांपैकी १०० च्यावर ब्राह्मणेतर होते. संस्थानात १८९४ साली ८००८ विद्यार्थी होते. तर १९२२ साली ते २१,०२७ झाले. साहजिकच शिक्षण-क्षेत्राच्या आघाडीवर भारतात बडोदे, त्रावणकोर व म्हैसूर ह्या संस्थानांबरोबर कोल्हापूर चमकू लागले. विख्यात झाले. महाराज पुण्यातील डेक्कन एज्युकेशन सोसायटीचेही अध्यक्ष होते.

समाजाची सर्वांगीण उन्नती करणे हीच शिवाजी महाराजांची हिंदवी स्वराज्याची कल्पना होती. खऱ्या थोर पुरुषांची सहानुभूती व्यापक असते. मुसलमानांचेही शिक्षण झाले पाहिजे. राष्ट्राचे तेही अंग सुधारले पाहिजे. त्याला गती मिळाली पाहिजे. त्याचे जीवन अज्ञानाच्या डबक्यातून बाहेर पडून वाहू लागले पाहिजे, असे धोरण ठेवणारा शाहू छत्रपती हा नवभारतातील पहिला राजा होय. अंत्यजांपासून वंजाऱ्यांपर्यंत शिक्षणाची सोय करून त्यांनी त्या चिमण्यांना गरुडाशी टक्कर देण्यासाठी संजीवन दिले.

शाळा, तलाव, रुग्णालये, कचेऱ्या, राजवाडा, राजाची पंगत, ही सर्व हरिजनांना नि गिरिजनांना खुली केली. त्यांची हजेरी नि अवहेलना बंद करून त्यांना माणुसकीचे हक्क परत दिले. त्यांना सन्मानाने जगता यावे म्हणून नोकऱ्या दिल्या. धंदे काढण्यास उत्तेजन दिले. एका अस्पृश्यास उपाहारगृह काढून देऊन त्या उपाहारगृहात महाराज स्वतः चहा घेऊ लागले. त्यांनी महारमांगांना माहूत म्हणून नोकर नेमले. राजकन्येच्या विवाहाच्या वेळी इतर नागरिकांबरोबर हरिजनांनाही पाहुण्यांच्या आदरसत्काराची कामे देऊन त्यांनी त्या समारंभात त्यांना मिरविले. त्यांना टपालाची ने-आण करण्याचेही काम दिले.

अशा रीतीने छत्रपतींनी अस्पृश्यांच्या जीवनास एवढी मोठी कलाटणी दिली की, त्या समाजातून पुढे अनेक चांगले कार्यकर्ते तयार झाले. दत्तोबा पोवारांसारखे अनेक कार्यकर्ते नि पुढारी त्या समाजाच्या उद्धाराचे काम करू लागले.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या नेतृत्वाखाली कोल्हापुरबाहेरील महाराष्ट्रात अस्पृश्यांच्या स्वातंत्र्यासाठी ते झगडू लागले. हरिजनांच्या अनेक परिषदा भरल्या. त्या परिषदांचे अध्यक्ष स्वतः छत्रपती झाले. त्यांची भाषणे मागगाव ते दिल्ली आणि नागपूर ते हुबळीपर्यंत झाली. महाराजांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकर ह्यांच्या कार्यात मोठे साहाय्य केले. त्यांनी आर्थिक साहाय्य देऊन डॉ. आंबेडकरांना 'मूकनायक' नावाचे पाक्षिक काढावयास लावले. आपल्या विश्वविद्यालयीन अभ्यासपूर्तीसाठी डॉ. आंबेडकर १९२० साली लंडनला गेले, तेव्हाही त्यांना महाराजांनी आर्थिक साहाय्य केले.

शेवटी १९१८ साली महाराजांनी महारांची बलुते पद्धत बंद करून त्यांच्या जमिनी त्यांच्या नावावर रयतवारीने करून दिल्या आणि कोल्हापूर संस्थानातील महारांची महारवतनाच्या गुलामगिरीतून मुक्तता केली. महारमांगादी अस्पृश्यांना दिलेल्या मानवी हक्कांच्या विरुद्ध जे दंगेधोपे करतील, त्यांना कडक शासन होईल असे फर्मान काढले. पुढे दरबारने कुलकर्णीवतने नष्ट केल्यावर महारातील नि इतर अस्पृश्यवर्गातील तरुणांना महाराजांनी तलाठी नेमले. दत्तोबा पोवारांची कोल्हापूर नगरपालिकेच्या स्थायी समितीच्या अध्यक्षपदी नेमणूक केली.

महाराष्ट्रातच नव्हे तर भारतातील इतर प्रांतांत अशी महान क्रांती पूर्वी घडली नव्हती. महार अन् तलाठी, चांभार नि नगरपालिकेच्या स्थायी समितीचा अध्यक्ष, अस्पृश्य नि वकील, महार नि टपालशाला, हे दुर्मिळ क्रांतिमय दृश्य महाराष्ट्रात दिसले. मानवी हक्काचा जाहीरनामा घोषित न करता दलितांना नि पददलितांना त्यांचे मानवी हक्क परत देण्याची ही कृती म्हणजे अलौकिक धैर्याची नि कृतिशूरपणाची पताकाच होय. आणि गंमत अशी की, जी गोष्ट शाहू महाराजांनी १९१८ साली केली, ती गोष्ट मुंबई प्रांताचे मुख्यमंत्री श्री. खेर हे १९३७ साली करू शकले नाहीत. पण तीच गोष्ट १९५९ साली यशवंतरावजी चव्हाण हे द्विभाषिक राज्याचे मुख्यमंत्री होताच त्यांनी करून दाखविली. आणि महाराष्ट्रातील महारांना गुलामगिरीच्या वतनातून मुक्त केले. जे कार्य एका यशवंतरावजींनी म्हणजे शाहू महाराजांनी सुरू केले, ते दुसऱ्या यशवंतरावजींनी पूर्ण केले हा एक मोठा योगायोगच.

छत्रपतींना सर्व जातींचा, सर्व धर्मीयांचा उत्कर्ष साधावयाचा होता. शिक्षण ही समतेची चावी, उद्योगाची जननी. राज्यकर्त्यांचे खरे कर्तव्य शिक्षण व उद्योग ह्यांची वाढ करणे; कारभार नीट दक्षतने, निष्ठेने, समान दृष्टीने चालविणे. वास्तव

तरुण महाराजांनी एकाच जातीच्या हाती राज्यसूत्रे ठेवणे हे अन्यायाचे धोरण स्वीकारले नाही. राष्ट्राच्या राजकारणात व राज्यकारभारात सामाजिक शक्ती समबल असाव्यात, असे त्यांचे धोरण होते. त्यासाठी त्यांनी मागासलेल्या जातींना राज्यातील पन्नास टक्के नोकऱ्या राखून ठेवण्याचा क्रांतिकारक ठराव जाहीर केला. ब्राह्मण-समाजाला त्यायोगे धरणीकंपाच्या धक्क्यासारखा धक्का बसला. राज्यकारभारात ब्राह्मणांची मक्तेदारी होती. तिला प्रचंड हादरा बसला.

मुंबई प्रांतातील लोकसंख्येच्या ५ टक्के असणाऱ्या ब्राह्मणांच्या हाती त्या काळात तेथेही राज्यकारभाराची दुय्यम सूत्रे होती. त्याकाळी मद्रासमध्ये ब्राह्मण ३ टक्के होते. त्यांना २२०० राजपत्रित अधिकारांच्या जागांपैकी ८२० जागा, तर लोकसंख्येच्या ६४ टक्के असणारे मागासलेले नि हरिजन ह्यांना २२०० पैकी फक्त ७५ जागा आणि इतर जागा युरोपियनांना व इतरेजनांना, अशी छत्रपती शाहूच्या कालखंडानंतरही मद्रासमध्ये परिस्थिती होती.[६] ह्या अवस्थेतून नि अड-चणीतून कोल्हापूर शासनास सोडवावे, जनतेपर्यंत सुधारणेचे हुकूम चांगल्या तऱ्हेने पोचावे, जनतेला फायदे मिळावे, साह्य व्हावे, हाच उपरोक्त ठरावाचा हेतू होता.

महाराजांच्या ह्या ठरावामुळे ब्राह्मणांच्या ताब्यात असलेली राज्यकारभारातील नि राजकारणातील सत्ताकेंद्रे त्यांच्या हातून हळूहळू निसटू लागली. त्यांची पत, प्रतिष्ठा नि सत्ता ह्यांना ग्रहण लागले. कोल्हापुरचे ' ब्राह्मणी ' पत्र ' समर्थ ' ह्याने अकांडतांडव केले ! राजाराम कॉलेजमध्ये जे तरुण शिकत आहेत, त्यांचा तोटा होणार, त्यांना अन्याय होणार, त्यांच्यामध्ये असंतोष पसरत आहे, असा ' समर्था'ने[७] आक्रोश सुरू केला. राजारामी विद्यार्थ्यांनी कोल्हापुरबाहेर जाऊन अधिकार, नोकऱ्या मिळविल्या म्हणजे ' समर्था 'ला आनंद होई. परंतु बाहेरच्या सुशिक्षित ब्राह्मणेतराला कोल्हापुरात नोकरी मिळाली म्हणजे ' समर्थ ' वेडापिसा होई. दलितांचा उत्कर्ष साधणे म्हणजे देशभक्ती. ही कल्पना ' समर्था 'ला कधीच शिवली नाही. पदवीपर्यंत शिक्षण घेतलेल्या एका जैन तरुणाला महाराजांनी नोकरीस नेमताच ' समर्थ ' नि कोल्हापुरचे न्यायाधीश गोखले ह्यांनी गिल्ला केला ! न्याया-धीश गोखले ह्यांनी महाराजांना त्याची नेमणूक रद्द करावयास भाग पाडले. त्यासंबंधी महाराज म्हणाले : " ब्राह्मणांची कारस्थाने कधीही बंद होणार नाहीत, असे मला

6. Sanjana, J. E. *Caste And Outcaste*, P. 72

७. लट्ठे, आ. बा., श्रीमच्छत्रपति शाहुमहाराज यांचें चरित्र, पृ. १४२.

वाटते. धर्माचे बाबतीत उत्पन्न झालेल्या मतभेदाची ब्राह्मणांना विशेष दिक्कत वाटत नाही; परंतु मागासलेल्या वर्गांना पुढे आणण्याचे माझे धोरण मात्र पुष्कळ ब्राह्मणांना आवडत नाही, हीच गोष्ट खरी असावी. कालचक्राच्या फेऱ्यामुळे जी नवीन परिस्थिती उत्पन्न झाली आहे, तिला तोंड देणे त्यांना प्राप्त आहे. "[८]

ब्राह्मणांनी आणि इतर वरिष्ठ समाजातील काही व्यक्तींनी आरंभी म्हणजे १८२१ ते १८८२ पर्यंत कनिष्ठ वर्गाच्या शिक्षणास विरोध केला. "ब्राह्मण भूदेव शिक्षणाचे दरवाजे सर्वांना सारखे उघडे झाले आहेत, असे पाहून नाखूष झाले आहेत," असे १८५२ साली 'ज्ञानोदया'ने म्हटले होते. त्याकाळचे म्हणजे शाहूपूर्व महाराष्ट्राचे वर्णन करताना लोकहितवादींनी म्हटले होते की, "ब्राह्मणांनी युक्तीने आपले स्वाधीन विद्या ठेविली. इतरांस शिकवू नये असा धर्म लावून दिला.... भटांनी शाळा घालून कोणी तयार केले, किंवा कोणास विद्वान केले?....हल्ली बहुधा सर्व रोजगार ब्राह्मणांनी बळकाविले आहेत. म्हणजे एकीकडे भटांनी धर्म व दुसरीकडे गृहस्थांनी रोजगार अशा दोन्ही बाजू धरून इतर लोकांस आत येऊ देऊ नये, अशी शक्कल केली होती...आता जर कोणी शूद्र जातीचा कारकून झाला, तर सर्व ब्राह्मण लोक त्याजकडे डोळे वटारून पाहातात. त्यांस असे वाटते की, आमचा धर्म लिहिणे पुसणे करावयाचा असून कुणबी आमचा वृत्तिच्छेद करितात."[९]

शाहूकालीन ब्राह्मणांनी ब्राह्मणेतरांच्या शिक्षणास प्रत्यक्ष विरोध करायचे जरी सोडून दिले, तरी त्यांना त्यांच्या शिक्षणापासून होणारे परिणाम पसंत नव्हते. म्हणून ते छत्रपतींचा द्वेष करू लागले. त्यांची निंदा करण्याची त्यांनी एकही संधी गमावली नाही.

. २ .

महाराजांनी राज्यकारभाराकडे काळजीपूर्वक लक्ष पुरविले. नवीन राज्यकर्त्याने आपले पाय जमिनीस लावण्याची दक्षता नेहमीच बाळगली पाहिजे तशी ती महाराजांनी घेतली. न्याय देण्याचे आपले अधिकार मुंबई सरकारकडून मोठ्या दक्षतेने त्यांनी थोड्याच काळात परत मिळविले. कोल्हापूर नगरपालिकेच्या कारभारात भ्रष्टाचार चालला होता. त्यामुळे त्यांनी नगरपालिकेचे कार्य १९०४ साली काही काळ

८. कित्ता – पृ. १४४.

९. संपादक, टिकेकर, श्री.रा., लोकहितवादींचीं शतपत्रे, पृ. ७१–७२, २९३, ३१५.

स्थगित केले. स्वतः राज्यकारभाराकडे लक्ष देऊन निर्णयासाठी तुंबलेल्या ५०० प्रकरणांपैकी जी १५० प्रकरणे पुनर्न्यायासाठी आलेली होती, ती दररोज सहा प्रमाणे निकाल करून संपविली. नवीन मंत्रिमंडळ आणि आज्ञाधारक विश्वासू नोकरवर्ग ह्यांमुळे राज्यकारभारातील कार्यक्षमता वाढू लागली. जहागिरदारांचा अनियंत्रित कारभार सुधारावा म्हणून त्यांना ब्रिटिश सरकारच्या संमतीने तंबी दिली. त्यांना बजाविले की, जहागिरींवर कर्जे काढावयाची नाहीत. महाराजांनी शेतकऱ्यांच्या अडचणी दूर केल्या. चहा, कॉफी यांची लागवड केली. काताच्या कारखान्यांना उत्तेजन दिले.

महाराजांनी विद्येचा प्रसार करण्याच्या प्रयत्नाबरोबर उद्योगधंद्यांचीही वाढ करण्यासाठी महान प्रयत्न केले. त्यात त्यांची योजकता, धडाडी नि द्रष्टेपणा दिसून येतो. 'श्री शाहू छत्रपति स्पिनिंग ॲण्ड वीव्हिंग मॅन्युफॅक्चरिंग कंपनी' सुरू होणार असे डिसेंबर १९०५ मध्ये जाहीर करण्यात आले. सप्टेंबर १९०६ मध्ये ती सुरू झाली असे दिसते. "अशा प्रकारचे उद्योग कोल्हापुरात दोन तीन वेळा होऊन फसले. त्यात ब्राह्मण म्हणजे या कामास न रुळलेले लोक प्रमुख होते. हल्लीच्या प्रयत्नास ब्राह्मणांची शिवाशीव नाही...कोणाच्याही कोंबड्याने का होईना सूर्योदय होवो म्हणजे झाले," असे 'ग्रंथमाले'ने डिसेंबर १९०६ च्या अंकात खवचटपणे म्हटले आहे.[१०] कंपनीचे कार्यवाह श्री. खंडेराव अप्पासाहेब गायकवाड हे होते. "पण पुढेमागे लवकरच जगदंबेपुढे कोल्हापुरी साखरेचे पेढे वाटण्याचा सुप्रसंग येवो अशी आशा प्रदर्शित करून, तूर्त कापडी गिरणीचे आम्ही अभिनंदन करतो," असेही 'ग्रंथमाले'ने म्हटले आहे.

महाराजांनी शाहूमिलकरिता जागा व तलाव मोफत दिला. गिरणीला भांडवलाची मदत केली. चालकांना काही वर्षांचा मक्ता दिला. तरीसुद्धा अव्यवस्थेमुळे प्रारंभी काही काळ अपयश आले. शेवटी सरकारने शाहूमिल ताब्यात घेतली. दरबारच्या देखरेखीखाली ती गिरणी भरभराटली. शिरोळरोड येथील जिनिंग फॅक्टरीला व रायबाग येथे एका ब्राह्मण तज्ज्ञाने चालविलेल्या हातमागाच्या कारखान्याला महाराजांनी मदत केली. रायबाग येथे रंगाचा कारखाना काढता येईल की नाही, हे पाहाण्यासाठी एक रसायनशास्त्रज्ञ देखील पाठवण्यात आला होता. महाराज पुण्याच्या स्वदेशी कागदाच्या गिरणीचे एक मोठे आश्रयदाते होते. ते स्वतः स्वदेशी कागदच वापरीत.

१०. संपादक, विजापूरकर, वि. गो., ग्रंथमाला, वर्ष १२, अंक ९, पृ. १–२.

उद्योगधंद्यांची वाढ होण्याच्या दृष्टीने महाराजांनी एक नवीन नगर बसविण्याचे ठरविले. तेथे जाऊन व्यापार करण्यासाठी त्यांनी व्यापाऱ्यांना सोयी उपलब्ध करून दिल्या. अशाप्रकारे शाहूपुरी ही नगरी उभारली गेली. त्यामुळे संस्थानातील गुळाचा व्यापार लक्षावधी रुपयांनी वाढला. कोल्हापुरची व्यापारी जगात पत नि प्रतिष्ठा त्यांनी वाढविली. कोल्हापूर संस्थानचे स्वरूप पालटण्याचे दुसरे एक महान कार्य त्यांनी हाती घेतले. ते म्हणजे एक प्रचंड तलाव बांधण्याचे. तलाव बांधण्याची ही कल्पना त्यांना प्रथम लंडनमध्ये १९०२ साली सुचली. प्रवासात अनेक गोष्टींचे ते बारकाईने निरीक्षण करीत. अनेक गोष्टींची जिज्ञासापूर्वक माहिती घेत.

चारपाच वर्षे विचार केल्यावर तलाव बांधून पाण्याचा पुरवठा करण्याची ती भव्य योजना १९०७ सालच्या आरंभी त्यांनी निश्चित केली. एप्रिलमध्ये जागेची पाहणी झाली. कोल्हापुरच्या पश्चिमेस सुमारे ३० मैलांच्या अंतरावर दाजीपूरनजीक भोगावती नदीला बांध घालण्याचे ठरविले. महाराणी लक्ष्मीबाई ह्यांच्याच हस्ते १९०९ सालच्या नोव्हेंबरमध्ये त्या महान कार्यास आरंभ झाला. तलावाचे लक्ष्मीबाई तलाव असे नाव ठेवले. काही काम मक्ते देऊन व काही काम सरकारी खात्यामार्फत केले. महाराजांच्या हयातीत ते काम पूर्ण झाले नाही; एवढे ते अवाढव्य, भव्य होते. हजारो लोकांनी १५ वर्षे काम केले. शिवाय त्यांनी दुसरे सुमारे वीस तलाव बांधले. लक्ष्मीतलावाजवळ त्यांनी आपल्या राधाबाई ह्या राजकन्येच्या नावाने राधानगरी नावाचे शहर वसविले.

महाराजांनी कोल्हापुरात १९१२ साली सहकारी कायदा मंजूर केला आणि सहकारी चळवळीस चालना दिली. 'बलभीम को-ऑपरेटिव्ह सोसायटी' हे त्यांपैकीच एक अपत्य होय. तेथे नंतर 'अर्बन को-ऑपरेटिव्ह सोसायटी' सारख्या दुसऱ्या अनेक सहकारी संस्था निघाल्या. महाराजांनी लक्ष्मीतलावाची योजना केल्यामुळेच आज कोल्हापूर जिल्ह्यात हरितक्रांती झालेली आहे. त्या हरितक्रांतीचे ते जनक आहेत. त्यांचे ते भव्य स्वप्न साकार करणारे कोल्हापुरात काही पराक्रमी योजक निघाले हे महाराजांना भूषणावह आहे. जेथे पाणी तेथे प्रगती. कोल्हापुरने अलीकडे अभूतपूर्व अशी हरितक्रांती केली आहे. शेतकऱ्यांच्या ठायी नवीन प्रेरणा निर्माण करणे, नवी पिके लावणे, सहकारी कारखाने काढणे हे छत्रपतींचे धोरण आजच्या हरितक्रांतीचा पाया ठरले आहे.

कोल्हापूर हे भारतात सहकारी क्षेत्रात अग्रेसर ठरले आहे. सहकाराची जननी ठरले आहे. कोल्हापुरातील सहकारी जीवनाचे यश शाहू महाराजांनी

रुजविलेल्या सहकाराच्या व समाजसमतेच्या प्रेरणेत आहे, असे म्हटले तर योग्यच होईल.

महाराजांनी १९१३ साली जहागिरदारांच्या बाबतीत मोठा क्रांतिकारक ठराव घडवून आणला. त्यांनी सर्व इनामे अविभाज्य ठरविली. त्यामुळे जहागिरदारांच्या ऐदी नि डौली वंशजांस उद्योगधंद्याकडे लक्ष द्यावे लागले. जर इनामांचे विभाजन करावयाचे नाही, तर कर्तृत्व दाखविले पाहिजे, असे जहागिरदार वंशजांना वाटू लागले. आपले मांडलिक, जहागिरदार ह्यांच्यावर त्यांनी नियंत्रण नि प्रभुत्व ठेवून त्यांना न्याय देण्याच्या बाबतीतले शेवटचे अधिकार दिले नाहीत. तरी त्या मांडलिकांनी ते अधिकार आपणांकडे राहावेत असा ब्रिटिश सरकारने कोल्हापूर दरबारावर दाब आणावा असे प्रयत्न करून पाहिले. पण ब्रिटिश सरकारने त्या बाबतीत पूर्ण तटस्थ वृत्ती धारण केली. त्यामुळेच ' फौजदारी बाबीतील माझे अधिकार काढून घेतल्यामुळे मला लाजिरवाणी स्थिती प्राप्त झाली आहे. जर महाराज, माझ्यावरचा हा काळिमा दूर करतील तर मी फार आभारी होईन, ' असे गयावया करण्याची कोल्हापूर राज्याचे एक मांडलिक इचलकरंजीकर ह्यांच्यावर पाळी आली. पुढे १९१७ साली जहागिरदारांनी महाराजांना फिरून विनंती केली. तिचा सहानुभूतीपूर्वक विचार करून इचलकरंजी व विशाळगड येथील जहागिरदारांना ते अधिकार महाराजांनी उदार मनाने परत केले.

एकोणीसशे तेरा साली महाराजांनी ' पाटील शाळा ' काढली. पाटलांच्या मुलांना त्यांच्या कारभाराचे शिक्षण देण्यासाठी ही शाळा कोल्हापूरच्या मराठा पुढाऱ्यांनी सुरू केली होती. महाराजांनी त्या संस्थेला चालना देऊन तिचे ' दिल्लीदरबार पाटील शाळा 'असे नाव ठेवले. ही शाळा पुढे अंमलात येऊ घातलेल्या ' कुलकर्णी-वतन बंदी 'ची नांदी होती. २३ फेब्रुवारी १९१८ रोजी कुलकर्णीवतने बंद होऊन तलाठी पद्धत सुरू झाली. त्यापूर्वी आणि नंतर महाराष्ट्रातील बहुतेक ब्राह्मणी वृत्त-पत्रांनी नि पुढाऱ्यांनी महाराजांवर विखारी टीका केली. महाराजांनी कुलकर्ण्यांच्या जमिनी मात्र रयतवारी पद्धतीने त्यांनाच लावून दिल्या. टिळकांनी ' केसरी ' तील २९ ऑक्टोबर १९०१ च्या लेखात म्हटले होते की, " देशपांडेपणाची व जोशी-पणाची वतने होती, ती सदर वतनदारांची सरकारास जरूर नसताही त्यांजकडे चालविण्यात आली. " मात्र कुलकर्णीवतन नष्ट केल्यावर ' केसरी ' ने आकाश पाताळ एक केले. मुंबई सरकारने कुलकर्णीवतन नष्ट करण्याचा १९५० साली कायदा

करून १ मे १९५१ पासून मुंबईप्रांतात कुलकर्णीवतन नष्ट केले.[११] ह्यावरून महाराजांच्या धोरणाची यथार्थता नि त्यांची दूरदृष्टी दिसून येते.

महाराजांनी १९१२ साली शिक्षण सक्तीचे करण्याची घोषणा केली. दरबारने वतनदारी शिक्षकयोजना रद्द करून १९१७ साली पगारी शिक्षक घेतले. सक्तीच्या शिक्षणाची पहिली शाळा महाराजांनी चिपरी पेटा येथे स्वतः उघडली. राजाराम कॉलेजला जहागिरदारांकडून मदत मिळत असे. ती मदत जहागिरदारांनी महाराजांच्या हाती अधिकार-सूत्रे येताच बंद केली. अनेक वर्षे झीज सोसून चालविलेले कॉलेज १९१८ साली बंद करण्याचा महाराजांचा विचार होता. पुढे आर्य समाजाने राजाराम कॉलेज नि हायस्कूल ह्या दोन्ही संस्था चालविण्यास घेतल्या. नंतर पुन्हा सरकारने त्या संस्था आपल्याकडे घेतल्या.

महाराजांनी १९१७ च्या जुलै महिन्यात पुनर्विवाहाचा कायदा केला. १९१८ च्या फेब्रुवारीत जातीजातीत विवाह करण्याचाही कायदा केला. हिंदू आणि जैन यांच्या निरनिराळ्या जातीत होणाऱ्या विवाहास धर्मशास्त्राची असलेली अडचण दूर केली. आंतरजातीय विवाह कायदेशीर ठरविण्यासाठी विठ्ठलभाई पटेल ह्यांनी जे विधेयक मध्यवर्ती विधिमंडळात आणले होते, त्याला महाराजांनी पाठिंबा दिला होता. टिळकांनी विरोध केला, गांधीजींनी नापसंती दर्शविली. महाराजांनी उपरोक्त कायद्यान्वये धनगर–मराठा विवाह घडवून आणले.

. ४ .

## ब्राह्मण-ब्राह्मणेतरवाद

वेदोक्त चळवळीत ब्राह्मणांचा पाडाव झाल्यावर[१२] त्यांनी महाराजांवर दाब आणण्यासाठी एक राजकीय संस्था स्थापावयाचे ठरविले. ह्यापूर्वी १९०२ मध्ये राजोपाध्यांच्या प्रकरणातून निर्माण झालेल्या वातावरणाचा फायदा घेऊन एक राजकीय संस्था काढायचा त्यांनी प्रयत्न केला होता. परंतु तो तेथेच थंड पडला. मे १९०५ मध्ये राजोपाध्यांचा अर्ज महाराज्यपालांकडून नामंजूर होताच राजकीय संस्था काढण्याचा त्यांचा तो विचार पुन्हा एकदा उसळून वर आला. तथापि, तो विचार काही मूळ धरीना.

11. Patel, Dr. G. D., *The Land Problem of Reorganized Bombay State*, State, P. 179.

१२. प्रकरण ' वेदोक्ताधिकार ' पृ. ८७ पहा.

ह्याच संधीस म्हणजे १९०५ सालच्या सप्टेंबर महिन्यात कोल्हापुरातील राष्ट्रीय वृत्तीचे पुढारी नि ब्राह्मणांचे कैवारी प्रो. विजापूरकर यांच्या बडतर्फीचे प्रकरण उपस्थित झाले. त्या दिवसांत बंगाल्यातील स्वदेशी चळवळीची लाट देशात सर्वत्र पसरत होती. स्वदेशी चळवळीने प्रभावित झालेल्या राजाराम कॉलेजच्या विद्यार्थ्यांनी परदेशी कागदावर उत्तरपत्रिका लिहिण्याचे नाकारले. ह्या बाबतीत विद्यार्थ्यांची समजूत घालण्यासाठी विजापूरकरांनी आपल्या परीने प्रयत्न केला. परंतु मुलांनी त्यांचे ऐकले नाही. कोल्हापूर दरबारला वाटले की, वेदोक्त प्रकरणात महाराजांविरुद्ध उघड-पणे प्रचार करणारे प्रो. विजापूरकर हे विद्यार्थ्यांवरील आपल्या वजनाचा उपयोग योग्य दिशेने करीत नाहीत, म्हणून त्यांना दरबारने दि. २३ सप्टेंबर १९०५ पासून नोकरीवरून बडतर्फ केले. 'ईश्वरेच्छा बलीयसी' असे म्हणून विजापूरकर पुढच्या कामास लागले. 'तुम्ही कोणतीही पुढची कामगिरी मला विचारल्याशिवाय अंगावर घेऊ नये,' अशी नामदार गोखले ह्यांनी त्यांना लंडनहून तार केली होती. आपण भारतमंत्री मोर्ले यांच्याशी कोल्हापूरप्रकरणासंबंधी काही गोष्टी केल्या आहेत, अशा आशयाचे गोखल्यांचे एक पत्र 'समर्थ' या साप्ताहिकात प्रसिद्ध करण्यात आले होते. 'तुमच्या हकीकतीला सफेती चढवू नये' असाही गोखल्यांनी विजापूर-करांना उपदेश केला होता.

आपल्या बडतर्फीनंतर विजापूरकरांनी प्रतिनिधी-सभेच्या कार्याची धुरा आपल्या खांद्यावर घेतली. ऑक्टोबर १९०६ मध्ये सभा भरली. नामदार गोखले यांनी ह्या प्रतिनिधी-सभेचे अध्यक्षपद स्वीकारावयास चक्क नकार दिला. प्रतिनिधी-सभेची ही सभा भरविण्यात स. खं. आळतेकर, दिगवडेकर आणि विजापूरकर इत्यादी मंडळींनी प्रामुख्याने भाग घेतला होता. प्रतिनिधी-सभा पुन्हा कधीच भरली नाही. त्या चळवळीचा रोख आणि रोष उघडपणे छत्रपती शाहू महाराजांवरच होता. महाराष्ट्रातील काही संस्थानांचे अधिपती ब्राह्मण होते. त्यात ब्राह्मणेतर प्रजेवर अन्याय होत होता. त्या संस्थानांत अशी चळवळ त्या काळी नव्हती. संस्थानी-चळवळ्यांची नजर फक्त कागल नि कोल्हापूर ह्यांवरच खिळलेली होती. प्रतिनिधी-सभेच्या संस्थापनेच्या अगोदर विजापूरकरांनी जूनमध्ये कोल्हापुरात 'समर्थ विद्यालय' सुरू केले होते. त्या संस्थेच्या व्यवस्थापक मंडळावर विश्वस्त म्हणून टिळकही होते. तेथे टिळक आले होते. त्यामुळे स्वदेशीची चळवळ नि पूर्वीपासून मूळ धरून असलेला 'शिवाजी क्लब' यांच्या कार्याला चांगलीच चालना मिळाली.

'शिवाजी क्लब'ची[13] स्थापना कोल्हापुरात १८९३ साली झाली होती. ती संस्था हणमंतराव कुलकर्णी ह्यांनी स्थापली. कोल्हापुरातील तरुण ह्या क्लबाकडे आकर्षिले गेले. तो क्लब राष्ट्रीय विचारांचा प्रसार करी. शिस्तसंघटना निर्माण व्हावी म्हणून काठी, बोथाटी, दांडपट्टा, कवायत इत्यादींचे तरुणांना शिक्षण देई. संस्थेच्या प्रगतीविषयी कुलकर्णी हे लोकमान्य टिळकांना माहिती कळवीत असत. पुढे टिळकांनी कुलकर्णी यांना दुसरी कामगिरी दिल्यामुळे कोल्हापूर सोडून ते टिळकांनी दिलेल्या कामगिरीसाठी नेपाळात गेले.

'शिवाजी क्लब'च्या सभासदांनी कोल्हापुरात डाके घातले. त्या प्रकरणी दामोदर हरी जोशी, प्रसादे, वामन आपटे, मणी आणि करंदीकर ह्यांना कारावास घडला. ही मंडळी सुशिक्षित आणि तडफदार होती. ते सावधानता बाळगून काम करीत. ' केसरी ' चे पुढे संपादक झालेले दा. वि. गोखले, गंगाधर नेने, गो. स. पळसुले, श्री. द. नागपूरकर, गोविंद गोखले वगैरे मंडळी त्या क्लबाची अधून मधून सूत्रे चालवीत. दामोदर हरी जोशी हा धट्टाकट्टा, साहसी, कारस्थानी नि तडफदार तरुण होता. तो एक अबोल कार्यकर्ता होता. टिळकांनी कुलकर्णी नि खाडिलकर यांच्यामार्फत नेपाळमध्ये शस्त्रास्त्रे करण्याचे जे उद्योग चालविले होते, त्यासाठी त्यांनी ह्यालाही पाठवून दिले होते. पुण्यात गोविंद पांडुरंग बापट नावाचा हुशार, धोरणी व दहशतवादी प्रवृत्तीचा विद्यार्थी होता. दामू याची बापटाशी भेट होताच बॉम्बची फॅक्टरी कोल्हापुरात काढण्याचे ठरले.

पुण्यातील कोल्हापुरचे विद्यार्थी त्यात सामील झाले. कोल्हापुरच्या गटात नागपूरकर, रामचंद्र गद्रे, पाडळकर, वडणगेकर, शेणोलीकर, अंबपकर, पाध्ये आदी मंडळी होती. गंगाधर गोखले हा कोल्हापूर नि पुणे ह्यातील दुवा होता. एकदा पुण्याच्या गटात बॉम्ब फुटला. त्यामुळे कोल्हापुरापर्यंत पोलिसांचे जाळे पसरले. दामू जोशी हा गंगाधरराव देशपांडे यांजकडे गेला होता. ही ' शिवाजी क्लब'ची मंडळी काही घातपात करणार असे शाहू छत्रपती ह्यांना १९०६ सालापासून वाटत होते. आपल्या राज्यात हा पक्ष फैलावला तर आपले राज्य धोक्यात येईल, अशी त्यांना भीती वाटत होती. त्यामुळे सरकारला तशी धोक्याची सूचनाही देऊन ठेवणे त्यांना क्रमप्राप्त होते. क्रांतिकारकांना आपल्या कार्याला कोल्हापूर

१३. भट., डॉ. विष्णू महादेव, अभिनव भारत अथवा सावरकरांची क्रांतिकारक गुप्त संस्था, पृ. २१५-२२४.

सुरक्षित का वाटे; सांगली, मिरज, इचलकरंजी इत्यादि संस्थाने सुरक्षित का वाटत नव्हती, हे सांगावयास पाहिजे असे नाही. त्यानंतर थोड्याच दिवसांनी कोल्हापुरचे कर्नल फेरिस यांना धावत्या गाडीत ठार मारण्याचा दामू हरी जोशी ह्याने प्रयत्न केला. परंतु पिस्तुल उडाले नाही. दामू जोशी पकडला गेला. तो पुढे तुरुंगातून पळाला. ह्या क्रांतिकारकांना तुरुंगात चांगल्या रीतीने वागविण्यात आले, असे त्यांच्यापैकी काही जणांनी म्हटले आहे.

महाराजांना एक तर ब्रिटिशांना दुखवावयाचे नव्हते. रानडे, गोखले इत्यादी पुढारी जसे हा पंथ निषेधीत, तसाच ते त्या पक्षाचा निषेध करीत. गंगाधरराव देशपांडे, वासुकाका जोशी, भाऊसाहेब गोखले व दा. वि. गोखले ह्यांचा ह्या गटाशी संबंध होता. ते त्यांना सल्लामसलत देत असत. बडोद्याचे सयाजीराव गायकवाड यांचे क्रांतिकारकांशी संबंध असत. म्हणून ब्रिटिश सरकार त्यांच्यावर नाराज असे. छत्रपतींवर इंग्रजांची विशेष करडी नजर होती. 'त्यांनी स्पष्ट शब्दात क्रांतिकारकांचा निषेध करून स्तब्ध बसावयाला पाहिजे होते; महाराजांनी आपण होऊन गंगाधरराव देशपांडे यांना कोल्हापुरच्या कटात अडकवून टाकण्यासाठी धडपड करावयास नको होती,[१४]' असे त्या कटाचे धागेदोरे देशपांडे ह्यांच्यापर्यंत पसरले असताही, देशभक्त देशपांडे ह्यांना वाटले. महाराजांवर संकट आले असते तर परस्पर काटा निघाला असता! त्याचे सोयरसुतक देशभक्त देशपांड्यांना नव्हते, हे खरे.

कोल्हापुरात राजकीय स्वरूपाचे गाजलेले दुसरे प्रकरण म्हणजे प्रो. विजापूरकरांचा खटला. त्यांच्या 'विश्ववृत्त' मासिकात वेदव्यासंगी पंडित सातवळेकर यांनी 'प्रार्थनांची तेजस्विता' हा लेख लिहिला आणि त्यात बॉम्ब गोळ्यावर विजापूरकरांनीही एक स्फुट लिहिले होते. २१ जानेवारी १९०९ रोजी किंकेडने त्यांना आणि त्यांचे सहकारी वामन मल्हार जोशी आणि मुद्रक विनायकराव जोशी ह्यांना जबर शिक्षा ठोठावली. 'हे देवा, आमच्या सर्व शत्रूंचा नाश करून आमचे राष्ट्र सुखी कर' ही प्रार्थनाही इंग्रजांना थरकाप करावयास लावणारी ठरावी असे ते दिवस होते. शिवाय त्या अंकात असेही म्हटले होते की, 'जो छत्रपती जगास पारतंत्र्यात टाकणाऱ्या लोकांना हाकून लावीत नाही, त्याचे छत्रपतित्व कसले?' त्या काळी जसे राष्ट्रीय चळवळीने उग्र रूप धारण केले होते,

१४. देशपांडे., गंगाधर, माझी जीवनकथा, पृ. ४३०.

तसे सरकारी दडपशाहीच्या धोरणानेही उग्र रूप धारण केले होते. अनेक देश-भक्तांना कारावास घडला होता, एवढे सांगितले म्हणजे पुरे.

छत्रपती शाहू महाराजांच्या आयुष्याचे चार कालखंड कल्पिता येतील. पहिला विद्यार्थीदशा, दुसरा राज्याभिषेक ते वेदोक्त प्रकरण, तिसरा राज्यसुधारणा आणि चवथा ब्राह्मणेतर चळवळ म्हणजे १९१७ ते १९२२ पर्यंतचा काळ. वैदिक धर्माची तत्त्वे मान्य करून समाजातील अनिष्ट परंपरा नि रूढी ह्यात काही सुधारणा करण्याचा जोपर्यंत महाराज प्रयत्न करीत होते, तोपर्यंत सत्यशोधक चळवळीकडे ते झुकले नव्हते.

स्वामी दयानंद, महात्मा फुले नि केशवचंद्र सेन यांची महती ते पुढील काळात गाऊ लागले. महात्मा फुले ह्यांच्या निधनानंतर त्यांचे विल्यात सहकारी नारायणराव लोखंडे हेही १८९७ च्या प्लेगच्या भयंकर साथीत कालवश झाले. डॉ. विश्राम रामजी घोले, डॉ. संतूजी रामजी लाड, कृष्णराव भालेकर आणि रामय्या अय्यावारु ह्यांनी जोतीरावांचे कार्य पुढे चालू ठेवण्याचे प्रयत्न केले.

कोल्हापुरात 'सत्यशोधक समाजा'ची जी ज्योत तेवत होती, ती वेदोक्त चळवळीनंतर विशेष प्रज्वलित झाली. जोतीरावांच्या तत्त्वज्ञानात जातिभेद, मूर्तिपूजा यांना स्थान नाही. देव आणि मनुष्य ह्यांमध्ये दलाल नसावा. मनुष्य जन्माने श्रेष्ठ ठरत नाही, तो आपल्या कर्माने श्रेष्ठ वा कनिष्ठ ठरत असतो. धर्म, कर्म व व्यवहार ह्यांत मनुष्य नाडला जाऊ नये म्हणून धर्मभोळेपणा व धर्मवेड जावे. मानवांचा धर्म । सत्यनीती हीच ॥ 'कोणताही धर्मग्रंथ देवनिर्मित नाही.' देवाला म. फुले निर्मीक म्हणत. त्यांना बुद्धिप्रामाण्य, समता नि मानवता ह्या तत्त्वांवर अधिष्ठित अशी समाजाची पुनर्घटना पाहिजे होती. जोतीराव म्हणतात :

धर्म राज्य भेद मानवा नसावे । सत्यानें वागावें । ईशासाठीं ॥
ख्रिस्त महंमद, मांग ब्राह्मणासी । धरावे पोटाशीं । बंधूपरी ॥
निर्मीकाचा धर्म सत्य आहे एक । भांडणे अनेक । कशासाठीं ? ॥[१५]

वर्णवर्चस्ववादी ब्राह्मण पुरोहित बोलाविल्याशिवाय धार्मिक विधी केले पाहिजेत अशी महाराजांची खात्री झाल्यावर ते साहजिकच सत्यशोधक समाजाकडे वळले. महाराज १९१० पर्यंत काहीसे तटस्थ होते. कोल्हापुरला सत्यशोधक समाजाची स्थापना ११ जानेवारी १९११ रोजी श्री. परशराम घोसरवाडकर

१५. संपादक, कीर, धनंजय व मालशे, स. गं; महात्मा फुले : समग्र वाङ्मय.

इनामदार यांच्या अध्यक्षतेखाली करण्यात आली. भास्करराव जाधव हे अध्यक्ष, अण्णासाहेब लठ्ठे हे उपाध्यक्ष, म. ग. डोंगरे हे सर्वाधिकारी आणि कार्यवाह होते हरिभाऊ लक्ष्मण चव्हाण. धनगर समाजाचे विसोजी डोणे मास्तर ह्यांना सत्य-शोधक समाजास मदत करण्यासाठी खासगीकडील नोकरी माफ करून दरबाराने दिले होते. महाराजांनी गंगावेशीत समाजाला इमारतीसाठी जागा दिली. समाजाने त्याच साली काढलेल्या 'पुरोहित शाळे'स १९१२ साली जुलै महिन्यात त्यांनी अनुदान दिले. नामदार भास्करराव जाधव ह्यांच्या देखरेखीखाली 'घरचा पुरोहित' हे सर्वप्रकारच्या पूजाअर्चा षोडष संस्कारांचे अर्थासह पुस्तक तयार करण्यात आले. त्याचप्रमाणे वास्तुशांती, पुरुषसूक्त, संध्या-श्रावणी, चालू लग्नपद्धती, श्राद्ध व दश-क्रिया ह्यांची पुस्तके श्री. हरिभाऊ चव्हाण ह्यांनी तयार केली. पुरोहित शाळेतील तरुणांनी गावोगाव धार्मिक संस्कार नि कार्य केल्यामुळे संस्थानात मोठी खळबळ उडाली.[१६]

कोल्हापुरात सत्यशोधक समाजाने ललकारी देताच महाराष्ट्रातील सत्य-शोधक समाजनेते रामय्या व्यंकय्या अय्यावारु व डॉ. संतूजी रामजी लाड हे पुन्हा उत्साहाने कार्यास लागले. पुणे येथे १७एप्रिल १९११ रोजी सत्यशोधक समाजाची पहिली मोठी परिषद रामय्या अय्यावारु ह्यांच्या अध्यक्षतेखाली भरली. म. फुले ह्यांच्या निधनानंतर भरलेली अशी सत्यशोधकांची ती पहिली परिषद. दुसरी परिषद नाशिक येथे एप्रिल १९१२ मध्ये डॉ. संतूजी लाड यांच्या अध्यक्षते-खाली भरली. १९१३ साली ठाणे येथे एक परिषद भरली. १९१३ साली कोल्हा-पुरातील 'पुरोहित शाळेत' तयार झालेल्या ब्राह्मणेतर पुरोहितांकडून ५१६३ धार्मिक कार्ये करण्यात आली. एकट्या राजधानीत १५१३ धार्मिक समारंभ झाले. त्यांपैकी २२६ विवाह समारंभ होते. भटांत खळबळ उडाली. हरिभाऊ चव्हाण हे एक लढाऊ व तेजस्वी कार्यकर्ते होते. डोणे, हरिभाऊ आणि श्रीपतराव चव्हाण ह्यांनी कर्ज काढून १९१४ साली समाजाची इमारत बांधली. आपला पगार कर्जा-पोटी भरला. नंतर भाड्यातून आपले पैसे फेडून घेतले. समाजाने १९१५ साल-पासून सहभोजने सुरू केली. खळबळ उडाली. ब्राह्मणांबरोबर त्यांची अनेक प्रकरणे उत्पन्न झाली. १९१६ साली निपाणीस सत्यशोधकांची परिषद होऊन सर्व महाराष्ट्र

१६. संपादक, वागल, माधव खंडेराव, सत्यशोधक हीरक महोत्सव ग्रंथ, पृ. १-५. [ सत्यशोधक समाजाच्या शाखांची माहिती ]

सत्यशोधक समाजाचे मुख्य उपदेशक म्हणून वालचंद रामचंद्र कोठारी यांना नेमण्यात आले.

. ५ .

तथापि महाराजांच्या आयुष्यातील एक अत्यंत महत्त्वाची घटना म्हणजे त्यांनी १९१८ सालच्या नोव्हेंबरात मुंबई येथे कामगारांना केलेला उपदेश होय. लोकहितवादी सीताराम केशव बोले यांनी मुंबईत People's Union अथवा 'लोकसंघ' नावाची संस्था १९१८ साली स्थापन केली होती. शाहू महाराज ह्या संस्थेचे आश्रयदाते होते. "विद्येत मागासलेल्या बहुजन समाजाची राजकीय, धार्मिक, नैतिक, औद्योगिक, आरोग्यविषयक, शिक्षणविषयक, शेतकीविषयक वगैरे सर्व बाबतीत समतेच्या पायावर उन्नती करण्याचा प्रयत्न करणे" हे त्या लोकसंघाचे उद्दिष्ट होते.

बोले हे लोखंड्यांनंतरचे मुंबईचे थोर कामगार पुढारी. त्यांच्या लोकसंघाच्या विद्यमाने भरलेल्या एका कामगार सभेत २४ नोव्हेंबर १९१८ रोजी बोलताना महाराज म्हणाले : "पाश्चात्य देशांत भांडवलवाले व मजूर ह्या पक्षांचे भांडण चालले आहे, असे मी पूर्वीच तुम्हास सांगितले आहे. मजूर पक्षाच्या हाती राज्यकारभार बहुतांशी जाणे असा परिणाम या युद्धाचा झाला आहे. रशिया व जर्मनी ही निरंकुश राजसत्तेची दोन मोठी पीठे होती. त्या ठिकाणी आता मजूरपक्षाच्या नेतृत्वाखाली प्रजासत्ताक राज्ये स्थापन होत आहेत. इंग्लंडातही मजूर पक्षाचा जोर जास्त वाढत आहे. हॉलंड वगैरे तटस्थ राष्ट्रांवरही या लाटेचा परिणाम झाल्याशिवाय राहात नाही. वयात आलेल्या प्रत्येक माणसास मत देण्याचा अधिकार मिळाला पाहिजे, म्हणजे बहुजन समाजाच्या मताप्रमाणे कारभार चालला पाहिजे. येथेही इंग्लंडप्रमाणे मजुरांचे संघ झाले पाहिजेत व सर्वांस आपले हक्क काय आहेत हे कळले पाहिजे. भांडवलवाल्यांत ब्राह्मण व वैश्य वृत्तीच्या लोकांचा भरणा विशेष आहे. त्यांना दाबात ठेवल्याशिवाय मजुरांची उन्नती होणे कठीण आहे."[१७]

कामगारांना मजूरसंघ काढा असे सांगणारा हा राजा! युरोपमध्ये मजूर पक्षांच्या नेतृत्वाखाली प्रजासत्ताके स्थापन होत आहेत, तरी त्यांनी मजूर-संघ काढून आपली शक्ती वाढवावी असे मार्गदर्शन करणारा राजपुरुष! ब्रिटिश राजवटीतील हिंदी संस्थानिक याहून आणखी स्पष्ट किती बोलणार? कामगारांचे हाती

१७. श्रीमन्महाराज शाहू छत्रपति सरकार करवीर यांचीं भाषणें, १९२०, पृ.३४-३६.

राजसत्ता यावी, व त्यासंबंधी तसे स्वप्न पहाणारा राजा त्याकाळी तर दुर्मिळच; पण नेताही दुर्मिळ होता. श्री. अ. डांगे व पं. जवाहरलाल नेहरू यांचे रशियन क्रांतीकडे लक्ष जाण्यास अजून अवकाश होता. कामगारांचे हक्क मिळवून देणे हे म. जोतीराव नि लोखंडे यांचे कार्य शाहू महाराजांनी पुढे चालविले व त्यांच्या-बरोबर आपले नाव अजरामर केले हेच खरे.

पहिल्या महायुद्धाच्या उत्तरार्धात हिंदी राजकीय सुधारणेच्या प्रश्नासंबंधी चर्चा होऊ लागली. त्यामुळे देशातील सर्व संघटनांचे प्रतिनिधी त्यासंबंधी चर्चा करू लागले. छत्रपती शाहू हे येणारी ही सत्ता बहुजन समाजाच्या उत्कर्षासाठी कशी वापरता येईल याविषयी विचार करू लागले. सत्यशोधक समाजाच्या चळवळीला त्यांनी चालना दिली होती. त्यांच्या आता परिषदा भरू लागल्या होत्या, कार्य होऊ लागले होते, तरी ते त्यांच्या आहारी गेले नव्हते. "जरी सत्यशोधक समाज आदी समाजांनी काहीशी सुधारणा केली, तरी ह्या संस्थांकडून विशेष अधिक काही होऊ शकणार नाही; कारण या 'शठं प्रति शाठ्यं' या तत्त्वावर चालत आहेत."[१८] असे त्यांनी एका परिषदेत उद्गार काढले. त्याचे कारण काय असावे? कदाचित सत्यशोधक समाजाच्या जलशांतून व तमाशांतून जो ब्राह्मणांविषयी दाहक द्वेष किंवा अश्लील उल्लेख दिसून येई, त्यांमुळे त्यांच्या मनाला उद्वेग आला असावा आणि शेवटी 'आपण सत्यशोधक पक्षात नव्हतो आणि त्या चळवळीशी कोणताही संबंध ठेवण्याचे नाकारले आहे'[१९] असे छत्रपतींनी जाहीर पत्रक काढले होते आणि मद्रासकडील 'जस्टिस पार्टी'च्या अशाच ब्राह्मणविद्वेषी धोरणामुळे त्यांनी त्या पक्षापासून चार हात दूर राहण्याचे ठरविले होते.[२०]

छत्रपतींकडे त्यांच्या अंतकालापर्यंत बरेच अधिकारी ब्राह्मण होते. चांगल्या ब्राह्मणांचा त्यांनी कधीच द्वेष केला नाही. ब्राह्मणजातीचा असा प्रत्यक्षपणे वा अप्रत्यक्षपणे त्यांनी कधीच द्वेष केला नाही, हे सांगावयास नकोच. ह्या बाबतीत ब्राह्मणेतर चळवळीस पाठिंबा देणाऱ्या राजारामशास्त्री भागवतांनीही सत्यशोधकांच्या ब्रह्मद्वेषावर उत्तर देताना म्हटले होते की, 'महाराष्ट्रातील दरोबस्त ब्राह्मण जातीवर

१८. श्रीमन्महाराज शाहू छत्रपति सरकार करवीर यांचीं भाषणें, पृ. ७५.
१९. ठाकरे, प्रबोधनकार के. सी., शेतकऱ्यांचें स्वराज्य, पृ. ७९.
२०. तोफखाने, वा. द., राजर्षि श्रीशाहू छत्रपति यांचें अंतरंग, पृ. ५०-५१.

कृपा करून उतरू नये. तसे केले तर त्यांच्या पूर्वजांवर न आलेला कृतघ्नपणाचा मोठा आरोप त्यांच्यावर येईल. '[२१]

महाराज हे बहुजनसमाजाच्या सर्वांगीण उन्नतीसाठी झटत होते. विद्येमुळे नि उद्योगामुळे त्यांची त्यांना प्रगती साधावयाची होती. सामाजिक क्रांती झाल्याविना स्वराज्याचे फायदे कनिष्ठ समाजाला मिळावयाचे नाहीत, असे त्यांचे मत होते. ते परिषदांतील आपल्या भाषणांतून जाहीरपणे सांगत की, "स्वराज्य आम्हांस पाहिजे आहेच. त्या योगानेच आमच्यात चैतन्य उत्पन्न होईल....परंतु जोपर्यंत आमच्यामध्ये जातीजातीतील मतभेद आणि मत्सर जिवंत आहेत, तोपर्यंत आम्ही आपआपसात झगडत राहणार, आणि आमच्या हितबुद्धीस अपाय करून घेणार. आमच्यातील अंतस्थ कलह नाहीसे करण्यास आणि आम्हांला स्वराज्यास पात्र करून घेण्याकरिता ही अनर्थकारक जातिपद्धती झुगारून देणे आम्हास अत्यंत अवश्य आहे."

महाराज पुढे म्हणाले : "सुधारणेच्या सर्व चळवळींत पुढाकार घेणे हे उच्च वर्णाचे कर्तव्यकर्म आहे. जपान देशातील सामुराई जातीने, म्हणजे त्या राष्ट्रातील क्षत्रियवर्णाने, त्यांच्यातील जातिनिर्बंध मोडून टाकण्याच्या बाबतीत पुढाकार घेतला... जर हल्लीची जातिव्यवस्थाच कायम राहिली, तर ज्या रीतीने हल्ली स्वराज्याचा अर्थ समजला जातो, ते स्वराज्य म्हणजे मूठभर लोकांच्या हाती सत्ता जाणे, हे होय. याचा अर्थ, मी स्वराज्याच्या चळवळीच्या विरुद्ध आहे, असे समजावयाचा नाही, हे पुनः मी एकवार सांगतो. आम्हांला स्वराज्य पाहिजेच...केवळ अल्प सत्ता उच्च वर्गीयांच्या हातातच जाण्यात स्वराज्याचे पर्यवसान होऊ नये, म्हणून निदान दहा वर्षेपर्यंत तरी आम्हाला जातवार प्रतिनिधी निवडून देण्याचा हक्क असला पाहिजे"[२२]

अस्पृश्यता-निर्मूलनाच्या प्रश्नासंबंधी बोलताना १५ एप्रिल १९२० रोजी माणगाव येथील परिषदेत महाराज म्हणाले की, ''अस्पृश्यांना तुम्ही बेशरम नि बेअब्रू केल्यामुळे त्यांची वृत्ती गुन्ह्याकडे होते. कित्येक लोक म्हणतात, राजकारणाचा नि अस्पृश्यतेचा काय संबंध आहे ? पण मी म्हणतो, अस्पृश्यांना मनुष्याप्रमाणे

२१.. संपादिका, भागवत, दुर्गा, कै. राजारामशास्त्री भागवत यांचे निवडक लेख, पृ. ७४.

२२. श्रीमन्महाराज शाहू छत्रपति सरकार करवीर यांचीं भाषणें, पृ. ४,५,९,१०.

वागविल्याशिवाय राजकारण कसे होणार ? ज्यांना राजकारण करणे आहे त्यांनी मनुष्याला मनुष्याप्रमाणे म्हणजे इतर देशांत वागवितात त्याप्रमाणे वागविले पाहिजे. आणि तसे वागविल्याशिवाय देशकार्य कसे होणार ? तोंडाने बडबडणारे पुढारी आम्हास नको आहेत. कृतीने जातिभेद मोडून आम्हांस मनुष्याप्रमाणे वागवतील असे पाहिजेत." [२३]

त्याच परिषदेत महाराजांनी अस्पृश्य समाजाला सांगितले की, "तुमचे खरे पुढारी डॉ. आंबेडकर आहेत. माझी खात्री आहे की ते तुमचा उद्धार केल्याशिवाय राहणार नाहीत. इतकेच नव्हे तर ते सर्व हिंदुस्थानचे पुढारी होतील असे माझी मनोदेवता मला सांगत आहे." [२४]

नाशिक येथे १५ एप्रिल १९२० रोजी श्री. उदोजी मराठा विद्या वसतिगृहाच्या कोनशिला समारंभाच्या वेळी महाराजांनी उपदेश केला की, "सर्व जातींच्या मुलांस वसतिगृहाचे प्रवेशद्वार खुले ठेवण्यात चालकांनी आपल्या मनाचा थोरपणा व उज्ज्वल देशभक्ती दाखविली आहे....आजही जातिपरिषदात अध्यक्ष होणे मला पसंत नाही. पण याचे कारण मात्र पूर्वीच्या कारणाहून फार भिन्न आहे. तेव्हा मी जात्यभिमान सोडतो हे वाईट आहे असे मला वाटे. मी जातिपरिषदांस उत्तेजन दिले तर जातिभेद तीव्र केल्याचे पाप माझ्या डोक्यावर येईल अशी मला आज भीती वाटते... जातिभेद पाळणे हे पाप आहे. देशोन्नतीच्या मार्गात हा अडथळा आहे. हा दूर करण्याचे प्रयत्न जोराने केले पाहिजेत." [२५]

ते पुढे म्हणाले : "जातिभेद असू द्या पण जातिद्वेष मात्र नको असे म्हणणारे पुष्कळ आहेत. हे मत प्रामाणिकपणाचे असल्यास त्यांच्या अज्ञानाची कीव केली पाहिजे. कारण जातिभेदाचे कार्य जातिद्वेष आहे. तेव्हा कार्य नाहीसे करायचे तर कारणही काढून टाकले पाहिजे...या जातिद्वेषाची उचलबांगडी करावयाची असेल, तर जातिभेदच मोडला पाहिजे. जातिभेद मोडून आपण सर्व एक होऊ या...मागे पडलेल्यांना मी सारखे म्हणजे एक जातीचे समजतो व त्यांना वर आणण्याचा प्रयत्न करतो. हे माझे पवित्र कर्तव्य आहे, असे मी समजतो. असे मी न करीन तर मी कर्तव्यविन्मुख झालो असे माझे मन मला टोचील.

२३. श्रीमन्महाराज शाहू छत्रपति सरकार करवीर यांचीं भाषणें, पृ. ८६–८७.
२४. जनता खास अंक १९३३, पृ. ४६.
२५. श्रीमन्महाराज शाहू छत्रपति सरकार करवीर यांचीं भाषणें, पृ. ९०–९१.

ह्या मागासलेल्या जातीला वर आणण्याचे प्रयत्न झाले नाहीत, तर जातिभेदाचे कट्टे अभिमानी वीर तिला दडपून टाकल्याशिवाय राहणार नाहीत. त्यासाठी मागासलेल्यांचा कैवार घेणे हे जातिद्वेष वाढविणे नव्हे, हे उघड आहे...जातिभेद मोडून केवळ जन्माच्या सबबीवर दुसऱ्यास हीन मानण्याची प्रवृत्ती नाहीशी होईल व अशा रीतीने जातिद्वेषाचा नायनाट होईल तो सुदिन, असे मी समजेन."[२६]

ब्राह्मणांची जन्मसिद्ध धार्मिक 'ब्युरॉक्रसी' मोडून काढा असाही त्यांनी त्या परिषदेस उपदेश केला.

नाशिकच्या दुसऱ्या एका सभेत ते दुसऱ्या दिवशी म्हणाले, "प्राथमिक शिक्षण सक्तीचे करण्याच्या अगोदर सध्या उपयोगात असलेली शाळागृहे विस्तृत व हवेशीर केली पाहिजेत; तिकडे खर्च करण्याची जरूरी आहे, हे 'केसरी' चे प्रतिपादन कोणाही सरळ बुद्धीच्या माणसास चीड आणील. "No cake to a few until all are served with bread" हे इंग्लंडातील मजूर पक्षाचे धोरण आहे. पण येथे शे. ९० लोक उपाशी आहेत व दहा लोक पोळी खात आहेत. उपाशी लोकांना कोंड्याच्या भाकरीची सोय करण्याअगोदर या दहांच्या पोळीवर साजूक तूप वाढा असा ओरडा करणाऱ्यांना रयतेची कळकळ कितपत आहे हे उघड आहे."[२७]

"माझ्या प्रजेची योग्यता वाढवून त्यांच्या हाती सर्व कारभार सोपवून माझ्या खर्चापुरती एक ठरीव रकम पेन्शनदाखल घेऊन मी केव्हा मोकळा होईन, असे मला झाले आहे...आधी राजकीय की आधी सामाजिक सुधारणा हा वाद समंजसपणाचा नाही. ह्या सुधारणा स्वतंत्र नाहीत. एकात एक गुंतलेल्या आहेत."[२८] "अनेक ब्राह्मण माझ्या पूर्ण विश्वासाचे अंमलदार व सल्लागार आहेत; अनेक ब्राह्मणांना मी इनामे दिली आहेत"[२९] असेही ते दुसऱ्या दिवशी निराश्रित सोमवंशीय समाजाच्या सभेत म्हणाले.

३० मे १९२० रोजी नागपूर येथील 'बहिष्कृत समाज परिषदे' च्या अध्यक्षपदावरून ते म्हणाले: "दया धरमका मूल है, नरक मूल अभिमान. यावरून

२६. श्रीमन्महाराज शाहू छत्रपति सरकार करवीर यांचीं भाषणें, पृ. ९२–९४.

२७. कित्ता पृ. १०४.

२८. कित्ता पृ. १०७-०८.

२९. कित्ता पृ. ११९.

पहाता देशाची म्हणजे देशबंधूंची सेवा करणे, जनी जनार्दन शोधणे व पाहणे, हाच खरा धर्म आहे. या बाबतीत सर्व धर्मांचे ऐक्य आहे. परोपकार हा पुण्य मार्ग आहे व परपीडा हे पाप आहे, असेच सर्व प्रतिपादन करितात....व्यक्तीच्या दृष्टीने धर्माची बाब महत्त्वाची असेल; पण राष्ट्रीय बाबतीत ती केव्हाही आड येता कामा नये. यापुरती धर्म ही बाब फारच कमी महत्त्वाची आहे, असे मला वाटते. ' धर्म ' शब्दाची थोडक्यात व्याख्या--' देवाजवळ जाण्याचा मार्ग ' अशी करता येईल.... भिन्नभिन्न जातींचे शरीरसंबंध विस्तृत प्रमाणावर होणे फार जरूर आहे. "[३०] " ज्या सनदा मी महार-मांग-चांभार इत्यादी लोकांना दिल्या, त्याच जर ब्राह्मण, कायस्थ, सारस्वत अशा लोकांना दिल्या असत्या तर त्याबद्दल काही गवगवा झाला नसता, व तशा दिल्या त्या वेळी झालाही नाही....मॅट्रिक पास झालेले अगर इंग्रजी चांगले शिकलेले महार, मांग यांस वरिष्ठ दर्जांच्या धंद्यांत आणताच ब्राह्मणी समाज खवळून गेला. "[३१]

अशी खळबळ उडविणारी भाषणे त्यांनी महाराष्ट्रात केली. त्यांची विचारसरणी जशी तात्त्विक आहे, स्फोटक आहे, तशीच ती व्यवहारी नि नैतिक आहे, हे विसरता कामा नये.

छत्रपतींचा काही दिवस आर्यसमाजाकडे कल झुकला होता, असे दिसते; कारण त्यांनी त्यांच्या परिषदांचे महाराष्ट्राबाहेरही दोन तीन वेळा अध्यक्षपद भूषविले. आर्यसमाजाचा वेदांवर निष्ठा ठेवणारा वैदिकधर्म, वेदोक्त संस्कार नि वेदोक्त कर्म यांचा प्रसार व्हावा अशी छत्रपतींची इच्छा होती. जातिभेदाचा मोड झाला पाहिजे, अस्पृश्यतेचा नायनाट झाला पाहिजे हेही आर्यसमाजाप्रमाणे त्यांना वाटे. मात्र महाराजांना मूर्तिपूजा सोडवेना. तथापि शेवटी शेवटी त्यांची मते देवाच्या बाबतीत निरीश्वरवादाकडे वळू लागली होती, असे दिसते. जातिभेदाचे निर्मूलन व सामाजिक समतेवरील भर आणि अस्पृश्यतेचे निर्मूलन ही सत्यशोधकांची तत्त्वे त्यांना मान्य होती.

महाराजांनी सत्यशोधक नि आर्यसमाज ह्या दोन्ही चळवळींचा फायदा घेऊन सामाजिक समतेची प्रस्थापना, अस्पृश्यतेचे निर्दालण आणि कनिष्ठ जातींची उन्नती साधण्यासाठी महान प्रयत्न केले. महाराजांच्या काळी धनगर,

३०. श्रीमन्महाराज शाहू छत्रपति सरकार करवीर यांचीं भाषणें, पृ. ९२-९४.
३१. किता, पृ. १२३–१३६.

जैन, मराठे, महार, मांग, शिंपी, सोनार असे विविधवर्गीय नेते त्या चळवळीत होते. अस्पृश्यता-निवारणावरील भर महाराजांनंतर कमी झाला हे खरे. परंतु त्याला छत्रपतींना जबाबदार धरता येणार नाही.

२० ऑगस्ट १९१७ रोजी भारतमंत्री मॉन्टेग्यू ह्यांनी हिंदी राजकीय सुधारणांविषयी घोषणा करताच भारतातील सर्व पक्षांचे नि संस्थांचे नेते आपापल्या योजना त्यांच्यापुढे मांडण्याच्या हेतूने तयारीस लागले. ह्यापूर्वी काही दिवस महाराष्ट्रात ब्राह्मणेतर मंडळींनी राजकीय हक्कांसाठी चळवळ करण्यास आरंभ केला होता. त्यांनी निपाणी येथे सत्यशोधक समाजाच्या परिषदेच्या वेळी १९१६ साली ' डेक्कन रयत असोशिएशन ' नावाची राजकीय संस्था घोसरवाडकर देसाई ह्यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन केली. अशा रीतीने सत्यशोधक चळवळीचे रूपांतर ब्राह्मणेतर चळवळीत झाले ह्याचीच ती घंटा होती.

ब्राह्मणेतर नेत्यांनी स्वतंत्र मतदार संघाची मागणी केली होती. काहींनी फक्त राखीव जागांची मागणी केली होती. स्वतंत्र मतदारसंघ असावे की राखीव जागा असाव्यात आणि ' लिबरल पक्षा 'शी सहकार्य करावयाचे की नाही ह्या बाबतीत ब्राह्मणेतर पक्षात दोन तट पडले होते. श्रीपतराव शिंदे यांचे ' विजयी मराठा ' व वालचंद कोठारी यांचे ' जागरुक ' ही प्रमुख ब्राह्मणेतर पत्रे आपसात वितंडवाद करीत होती. त्यांच्यामधील तंटे मिटविण्याचा महाराज प्रयत्न करीत होते. ब्राह्मणेतर पुढाऱ्यांतीलही मतभेद मिटविण्याचा प्रयत्न करीत होते. महाराजांच्या मनात मध्यवर्ती विधिमंडळात निवडून जाण्याची इच्छा होती. परंतु कायद्याप्रमाणे त्यांना ही गोष्ट करता येत नव्हती.

गरिबांच्या नि दलितांच्या उद्धाराचे कंकण छत्रपतींनी हाती बांधले होते. ते छत्रपती असूनही जरी त्यांना लोकनायकाचे स्थान प्राप्त झाले होते, तरी ब्रिटिश प्रांतात स्वैर संचार करून त्यांना ब्राह्मणेतर संघटनेचे राजकीय कार्य उघडपणे करता आले नसते. कारण, त्यांच्या सामाजिक चळवळीचे जे विरोधक होते, त्यांच्या चिथावणीमुळे म्हणा किंवा छत्रपती असलेली व्यक्ती लोकनेता झाल्याने उद्‌भवणाऱ्या धोक्यामुळे म्हणा, मुंबई सरकारने त्यांना एक खलिता पाठवून दमदाटी दिली होती की, ' महाराजांनी आपल्या संस्थानाबाहेरच्या हद्दीत कोणतीही चळवळ करू नये. '

त्यावर महाराजांनी बाणेदारपणाने सरकारला उत्तर दिले होते की, " तुम्ही मला पदच्युत करण्यापूर्वी मी राजीनामा देईन. पण बहुजनसमाजाच्या उद्धाराचे

माझे पवित्र कार्य मी प्राण जाईतोवर सोडणार नाही." परंतु महाराष्ट्राच्या दुर्दैवाने त्यांच्या वयाच्या अवघ्या अठ्ठेचाळीसाव्या वर्षी त्यांचा ६ मे १९२२ रोजी मुंबई येथे अकाली नि आकस्मिक अंत झाला. त्यांना आणखी काही वर्षे आयुष्य लाभले असते, तर ब्राह्मणेतर नेत्यांची एकजूट करून त्यांच्या हातून सामान्य जनतेचे हित साधण्याचा त्यांनी निश्चितपणे अखंड प्रयत्न चालू ठेविला असता. आणि तसे झाले असते तर ब्राह्मणेतर चळवळीचा फायदा जमीनदार नि सावकार ह्यांना घेता आला नसता.

ह्या सर्व गोष्टींवरून महाराजांची वैशिष्ट्यपूर्ण थोरवी दिसून येते. जनतेच्या हितासाठी खरा राज्यकर्ता सत्ता कशी राबवतो, त्याचा हा एक उत्तम आदर्श आहे. महाराजांच्या समकालीन संस्थानी राज्यकर्त्यांत दलितांना गुलामगिरीतून मुक्त करणारा, त्यांना त्यांचे मानवी हक्क देणारा, मानवाच्या भौतिक सुधारणेसाठी झटणारा, सामान्यांच्या हिताशी नि जीवनाशीही असा समरस होणारा त्यांच्या कालखंडात क्वचित एखादा दुसरा राज्यकर्ता झाला असेल. वास्तव छत्रपती शाहू महाराज हे महाराष्ट्रातील छत्रपती शिवाजी महाराजांनंतरचे पहिले नि शेवटचे लोकाभिमुख, प्रजाहितदक्ष नि लोकोद्धारक नृपती झाले, असेच त्यांचे वर्णन इतिहास करील.

* * *

# वेदोक्ताधिकार

. १ .

' वेदोक्त ' या शब्दाचा अर्थ वेदांनी सांगितल्याप्रमाणे असा आहे. परंतु त्याचा प्रचारात आलेला अर्थ वैदिक मंत्रांनी कुटुंबातील षोडष संस्कारादी धर्मकृत्ये करणे असा झाला आहे. फार प्राचीन काळापासून ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांना द्विज मानण्यात येत असे. त्यांनाच वैदिक मंत्रांनी धर्मकृत्ये करण्याचा अधिकार आहे, असा समज रूढ झाला. सामाजिक दृष्ट्या वेदोक्त पद्धती ही श्रेष्ठ मानण्यात येत असे.

प्राध्यापक ऱ्हीस डेव्हिस यांचे म्हणणे असे होते की, पहिले तीन वर्ण हे मूळचे एकच होत. वेदांच्या सूत्रात जातिभेद, ब्राह्मणांची अन्यायी आत्मप्रौढी व शूद्रांची अवनत स्थिती इत्यादी गोष्टींबद्दल मुळीच आधार सापडत नाही, असे मॅक्स मुल्लर म्हणतात. ब्राह्मणांच्या जातिभेदाच्या सिद्धांताचा पहिला खुलासा पुरुषसूक्तात सापडतो. वेदांचे अध्ययन अमुक लोकांनी करावे व अमुक लोकांनी करू नये असे वेदात कोठेही सांगितलेले नाही. अशी वचने फक्त स्मृती व पुराणे यात आहेत. स्मृति व पुराणे यांची असली अरेरावी श्रुतीवर म्हणजे वेदांवर चालू द्यावी हे धन्यावर चाकराची अरेरावी चालू देण्यासारखे हास्यास्पद आहे, असे स्वामी विवेकानंद यांचे म्हणणे आहे.[1]

वेदकालीन हिंदुसमाजामध्ये ज्या आर्यांनी भरतखंड पादाक्रांत केले, त्यांच्या वंशजांनी अग्रस्थान पटकाविले होते. त्यांच्या खालोखाल याज्ञिकांचे वंशज असलेल्या ब्राह्मणांचा दर्जा होता, असे ऱ्हीस डेव्हिस यांचे मत आहे. परंतु क्षत्रिय व ब्राह्मण यांच्यामधील हा लढा पुढे पेटत गेला. क्षत्रियांचा प्रभाव युद्धात कमी करणे अशक्य

१. संपादक, मुंडले, वासुदेव दामोदर, ' ब्राह्मण–अब्राह्मण–बोध ' ह्या ग्रंथात शंकर दत्तात्रेय जावडेकर यांचा लेख, पृ. २८.

असल्यामुळे त्यांनी क्षत्रियांचे वैदिक कर्म हिरावून घेऊन त्यांना नीचतर अवस्थेस पोचविण्यास आरंभ केला. वैदिक धर्माप्रमाणे ब्राह्मणांस अध्ययन, यजन, दान, अध्यापन, याजन व प्रतिग्रह ह्या सर्व कर्मांचा अधिकार असून क्षत्रियांना मात्र पहिल्या तीन कर्मांचाच अधिकार होता. यास्तव क्षत्रियांचे सर्व संस्कार ब्राह्मण उपाध्यायांच्या हातून व्हावे लागत. ते क्षत्रिय वा वैश्यांच्या हातून होऊ शकत नसत. अर्थात ब्राह्मणांना क्षत्रियांची गृहकृत्ये वाटेल तेव्हा बंद पाडता येत. ह्याचा परिणाम असा झाला की, ज्या क्षत्रियांनी ब्राह्मण प्रभुत्वास मान तुकविली नाही, त्यांची मुंज करण्याचे नाकारून त्यांना ब्राह्मणांनी नवीन अशा शूद्र वर्णास पोचविले असे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी 'शूद्र कोण होते?' ह्या ग्रंथात म्हटले आहे.[२]

नंदांचा निःपात करून ब्राह्मण राजकारणपटू चाणक्य तथा विष्णुगुप्त ह्याने मौर्य घराण्याची स्थापना करून आपले प्रभुत्व स्थापले. चंद्रगुप्त मौर्य हा नंदराजाचा दासीपुत्र असल्यामुळे 'नंदांत क्षत्रियकुलम्' नंदानंतर क्षत्रिय नाहीत ही उन्मत्त घोषणा करून ब्राह्मण स्वस्थ बसले नाहीत; त्यांनी दुसरी घोषणा केली की, कला-वाद्यंतयोः स्थितिः ।[3] कलियुगात फक्त ब्राह्मण आणि शूद्र हे दोनच वर्ण. मोगल-कालखंडातील कृष्ण नृसिंह शेष ह्याने 'शूद्राचार शिरोमणि'[४] हा ग्रंथ लिहून हाच पक्ष उचलून धरला. 'शूद्राचार शिरोमणि' सारखे काही ग्रंथ लिहून ब्राह्मणांनी वरील दुष्ट तर्कास दुजोरा दिला. तथापि रजपूत राजांच्या घराण्यात धर्मसंस्कार वेदोक्त पद्धतीनेच होत. शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकाच्या वेळी वेदोक्ताचा प्रश्न उद्‌भवला. महाराष्ट्रातील कृतघ्न ब्राह्मणांना गागाभट्टाने निरुत्तर केले. पुढे छत्रपती थोरले शाहू महाराज ह्यांनी अष्टप्रधानमंडळ मोडून ब्राह्मण पेशव्यास पेशवेपद वंशपरंपरेने बहाल केल्यामुळे आणि पेशव्यास सातारा राजधानीत

---

२. Ambedkar, Dr. B. R., *Whe Were The Shudras*,p. 177.

३. कमलाकर भट्टाने आपल्या 'शूद्रकमलाकर' ह्या ग्रंथात ही घोषणा केली आहे. परंतु त्याने 'क्षत्रिया वैश्याश्च संत्येव' म्हणजे 'क्षत्रिय व वैश्य आहेत' असेही त्याच ग्रंथात म्हटले आहे. बिर्जे, वासुदेवराव लिंगोजी, क्षत्रिय आणि त्यांचें अस्तित्व, [१९०३] पृ. १७८.

'परशुरामाने निःक्षत्रिय पृथ्वी केली,' 'सुंदोपसुदांनी निर्ब्राह्मण पृथ्वी केली,' 'कला-वाद्यंतयोः स्थितिः' आणि 'नंदांतं क्षत्रियकुलम्' ह्या चार वचनांपैकी पहिली दोन अतिरंजित असून, शेवटची दोन अवास्तव आहेत.

४. सरदेसाई, गो. स., मराठी रियासत, शककर्ता शिवाजी, पृ. १५८.

राहण्यास भाग न पाडता त्याला पुण्यास राहू दिल्यामुळे, पेशवाईत म्हणजे ब्राह्मणी[५] राज्यात ब्राह्मणांनी वेदोक्त प्रकरणे गाजवून ब्राह्मणेतरांचा धार्मिक व सामाजिक छळ केला. नाना फडणविसाने तर कारस्थान करून साताऱ्च्या दुसऱ्या शाहूची मुंज पुराणोक्त पद्धतीने करवून घेतली.

साताऱ्च्या प्रतापसिंहाने १८३२ साली नामांकित पंडित बोलावून वेदोक्ताच्या प्रश्नाचा निकाल लावला. क्षत्रियांची बाजू विठ्ठल सखाराम तथा आबा पारसनीस ह्या विद्वान पंडितांनी मांडली. ब्राह्मणांची बाजू वे. शा. राघवाचार्य गजेंद्रगडकर ह्यांनी मांडली. साताऱ्यातील संस्कृत पाठशाळेत हा वाद झाला. ज्या दिवशी वादाचा निर्णय होणार, त्या दिवशी पुण्यापासून बेळगावपर्यंतच्या भागातील शेकडो ब्राह्मण साताऱ्यास निकाल ऐकण्याकरिता पाठशाळेपुढे जमले होते. दंगल होऊ नये म्हणून महाराज स्वतः नागव्या तलवारीने पाठशाळेपुढे बंदोबस्त करीत होते. त्यावेळी सांगलीच्या पटवर्धनांनी ब्राह्मणांचे नेतृत्व केले. वादात ब्राह्मणांचा पराभव झाला. क्षत्रियांचे अस्तित्व सिद्ध नि मान्य झाले.[६]

वेदोक्ताच्या प्रश्नाने पुन्हा १८९६ साली बडोद्यात डोके वर काढले. बडोद्याच्या राजघराण्यातील धर्मकृत्ये पुराणोक्त पद्धतीने होत असत. बडोद्याचे महाराज युरोपचा प्रवास करून आल्यावर त्यांनी प्रायश्चित्तही घेतले होते. बडोद्यात म. फुले ह्यांचे अनुयायी रामचंद्रपंत धामणस्कर, रामजी संतूजी आवटे इत्यादी सत्यशोधक नेते चळवळ करीत होते. दामोदरपंत यंदे यांचे ' बडोदा वत्सल ' १८८५ साल्पासून सत्यशोधक मताचा प्रचार करीत होते. आवटे नि धामणस्कर ह्यांच्या खटपटीने बडोद्यात मराठा जातीचे पुरोहित तयार करण्यासाठी एक वर्गही उघडण्यात आला होता. अशा परिस्थितीत एके दिवशी जोधपूरचे शिवदत्त जोशी ह्यांनी सयाजीरावांना विचारले की, ' रजपूत घराण्यात वेदोक्त पद्धतीने धर्मकार्य होतात अशी महाराजांकडे का होत नाहीत ?' याबाबतीत विचार होऊन बडोद्याचे राजोपाध्ये राजारामशास्त्री

५. पेशवाईचे वर्णन लो. टिळकसुद्धा ' ब्राह्मणी राज्य ' असेच करतात. ' पुणें शहरांत ब्राह्मणी राज्य असल्यामुळें-' लो. टिळकांचे केसरीतील लेख, भाग ४ था, पृ. २८९.

६. प्रकाशक, डोंगरे, महादेव गणेश, श्रीसिद्धांतविजयग्रंथ अथवा मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांत नवीन भर. पृ. १–१७.
अशाच एक वाद इंदूर येथे १८८६ मध्ये पंडितांच्या सभेत होऊन क्षत्रिय व वैश्य ह्यांचे अस्तित्व सिद्ध व मान्य झाले–बिर्जे, वासुदेवराव लिंगोजी, क्षत्रिय आणि त्यांचें अस्तित्व पृ. १८८–९०.

ह्यांना वेदोक्त कर्मे करण्याबद्दल सयाजीरावांनी आज्ञा केली. त्यामुळे त्यांनी राजीनामा दिला. गावात दोन तट पडले. तरी हुकुमाप्रमाणे १५ ऑक्टोबर, १८९६ पासून म्हणजे विजयादशमीपासून शिवदत्त जोशी, रेवाशंकर भट नि भोलानाथ शास्त्री ह्या तीन शास्त्र्यांनी राजघराण्यात वेदोक्त कार्य करण्यास आरंभ केला.[७] सयाजीराव महाराजांनी १८९८ साली युवराजांच्या मुंजीसुद्धा वेदोक्तरीत्या उमरठ गावी साजऱ्या केल्या.

बडोद्यातील वेदोक्त प्रकरणाची चर्चा महाराष्ट्रात त्यावेळी होत असल्यामुळे त्याची चर्चा कोल्हापुरातही होत होती. प्रतिवर्षाप्रमाणे ह्याही कार्तिक मासात म्हणजे १८९९ च्या नोव्हेंबरमध्ये छत्रपती शाहू महाराज पंचगंगा नदीत स्नान करण्याकरिता दररोज जात होते. महाराजांच्या एका हातावर शिवाचे चिन्ह गोंदलेले असून निदान त्याची ते दररोज नियमितपणे पूजा करीत असत. श्रीमंत बापूसाहेब घाटगे, मामासाहेब खानविलकर व काही दुसरे गृहस्थ महाराजांच्या या परिवारात असत. त्यावेळी महाराजांबरोबर मुंबईचे बंडखोर राजारामशास्त्री भागवतही होते.[८] महाराजांबरोबर एक भटजी मंत्र म्हणण्यासाठी बरोबर असत. स्नान केल्याशिवाय ते भटजी मंत्र म्हणत होते. ते मंत्र पुराणोक्त होते. ती गोष्ट राजारामशास्त्र्यांच्या लक्षात येताच त्यांनी त्याकडे महाराजांचे लक्ष वेधले. 'आपण संकल्प पुराणोक्त का सांगत आहात?' असे महाराजांनी नारायण भटांस विचारताच ते म्हणाले, 'शूद्रासाठी पुराणोक्त मंत्र सांगावे लागतात. वैदिक मंत्र म्हणतेवेळीच स्नानाची आवश्यकता असते. परंतु शूद्रांना पुराणोक्त पद्धतीचा अनुग्रह करावयाचा असल्यामुळे मला स्नान करण्याची आवश्यकता नाही.'

आपल्या भटजीने आपल्यास शूद्र म्हणावे, आपल्याशी तिरस्कार बुद्धीने वागावे व आपल्या वंशजांची त्याने विटंबना करावी, हे त्या मानी पुरुषास असह्य झाले. उत्तरे प्रत्युत्तरे झाली. नारायण भटजी बेफिकीरपणे उत्तरले, "सर्वशक्तिमान ब्राह्मण समाज तुम्ही क्षत्रिय आहा असे जाहीर करीतोपर्यंत मी तुमची किंमत शूद्रापेक्षा अधिक समजणार नाही." त्यावर महाराज शांतपणे म्हणाले, "आम्ही जरी तुझ्या दृष्टीने शूद्र असलो तरी स्नान न करता धार्मिक विधी करणे हे कोणत्याही

७. आपटे, दाजी नागेश, श्री महाराज सयाजीराव गायकवाड [ तिसरे ] यांचे चरित्र खंड २ रा, पृ. ७२१.

८. बागल, माधवराव, राजर्षि छत्रपति श्रीशाहूमहाराज यांच्या आठवणी, पृ. ४.

भटजीला शोभणारे नाही. " छत्रपतींना तो अपमान अतिशय झोंबला. त्यांच्या मनात तो विषय घोळू लागला, सलूही लागला.

आपला भटजी घाणेरडा, व्यसनी, बाहेरख्याली नि अशुची आहे हे समजून-सुद्धा आपले स्वर्गातील पितर उजविण्यासाठी किंवा त्याच्या हातून आपल्या देवतांची यथासांग पूजा करून घेण्यासाठी त्याकाळी ब्राह्मणेतरांची कोण धडपड चालावयाची! ब्राह्मण म्हणजे भूदेव. तो देवांचा भगवंत. सर्वांचा मोक्षदाता! रामदास स्वामी[१] तर भूदेवांचे वैभव गाताना आपल्या श्रीदासबोधात बोलूनच चुकले आहेत की :

' गुरु तों सकळांसी ब्राह्मण । जरी तो जाला क्रियाहीन ।
तरी तयासी च शरण । अनन्यभावें असावें ॥ द. ५. स. १. ओ. ६.
ब्राह्मण वेद मूर्तिमंत । ब्राह्मण तोचि भगवंत ।
पूर्ण होती मनोरथ । विप्रवाक्यें करुनी ॥ द. ५. स. १. ओ. १२
असो ब्राह्मणा सुरवर वंदिती । तेथें मानव बापुडें किती ।
जरी ब्राह्मण मूढमती । तरी तो जगद्वंद्य ॥ द. ५. स. १. ओ. १५

आणि त्याच्याही पलीकडे जाऊन ब्राह्मण गुरुजी म्हणू लागले की,

जरी ब्राह्मण झाला भ्रष्ट । तरी तो तिन्ही लोकीं श्रेष्ठ ॥

छत्रपती शाहूंचा अपमान नारायण भट्टाकडून होताच कोल्हापुरात वेदोक्त प्रकरण सुरू झाले. ' जातिभेद व मराठ्यांचे नष्ट वैभव ' असा एक लेख १९०० च्या ऑगस्टमध्ये कोल्हापुरचे प्रो. विष्णू गोविंद विजापूरकर ह्यांच्या ' ग्रंथमाले 'त प्रसिद्ध झाला. त्यात असे म्हटले होते की, ' समाज म्हणजे रसायनशाला नव्हे की वाटेल तो पदार्थ वाटेल त्यात मिसळून इष्ट संयुक्त पदार्थ तयार करता येईल.......वेदोक्त-पुराणोक्ताचा वाद आम्हांस तर वृथा वाटतो. कालच जे कार्य करीत आहे त्याबद्दल इतका अट्टाहास कशास? आमच्या नगरीत पूर्वीं वेदोक्त कर्मे होत होती. पुढे श्री. बाबासाहेब महाराजांचे वेळी बंद करून गायत्रीचेऐवजी तदर्थक अनुष्टुप् श्लोकांचा उपदेश सुरू झाला अशी वृद्धपरंपरागत हकीकत आहे. शककर्ते शिवाजी महाराजांस ज्यांनी रायगडी राज्याभिषेक केला व ' क्षत्रियकुलावतंस ' म्हटले त्यांचे निधन शौचकूपात पतन पावून झाले अशी दंतकथा आहे. एकंदरीत काय बीज असेल ते असो. ' परमेश्वरो वै वेत्ति ' मूळ अस्सल क्षत्रिय कुळी असेल, परंतु सहवास

१. संपादक, देव, शंकर श्रीकृष्ण, श्रीदासबोध, पृ. १६५.

व शरीरसंबंधाचा परिणाम देवास आवडला नसेल. "[१०]

त्याच लेखात विजापूरकरांनी ब्राह्मणांस उपदेश केला की, त्यांनी वतन किंवा वेतन यावर पाणी सोडून स्वमताभिमान श्रेष्ठ ठरवावा. 'दीर्घ कालापासून चालत आलेले, आपल्या प्रजेपैकी काही लोकांचे हक्क आपल्या अभिप्रायाप्रमाणे ते वागण्यास तयार नसल्यामुळे काढून घेण्यास तयार होणाऱ्या राजास कोणी शहाणा म्हणणार नाही........आपल्या लोकांत अगोदर असलेला द्वैधीभाव वृद्धिंगत करणे हे अविचाराचे काम आहे. ज्याने त्याने राक्षसीवाणीचा उपयोग करून दुही माजवावी असा प्रकार आहे. जातिभेदाने आम्ही बुडालो नाही, सूनृता वाणीच्या अभावाने आम्ही बुडत आहो. "[११]

विजापूरकरांना पुढे तपस्वी नि कर्मयोगी अशी बिरुदावली त्यांच्या शिष्यांनी नि भक्तांनी लावली. परंतु शिवाजी, गागाभट्ट नि छत्रपतींच्या कुळाचा शरीरसंबंध ह्या विषयींचा ह्या लेखातील उल्लेख पाहता त्यांना वर्णवर्चस्ववादी व दुरभिमानी पत्रकार म्हटले, तर त्यांची संभावना बरोबर झाली असे होईल.

दुसऱ्यांनी सूनृता वाणीचा अवलंब करावा असा सोज्ज्वळ उपदेश करणाऱ्या विजापूरकरांनी स्वतः रावणीवाणीचाच अवलंब केला आणि कोल्हापूर वेदोक्त प्रकरण पेटविण्यास ब्राह्मणांना प्रोत्साहन दिले असे ह्यावरून दिसून येते.

'श्रीसिद्धांत विजय ग्रंथा'प्रमाणे केवळ छत्रपतीच नव्हे तर त्यांचे आप्त मोहिते, महाडिक, माने, गुजर, घाटगे, शिर्के, पाल्कर, अहिराव, खानविल्कर आणि जाधव ही घराणीही क्षत्रिय असल्याचे ब्राह्मणांनी १८३५ साली मान्य केले होते. सन १८६० नंतर कोल्हापूरचे बाबासाहेब महाराज यांच्या कारकीर्दीत ( १८३९ ते १८६३ ) रघुनाथशास्त्री नावाच्या ब्राह्मणाने 'राजवाड्यात वेदोक्त पद्धतीने धर्मविधी होत असल्यामुळे महाराजांना पुत्रसंतती होत नाही,' अशी महाराजांना भीती दाखवून त्यांचे पुराणोक्ताकडे मन वळविले. साताऱ्याच्या प्रतापसिंहाच्या मृत्यूनंतर ब्रिटिशांनी साताऱ्याची गादी खालसा केली होती. वेदोक्तामुळेच साताऱ्याचे महाराज ब्राह्मणांच्या शापाला बळी पडले. शिवाजीचा वेदोक्त पद्धतीने राज्याभिषेक करणाऱ्या गागाभट्टावर दुर्दैव ओढवले, असेही त्या ब्राह्मणाने सांगितल्यामुळे कोल्हापुरच्या छत्रपतींनी धसका घेऊन प्रचलित असलेली वेदोक्त पद्धती बंद केली, असे आढळून आले.

१०. ग्रंथमाला, वर्ष ७, अंक ५, पृ. ५.
११. ग्रंथमाला, वर्ष ७, अंक ५, पृ. ६.

. २ .

शाहू महाराजांनी काही दिवस ह्याबाबतीत प्रत्यक्षपणे कृती काहीच केली नाही. १९०० साली नोव्हेंबर महिन्यात जरी करवीर नगरपालिकेने पंचगंगेचे सुव्यवस्थित असे घाट ब्राह्मणांकरिता राखून ठेवले होते, तरी त्या अरेरावीला धुडकावून लोकांनी आपला कार्यभाग उरकला. तथापि,वादास तोंड फुटण्यास एक तात्कालिक कारण घडले. काही गृहस्थांनी नारायणशास्त्री नावाच्या एका विद्वान भिक्षुकाकडून १९०१ साली श्रावण महिन्यात वेदोक्त पद्धतीने श्रावणी करविली. त्यामुळे करवीरचे समस्त ब्रह्मवृन्द संतप्त झाले. ह्याच नारायणशास्त्र्याने ऋग्वेद–पठण सांगता समारंभाच्या वेळी ब्राह्मण मराठ्यांचे देखत वेद पठण केले होते. ' मराठ्यांदेखत तू वेद का म्हटलेस, ' असे ब्राह्मणांनी त्याला विचारताच तो म्हणाला की, ' मराठे क्षत्रिय आहेत. ' पुढील महिन्यात छत्रपती शाहू पन्हाळगडावर असल्यामुळे महाराजांची अनुज्ञा झाल्यास श्राद्धविधी वेदोक्त पद्धतीने करावे लागतील, अशी भीती वाटल्यावरून राजोपाध्ये पन्हाळगडावर गेलेच नाहीत. यास्तव ७ ऑक्टोबर १९०१ रोजी ' राजवाड्यातील सर्व धार्मिक विधी वेदोक्त पद्धतीनेच केले पाहिजेत व असे जो न करील त्याला दक्षणा मिळणार नाही, ' असा महाराजांनी हुकूम काढला.

त्यावर राजोपाध्ये म्हणाले की, ' काही कारणामुळे जी पद्धत बंद पडली ती शंकराचार्यांच्या किंवा काशीतील पंडितांच्या अनुज्ञेशिवाय सुरू करता येणार नाही. ' वादास आता तोंड फुटले म्हणून महाराजांनी ठिकठिकाणचे मराठी संस्थानिकांकडील धार्मिक विधी कोणत्या पद्धतीने करतात ह्या विषयी माहिती मिळवून ते आता ह्या बाबतीत तज्ज्ञांचा सल्लाही घेऊ लागले. सावंत व इंगळे उदेपूरला रवाना झाले. डोंगरे सातारला गेले.

बडोदा संस्थानचे सयाजीराव महाराज गायकवाड यांच्याकडे ही विचारणा केली असता, त्यांनी आपल्या १५ डिसेंबर १९०१ च्या पत्रात म्हटले की, ' सातारा येथील माझ्या मनुष्याला लिहून त्यांच्याजवळ कागदपत्र असतील तर ते आपल्या हवाली करण्यास कळवितो. आपण विलायतेस जाल तेव्हा युरोप खंडातील चित्तवेधक संस्था व स्थळे पाहण्याची संधी केव्हाही दवडू नये. अशा संस्थांचे निरीक्षण केल्याखेरीज पाश्चात्य देशांत ज्या निरनिराळ्या संस्कृती उपलब्ध आहेत त्यांचे तुलनात्मक ज्ञान संपादिता येणार नाही. आपण ज्या कार्याला उदार अंतःकरणाने चालना दिली आहे, ती मी विसरलो नाही व पुढेही विसरणार नाही.

आम्हांला थोडीशी अनुकूल परिस्थिती प्राप्त होण्याची मी वाट पाहात आहे. आपण आमच्या लोकांच्या कल्याणाचे कामी जे लक्ष घालीत आहात त्याबद्दल मी आपले अभिनंदन करतो.' वेदोक्त प्रकरणी आपली दृष्टी धार्मिक नसून सामाजिक आहे, असे गायकवाड महाराजांचे म्हणणे होते.

कोल्हापुरच्या ब्राह्मणांनी नारायणशास्त्र्यांची कोंडी करण्याचे ठरविले. त्यांनी अंबाबाईची पूजा करू नये व राजवाड्यातील धार्मिक विधी करू नये, अशी मागणी करणारा अर्ज महाराजांच्या कारभाऱ्याकडे १३ ऑक्टोबर १९०१ रोजी सादर केला. तरी नारायणशास्त्र्यांनी अंबाबाईची पूजा केली. त्यावर ब्राह्मणांनी देवीला शुद्ध करण्याची परवानगी मागितली. दरबारने ती नाकारली. ब्राह्मणांनी पॉलिटिकल एजंट कर्नल सिली ह्यांच्याकडे तक्रार केली. धार्मिक बाबतीत आपणाला हात घालता येत नाही; याबाबतीत महाराजांचा निकाल अखेरचा समजावा, असे त्यांनी ब्राह्मणांना उत्तर दिले.

राजवाड्यातील आज्ञेची प्रतिक्रिया म्हणून लो. टिळकांनी आपल्या 'केसरी'[१२] पत्रात दोन लेख २२ आणि २९ ऑक्टोबर १९०१ रोजी लिहून राजोपाध्यांची बाजू घेतली. राजोपाध्ये हे एक आंग्लशिक्षणभूषित गृहस्थ होते. इचलकरंजीचे जहागिरदार व प्रो. विष्णू गोविंद विजापूरकर हे त्यांचे महत्त्वाचे आधारस्तंभ नि सल्लागार होते. राजोपाध्यांना सुमारे रु. ३०,००० वार्षिक उत्पन्न मिळत असे. आपल्या दोन लेखात टिळक गरजले की, "अलीकडे इंग्रजी विद्येने व पाश्चिमात्य शिक्षणाने संस्कृत झालेल्या मराठे मंडळींच्या मनात जी काही खुळे-शिरली आहेत, त्यांपैकीच वेदोक्त कर्माचे खूळ हे एक होय. बरेच दिवसांपूर्वी हे बंड प्रथमतः श्री. गायकवाड सरकार यांच्या प्रोत्साहनाने बडोद्यास सुरू झाले व त्याचा संसर्ग आता कोल्हापुरपर्यंत जाऊन भिडला आहे व इतर ठिकाणी ही तोच प्रकार होण्याचा संभव आहे."

ज्या टिळकांनी 'हिंदुधर्म' लक्षणाची वा हिंदू या 'संज्ञेची' 'प्रामाण्य बुद्धिर्वेदेषु साधनानामनेकता' अशी व्याख्या केली, जो वेद प्रमाण मानतो तो हिंदु असे म्हटले, त्यांनीच सयाजीराव गायकवाड महाराज नि शाहू छत्रपती ह्यांना ते वेदोक्ताचे हक्क मागतात म्हणून दोष दिला. ती मागणी म्हणजे एक 'खूळ' आणि ते सांसर्गिक आहे, असे म्हणून जातिभेद निर्मूलन करणे म्हणजे सब-

---

१२. लो. टिळकांचे केसरीतील लेख, भाग ४ था, पृ. ३१६–२३.

गोलंकार करणे होय असेही विधान केले. ' भोसल्यांच्या कुळापेक्षा ज्यांचे कूळ कर्तबगारीने, ज्ञातीने नि मानाने कमी आहे अशा मराठे लोकांनी आता तक्रार करावी अथवा उचल खावी हे व्यवहारास, शिष्टपरंपरेस अथवा ज्ञातिसंप्रदाय पद्धतीस अगर न्यायास अनुसरून आहे, असे आम्हांस वाटत नाही, ' असे म्हणून घाटगे घराणे, गायकवाड घराणे ही कमी दर्जाची आहेत असे टिळकांनी अप्रत्यक्ष-पणे जाहीर केले.

' वेदोक्ताच्या मागणीचे विचार हे पूर्वपरंपरा, इतिहास व निर्णय लक्षात आणता अवनतीचे नि अविचारीपणाचे आहेत. श्रीशिवाजी महाराजांच्या जात-कुळीपेक्षा ज्यांची जातकुळी अधिक श्रेष्ठ नाही त्यांनी वेदोक्ताचे खूळ माजवून लोकांच्या शांततेचा व हक्काचा विनाकारण भंग करावा, आणि सुशिक्षित संस्था-निकांनी हे प्रकार आपल्या संस्थानात घडू द्यावे, किंबहुना त्यांस उत्तेजन द्यावे हे आमच्या मते अगदी गैरशिस्त होय. ' ' वैदिक मंत्रांनी संस्कार झाले म्हणजे मराठे व ब्राह्मण एक जातीचे होतील अशी ज्या कोणाची कल्पना असेल तर तीही निर्मूल आहे. मराठ्यांनी आपले क्षात्रतेज व्यक्त करण्याचा मार्ग वेदोक्त मंत्राने श्रावणी करणे हा नव्हे, ' ' त्यांच्या घरच्या क्रिया वेदोक्त झाल्याने त्यांना विशेष महती प्राप्त होईल, असे म्हणणे अगदी चुकीचे आहे. यात काही भूषण नाही, बहुमान नाही आणि देशकार्यही नाही. असा मराठ्यांनी आग्रह धरणे चुकीचे आहे. ' लोकमान्य टिळक पुढे म्हणतात, ' हा वेदपठनाचा प्रश्न नाही. वेदोक्तसंस्कार करण्याचा प्रश्न आहे हे लक्षात ठेवले पाहिजे. कोणाही युरोपियनाचे ब्राह्मणांनी वेदोक्तसंस्कार केलेले नाहीत, व व्यक्तिस्वातंत्र्याचेच मत घेतले तर कोणाही ब्राह्मणास अशा प्रकारे मराठ्यांचे वेदोक्त संस्कार करण्यास लावणे किंवा जो नाकारील त्याची जहागीर जप्त करणे हे अयोग्यच नव्हे तर अन्यायाचे होईल··· मराठे लोकांच्या घरी ब्राह्मण वेदोक्त कर्म करीत नाहीत म्हणून त्यांची इनामे किंवा जहागिरी जप्त करण्याचा जो कित्येक ठिकाणी धाक दाखविण्यात आला तो अन्यायकारक व संस्थानास अपायकारक आहे···राजाला जो अधिकार आहे तो समाजाची घडी मोडून समाजात असंतोष उत्पन्न करण्याकरिता नव्हे; व ह्या अधिकाराचा जर एखाद्या संस्थानाकडून दुरूपयोग होईल तर त्याची दाद घेणे सार्वभौम सरकारास भाग पडेल. मराठेशाहीत किंवा ब्राह्मणी राज्यात जर असे प्रकार घडले तर राजा आणि प्रजा यांच्यामध्ये किंवा ज्ञातीज्ञातीमध्ये तंटे माजून अखेरीस दंगेधोपे होण्यापर्यंत मजल आली असती. '

अशा रीतीने टिळकांनी सार्वभौम सरकारकडे दाद मागण्याची नि दंगे-धोप्याची शाहू छत्रपतींना भीती घातली. ' मराठे आणि वेदोक्त कर्म ' हे दोन लेख ' केसरी 'त ऑक्टोबर महिन्याच्या उत्तरार्धात लिहिण्यापूर्वी टिळकांनी श्री. सयाजीराव गायकवाड महाराज यांच्यावर त्याच महिन्याच्या आरंभी शस्त्र धरले होते.[१३] ईश्वराच्या अस्तित्वाबद्दल शंका प्रदर्शित करताना एका व्याख्यानात गायकवाड महाराज म्हणाले होते की, ' जगात काही गोष्टी अशा आहेत की, त्याची प्रत्यक्ष साक्ष पटणे शक्य नसते. असे जरी आहे तरी ईश्वर नाही असे मात्र माझे म्हणणे नाही. ईश्वर आहे असे मानून चालले असता बरे. '

त्याचा अर्थ टिळकांनी असा केला की,म्हणजे ईश्वर ही एक मनुष्याने निर्माण केलेली उपयुक्त संस्था होय व ती उपयुक्ततेच्या आड आल्यास क्षणभर ईश्वरास रजा दिली तरी काही हरकत नाही ! त्यावर आपल्या ' बडोदे सरकार यांचा वेदान्त ' ह्या लेखात टिळकांनी त्यांची रेवडी उडविण्याच्या स्वरात लिहिले की, ' राजे किंवा संस्थानिक कितीही सुशिक्षित, बहुश्रुत आणि विद्याव्यासंगी असले तरी ज्या विषयावर ते बोलणार किंवा आपले विचार प्रकट करणार त्या त्या संबंधाने पूर्ण व्यासंग करून त्या विषयात प्राविण्य संपादन करणे हे त्यांचे काम आहे !...अशा स्थितीत वैदिक धर्माची उलाढाल करून अमक्यांनी वैदिक कर्मे आचरावी, अमक्यांनी आचरू नयेत अशा भानगडीत महाराजांनी पडणे म्हणजे शुद्ध ' अव्यापारेषु व्यापार ' होय...ईश्वराचे अस्तित्व, वेदांचे प्रामाण्य, गीतेचे महत्त्व, वर्णाश्रमधर्मविचार इत्यादी बाबतीतील रहस्ये महाराजांस न समजण्यासारखी आहेत असे नाही. पण ती समजून घेण्यास त्यांनी अजून बरीच वर्षे अभ्यास केला पाहिजे...विलायतेस दहा पाच सफरी केल्याने धर्माचें ज्ञान होते असे नाही. "

. ३ .

वेदोक्त प्रकरणाचा समारोप करताना सयाजीराव गायकवाडांचे चरित्रकार दाजी नागेश आपटे हळूवारपणे म्हणाले की, ' शिवाजीच्या काळी हा निर्णय लागल्यावर शिवाजी महाराजांच्या कुळास व त्यांच्याशी शरीरसंबंध आलेल्या कुळांना वेदोक्ताचा अधिकार ओघानेच आला. शिवाजी महाराजांसच क्षत्रियत्वाचे

१३. लो. टिळकांचे केसरीतील लेख, भाग ४ था, पृ. ३१२–१६.

अधिकार दिले ते चुकीचे होते, असे ' केसरी 'चे म्हणणे असते तर मग अर्थातच त्यांच्या वंशजांना, नातलगांना ते मिळू शकत नाहीत हे म्हणणे सरळ होते. परंतु शिवाजी महाराजांचे क्षत्रियत्व मान्य केल्यावर कोल्हापूर वा बडोदे या संस्थानच्या अधिपतींनी वेदोक्ताचा अधिकार घेतला त्यावेळेस त्यांच्या कृत्याला खूळ म्हणणे हे तर्कविरोधी आहे.[१४] हा प्रश्न मुख्यतः समानत्वाच्या हक्कांबद्दल व न्यूनगंड काढून टाकण्याबद्दलचा होता असेही त्यांनी म्हटले आहे.

टिळकांचे म्हणणे असे की, जरी शिवाजी महाराजांना ' शास्त्रोक्त ' रीतीने राज्याभिषेक करण्यात आला, तरी त्यांच्या घरचे सर्व संस्कार वेदोक्त होत असत अशाबद्दल कोठेही पुरावा नाही. जातिधर्माप्रमाणे पाहता, जरी ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांजकडील गृहसंस्कार वेदोक्त मंत्राने करावे, अशी स्मृतीत वचने असली तरी धर्मशास्त्रावरील जे प्रसिद्ध व सर्वमान्य ग्रंथकार आहेत त्यांच्या मते खऱ्या क्षत्रिय व वैश्य जाती हल्ली नाहीशा झालेल्या आहेत, असे ब्राह्मण पक्षाला पाठिंबा देण्याच्या हेतूने संशोधक टिळकांनी लिहिले, ह्यावरून त्यांचे खरे मन नि मत दिसून येते.

मोगल कालखंडात जर क्षत्रियत्व लोप पावले, तर ब्राह्मणत्व तेवढेच शिल्लक कसे राहिले ह्याचा विचार टिळकांसारख्या महान संशोधक पंडिताने करू नये याविषयी आश्चर्य वाटते. मराठे लोकांस वेदोक्त कर्म करणे असल्यास त्यांनी ते खुशाल करावे. त्यांचा हात धरणारा या काळात कोणी राहिला नाही, असे म्हणून टिळकांनी आपल्या मनातील कोणत्या भावना व्यक्त केल्या हे सांगणे आवश्यक आहे असे नाही. पेशवाईत ब्राम्हण वर्चस्वाखाली प्रभू, सोनार यांचा हात धरून त्यांचा छळ[१५] करणारे त्या ब्राह्मणी राज्यात नरपुंगव होऊन गेले. पण ब्रिटिश राजवटीत ते नव्हते ह्याविषयी त्यांना दुःख झाले. मराठ्यांनी वेदोक्त कर्मे करण्यात सामाजिक किंवा राष्ट्रीय दृष्ट्या काही फायदा नाही, भूषण नाही, बहुमान नाही, देशकार्यही नाही, तर वेदोक्त कर्म ब्राह्मण पुरोहितांनी मराठ्यांच्या घरी न करण्यात सामाजिक व राष्ट्रीय हित आणि देशकार्य साधेल असा अर्थ लोकमान्य टिळक

१४ आपटे, दाजी नागेश, श्री. महाराज सयाजीराव गायकवाड [ तिसरे ] यांचें चरित्र. खंड २ रा. पृ. ७२३.

१५ ठाकरे, प्रबोधनकार के. सी, ग्रामण्यांचा साद्यंत इतिहास अर्थात नोकरशाहीचें बंड [ १९१९ ].

करीत होते, असे अनुमान निघते. टिळकांचे हे ध्येय–धोरण अगदी अन्यायाचे, वर्ण-वर्चस्ववादी आणि समाजविघातक होते असे म्हणजे क्रमप्राप्त आहे. क्षत्रियांच्या मुंजी करण्याचे नाकारून त्यांना कनिष्ठ वर्गात लोटून आपले वर्णवर्चस्व ब्राह्मणांनी कसे ठेवले, त्याचीच ही पुन्हा आवृत्ती घडली हे सांगावयास नको.

महाराष्ट्राच्या सिंहाने अशी गर्जना करताच कोल्हापुरचे, वाईचे नि इतर ब्राह्मणी वर्चस्वाखालील वृत्तपत्रांतील ग्रामसिंह हे सारे शाहू महाराजांवर गुरगुरू लागले, यात आश्चर्य नाही. ब्राह्मणांच्या स्वयंनिर्णित सत्तेला धक्का बसताच विजापूरकरांचे राजकारणी रूप ' समर्थ ' ह्याने शाहू छत्रपतींना अशी दहशत घातली की, ' जर महाराज आपला हेका पुढे चालवतील, तर त्यापासून बरेच दुष्परिणाम घडून येतील. ह्या प्रश्नांचा ब्रह्मवृंदाने निर्णय करावा व छत्रपतींनी राजोपाध्यामार्फत ब्रह्मवृन्दाचे म्हणणे ऐकावे व त्याप्रमाणे वागावे, नाहीतर महाराष्ट्रामध्ये खळबळ उडून जाईल ! '

विजापूरकरांनी ज्ञानप्रसारासाठी काढलेल्या ग्रंथमालेस १८९४ सालापासून महाराज वार्षिक पांचशे रुपये अनुदान देऊन ग्रंथमालेच्या ज्ञानप्रसाराच्या कार्यास उत्तेजन देत असत. पण आता विजापूरकरांच्या भिक्षुक–धार्जिण्या व वर्णाभिमानाने पछाडलेल्या वृत्तीचा त्यांना उबग येऊन त्यांनी जून १९०१ पासून ग्रंथमालेला अनुदान देण्याचे बंद करून टाकले. विजापूरकरांनी प्रत्यक्ष विनवणी करून सुद्धा महाराजांनी अनुदान सुरू करण्यास नाकारताच, ग्रंथमालाकारांनी आपले खरे स्वरूप उघडे करावयास आरंभ केला.

ऑक्टोबर १९०१ च्या ' ग्रंथमाले 'त ' वेदोक्तकर्म–मीमांसा ' ह्या लेखात विजापूरकरांनी, भोसले कुळाचे क्षत्रियत्व शिवाजीच्या राज्याभिषेकाच्या वेळी अगोदर ठरवून ठेवलेल्या सिद्धांतास पुष्टी आणण्यासाठी स्थापन झाले, हे मत देऊन त्याच्याखाली त्यांनी मोठया उत्साहाने अशी टीप दिली की, ' हे म्हणणे खरे झाले तर कोणच क्षत्रिय नाही असे होईल. जुने कागदपत्र पाहून शहाण्णव कुळीचे क्षत्रिय मानता येईल की काय हे ठरवायचे आहे....वाद उपस्थित होतो तो वेदोक्त-कर्मेच्छू मंडळींच्या ब्राह्मणावलंबीपणामुळे होतो. मराठे मंडळींनी ब्राह्मणांस श्रेष्ठ मानले नसते तर आज ह्यासंबंधी विचार करण्याचे कारणच नव्हते. ब्राह्मसमाजीय लोक विधिसंस्कार करण्यास आपापले उपाध्याय योजितात. पण स्वतंत्रपणे क्षत्रिया-चार आपल्यात रूढ करण्याची मराठयांची इच्छा नाही. वेदोक्तकर्म पद्धतीचे

आपल्या मानेवर जू लावून घेण्यात सुशिक्षित मराठे मंडळीस कोणता पुरुषार्थ साधावयाचा आहे ? '

विजापूरकरांनी पुढे म्हटले की, ' कित्येकांच्या मते शिवाजीच्या वेळी झाले ते पुराणोक्त संस्कार झाले. ' ' केसरीकारांनी ' पुराणोक्त शब्द टाकून ' शास्त्रोक्त ' घेतला आहे. बंद पडलेली रूढी सुरू करावयाची आहे म्हणून करवीरस्थ ब्रह्मवृन्दाची किंवा श्री. जगद्गुरू संकेश्वर यांची संमती मागावयाची होती. शेवटी विजापूरकर म्हणाले, ' हा सर्व प्रकार लक्षात घेऊन भलत्या भरीस पडण्याचे आमचे बंधू सोडतील व एक वेळ पाऊल पुढे टाकले आहे ते मागे कसे घ्यावे अशा वृथाभिमानास्तव हट्टास पेटणार नाहीत, तर त्यांचे व एकंदर राष्ट्राचे कल्याण होणार आहे. हा अनुभवसिद्ध विचारपूर्वक व शुद्ध मनोभावाने केलेला बोध आमचे बंधू ध्यानी आणतील अशी आम्ही आशा करीत आहो. "[१६]

ब्राह्मणांनी मराठा समाजात दुही माजविण्याचा प्रयत्न केला. राजवाडयावर वेदोक्तासंबंधी मतभेद आहेत अशीही कंडी पिकविली. महाराजांनी सर्व हिन्दुसमाजाचा विचार करावा अशीही त्यांनी सूचना केली. परंतु मराठ्यांमध्ये दुही पडेना. महाराजांनी म्हटले की, प्रस्तुत प्रश्नाचा फक्त माझ्याशी संबंध असून राजोपाध्याला किंवा दुसऱ्या कोणत्याही ब्राह्मणाला, कोणत्याही इतर मराठा घराण्यामध्ये वैदिक पद्धतीने विधी करण्यास मी बोलावले नाही. ' कृष्णाजी नारायण पंडित व व्ही. व्ही. गोखले ह्या दोन अधिकाऱ्यांची एक समिती नेमून महाराजांनी राजघराण्यातील वेदोक्त पद्धतीसंबंधीच्या इतिहासाचे संशोधन करावयास सांगितले. परंतु ह्याबाबतीत महाराजांचे क्षत्रियत्व स्वयंसिद्ध आहे, असा जेव्हा महाराजांनी आपला अभिप्राय दिला तेव्हा ब्राह्मणांची बाजू सपशेल पडली. ८ नोव्हेंबर १९०१ रोजी राजवाड्यातील धार्मिक विधी वेदोक्त पद्धतीने करण्याबद्दल पुन्हा राजोपाध्ये यांना कळविण्यात आले. पुढील काही महिने महाराज फार कामात फार गढले होते. ते मे १९०२ च्या मध्यास सातवे एडवर्ड यांच्या राज्याभिषेकाला हजर राहण्यासाठी लंडनला जाणार होते.

आपल्या हुकुमाप्रमाणे धार्मिक विधी न केल्याबद्दल महाराजांनी १ मे १९०२ रोजी राजोपाध्ये यांना अशी ताकीद दिली की, दिलेले इनाम का जप्त करू नये याचा खुलासा करावा व असे जर चार दिवसांत होणार नाही तर योग्य तो

~~~~~~~~

१६. ग्रंथमाला, वर्ष ८, अंक ७ वा, पृ. २१-३२.
~~~~~~~~

इलाज करण्यात येईल. विचार करण्यासाठी काही दिवस मुदत आपणास मिळावी असे राजोपाध्यांनी ५ मे १९०२ रोजी प्रत्युतर दिले. स्वतः महाराज व खंडेराव गायकवाड हे राजोपाध्यांचे मत वळविण्याचा प्रयत्न करीत राहिले होते, तरी राजोपाध्ये वळेनात. ते उद्धटपणे म्हणाले, ' छत्रपती जरी क्षत्रिय असले तरी महाराज हे कागलच्या घाटगे घराण्यात जन्मले असल्यामुळे त्यांची विनंती मान्य करता येत नाही ! '

ह्या दरम्यान टिळकांचा पवित्रा थोडा बदलला होता, असे म्हणतात. टिळकांचे म्हणणे थोडे तडजोडीचे पण अपमानकारक होते. टिळक पडले कायदेपंडित, वकिलांचे वकील. शिवछत्रपती क्षत्रिय ठरले होते, तर त्यांच्या गादीवर येणारा घाटगे घराण्यातील पुरुष असला तरी तो भोसले ठरतो, तेव्हा जो छत्रपतींच्या गादीवर बसेल तोच क्षत्रिय. राजाचा दुसरा बंधू असेल तो क्षत्रिय नाही ! गादीवर जो पुत्र बसणार नाही, तो क्षत्रिय नाही ! असा तो वकिली पवित्रा होता. ही मानहानी पत्करून कोणता स्वाभिमानी राजा तडजोड करील ? घाटगे घराणे क्षत्रिय घराण्यातील होते हे १८३५ च्या दरम्यान साताऱ्याला झालेल्या वादात सिद्ध झालेले होते, ही गोष्ट ' सिद्धांत–शिरोमणी ' ग्रंथावरून दिसून येतेच.

मे १९०२ च्या ग्रंथमालेतील ' वेदोक्तकर्म–मीमांसा ' ह्या स्फुटात विजापूरकरांनी सांगितले की, वाद सभ्यतेने चालावा व ' वितंडवाद न करता ब्राह्मणांत असतील व आढळतील त्या दोषांचे सलोख्याने निर्मूलन करणे हे सर्व जातींचे काम आहे. आजवर विद्या आपल्या हाती ठेवल्याने त्यांच्यात खरा चांगुलपणा काही असेल, तर त्याचे अनुकरण करून त्याचा गौरव करणे हेही सर्व जातींस भूषण आहे, '[१७]

. ४ .

ब्राह्मणांना वाटले, की, महाराज ज्या अर्थी इतका अपमान करूनही आपले काही करू शकत नाहीत, त्याअर्थी त्यांच्या मानसिक दौर्बल्याचे ते प्रतीक आहे. तरी महाराजांनी खंडेराव तथा बाळासाहेब गायकवाड यांच्याकडून राजोपाध्यांची समजूत घालण्याचा अखेरचा प्रयत्न केला. राजोपाध्ये ह्यांना विजापूरकर नि इचलकरंजीकर यांचा जोराचा पाठिंबा होता. शिवाय ' केसरी ' रूपाने

१७. ग्रंथमाला, वर्ष ९, अंक २, पृ. ४.

महाराष्ट्रातील सर्व ब्राह्मणवर्गाचा पाठिंबा ! ते पाहताच राजोपाध्यांनी ' उत्पन्न जप्त झाले तरी बेहेत्तर पण वेदोक्त कर्मे करणार नाही, ' असे महाराजांना बेपर्वाईने नि उन्मत्तपणे उत्तर दिले. त्याबरोबर महाराजांनी कडक उपाय योजण्याचे ठरविले. ६ मे १९०२ रोजी महाराजांनी मुजोर ब्राह्मणांपुढे मान न वाकविता राजोपाध्ये ह्यांचे वतन जप्त करण्याचा हुकूम काढला. त्यांना मुंबईहून १७ मे रोजी लंडनला प्रयाण करायचे होते.

पुढील आठ दिवसांत ब्राह्मणांनी त्यांचे निर्वाणीचे शस्त्र उपसले ! ते म्हणजे देवाच्या शापाची भीती !



देवाधीनं जगत्सर्वं मंत्राधीनं च दैवतम् ।
ते मंत्रा ब्राह्मणाधीनं ब्राह्मणो मम दैवतम् ।।

देवाचे स्वाधीन सर्व जग आहे व देव मंत्रांचे स्वाधीन आहेत; पण ते मंत्र ब्राह्मणांच्या स्वाधीन; म्हणून ब्राह्मण हे माझे स्वतःचे दैवत. असे खुद्द परमेश्वरच बोलून चुकला आहे.

दुःशीलेऽपि द्विजः पूज्यो न च शूद्रो जितेन्द्रियः ।

ब्राह्मण चांगल्या शीलाचा नसला तरी तो पूज्य. मोठा जितेन्द्रिय झाला तरी शूद्र पूज्य नाही. प्रत्यक्ष विष्णु भगवंत आपल्या छातीवर ब्राह्मणाच्या लाथेचा प्रसाद बहुमान म्हणून मिरवतो ! समुद्रातील सर्व तीर्थे ब्राह्मणाच्या उजव्या पायात आहेत. पुरोहित वर्गाचे धर्मशास्त्र धाब्यावर बसविणाऱ्या वेन नामक राजास ऋषींनी मारून टाकले, आपल्या हस्तकास त्याच्या गादीवर बसविले आणि ब्राह्मणास शिक्षा करणार नाही व वर्णसंकर करणार नाही असे त्याच्याकडून अभिवचन घेतले. राजापाशी पुरोहित असेल तर त्याचे क्षात्रतेज, बल, वीर्य व राष्ट्र वाढते, नसेल तर ते सर्व नष्ट होते. पुरोहिताच्या पायात, वाणीत, कातडीत, हृदयात व आणखी एके ठिकाणी असे पाच क्रोधाग्नी असतात. त्याला या–बसा म्हणण्याने, पाद्याने, वस्त्रांनी व अलंकारांनी, धनाने व राजवाड्यात ऐषआरामात राहू दिल्याने हे अग्नी शांत होतात. त्याच्या राज्याला बळकटी येऊन सर्व त्याच्या ताब्यात राहतात.[१८] अशा भूदेवांचा शाप किती भयंकर असणार !

१८. राजवाडे, वै. का., विविधज्ञानविस्तार, नोव्हेंबर १९२७, ' ब्राह्मणकालीन जातिभेद ' पृ. ४०७-४१५.

कोल्हापुरातील ब्राह्मणांनी महाराजांचे जनक वडील व आजे राजाराम महाराज यांच्यावर ते विलायतच्या सफरीवर असता कसे दुर्दैव ओढवले ह्याची महाराजांना आठवण करून दिली ! महाराज निग्रही नि निर्भय होते. देवाच्या शासनाची भीती स्वार्थी व अन्यायी लोक दाखवीत आहेत, हे त्यांना कळत होते. ते शांतपणे पण निर्धारपूर्वक त्यांना म्हणाले, ' माझे पूर्वज ब्राह्मणांचे आशीर्वाद घेऊन विलायतेला गेले असताही त्यांच्यावर दुर्दैव ओढवले. ब्राह्मणांच्या शापांमुळे तरी माझ्या घराण्याचे काही कल्याण होते की काय हे मला पाहावयाचे आहे. ' समाजक्रांती घडवू पाहणारा समाजसुधारक कसा निर्भय असतो त्याचे हे एक आदर्श उदाहरण. त्यावेळी आईसाठी, पत्नीसाठी वा बापाच्या सुखासाठी आपण माघार घेतो, असे म्हणून महाराजांनी आपली सुटका करून घेतली नाही, हे त्यांचे एक प्रमुख वैशिष्ट्य होय.

इंग्लंडमध्ये महाराजांचे वास्तव्य जवळ जवळ साडेतीन महिने होते. ते तेथे असताना त्यांच्या एका मित्राने त्यांना कळवले की, ' ब्राह्मणांचे वर्तन उद्धटपणाचे होत आहे. ते गुप्त कारस्थाने करीत आहेत. रक्ताने माखलेल्या हातांची बोटे घरांच्या भिंतीवर उठवून महाराजांना भीती दाखवीत आहेत. महाराजांच्या मनावर त्याचा परिणाम काहीच होणार नाही ही गोष्ट जरी खरी असली, तरी राजघराण्यातील स्त्रियांना चिंता वाटते. '

महाराजांच्या पुरोगामी धोरणामुळे ब्राह्मणांना आणखी एक जबरदस्त धक्का बसला. लंडनहून त्यांनी एक ठराव पाठविला व तो २६ जुलै १९०२ रोजी कोल्हापूर संस्थानच्या गॅझेटमध्ये प्रसिद्ध झाला. त्या ठरावाप्रमाणे सरकारने असे जाहीर केले की, विशेष मागासलेल्या जातीतील प्रजाजनांना उच्च शिक्षण संपादन करण्यास उत्तेजन देण्यासाठी, त्या वर्गातील उमेदवारांना, सरकारी नोकरीतील जागा रिकाम्या होतील त्यांपैकी शेकडा ५० जागा द्याव्या. ब्राह्मणांच्या द्वेषाग्नीवर त्यामुळे तेल ओतल्यासारखे झाले. त्यानंतर महाराज २१ ऑगस्ट १९०२ रोजी कोल्हापुरास परतले. जलपर्यटन करून आल्यानंतर महाराजांनी कोणत्याही तऱ्हेचे प्रायश्चित्त घेतले नाही, ही गोष्ट विशेष उल्लेखनीय आहे. महाराष्ट्राबाहेर राज्य करीत असलेले समाजसुधारक महाराज सयाजीराव गायकवाड आणि समाजक्रांतिकारक शाहू छत्रपती यांमधील फरक हा असा ठळक आहे !

महात्मा फुल्यांवर मारेकरी घालणाऱ्या, आगरकरांचा छळ करणाऱ्या व रानड्यांची निंदा करणाऱ्या समाजद्रोही परंपरेतील पिढीने त्यावेळी उग्र रूप धारण

केले. महाराजांची दत्तक मातोश्री आनंदीबाई सप्टेंबरमध्ये निवर्तल्यावर त्यांचा वेदोक्त पद्धतीने और्ध्वदेहिक विधी करण्याचा ज्या दिवशी महाराजांनी आग्रह धरला. त्याच दिवशी रात्री त्यांच्या जुन्या राजवाड्याचा काही भाग अग्निमुखी पडला. 'ब्राह्मणांच्या आक्षेपामुळे व चितेजवळ अशा दुःखदायक प्रसंगीही ब्राह्मणांनी मला जी धमकी दिली त्यामुळे हे संस्कार करण्याचे काम अतिशय दुर्घट झाले. माझ्यावर जी ही द्विविध आपत्ती ओढविली आहे, तीमुळेच स्वाभाविकपणे ब्राह्मण जातीला आनंद झाला आहे. देवाच्या कोपामुळे असा हा प्रकार झाला असे या जातीचे म्हणणे आहे.' असे महाराजांनी त्या काळाच्या एका पत्रात म्हटले आहे. टिळकांच्या दोन प्रतिनिधींनी महाराजांच्या गैरहजेरीत कोल्हापुरला येऊन महाराजांना प्रतिकूल असे वातावरण निर्माण करण्याचा प्रयत्न केला होता. परंतु अशा गोष्टींनी आपल्याला आळा बसेल असे आपणांस वाटत नाही, असे महाराजांनी एका पत्रात ९ सप्टेंबर १९०२ रोजी लिहिले होते.

"मरणाची अगर याखेरीज दुसरी कोणती आपत्ती माझ्यावर किंवा माझ्या मित्रावर ओढवली तरी मी डगमगणार नाही. परंतु आम्हांपैकी कोणावर जर अशी आपत्ती आलीच तर आमच्या शापाचा हा परिणाम अशी बढाई मारण्याला, लोकांच्या धर्मभोळेपणाचा फायदा घेण्याला मात्र ब्राह्मणांना संधी लाभेल याचे मला वाईट वाटते. त्यांचे वर्चस्व नष्ट होईतोपर्यंत आम्हांवर असले प्रसंग सहसा येऊ नयेत, कारण ते अशा प्रसंगाचा उपयोग आमचे कार्य हाणून पाडण्याकडे करतील," असे महाराजांनी त्यावेळी दिवाण सबनीस ह्यांना आपले हृद्गत बोलून दाखविले.

तरुण छत्रपतींच्या ह्या उद्गारावरून त्यांच्या ठायी खऱ्या नेत्याची अंगभूत निर्भयता नि सुधारणेची व स्वाभिमानाची तळमळ कशी प्रखर होती हे दिसून येते. बाळशास्त्री जांभेकर ह्यांनी श्रीपत शेषाद्रीस शुद्ध करून परत हिंदुधर्मात घेण्याचा प्रयत्न केला. त्यांना ब्राह्मणांनी छळले आणि प्रायश्चित्त घेण्यास भाग पाडले. आणि तो उदारमतवादी, थोर ज्ञानी पुरुष जेव्हा १८४६ साली निधन पावला, तेव्हा आपल्या शापामुळेच बाळशास्त्री अकाली मृत्यू पावला, असे सनातनी ब्राह्मणांनी त्यावेळी मिशांना पीळ देऊन उद्गार काढले होते, हे लक्षात ठेवले म्हणजे शाहू महाराजांच्या उद्गारांचे गांभीर्य कळून येते.

आप्पासाहेब राजोपाध्ये ह्यांनी महाराजांच्या हुकमाविरुद्ध कौन्सिलकडे दाद मागितली. २३ ऑगस्ट १९०२ रोजी त्यांच्या अर्जाचा विचार होऊन तो फेटाळला गेला. ब्राह्मणांनी राजोपाध्ये ह्यांना पोलिटिकल एजंटकडे पुनर्विचारासाठी

अर्ज करावयास लावला. १९०२ साली सप्टेंबरच्या 'ग्रंथमालेत' विजापूरकरांनी न्यायाधीश मंडळाची नेमणूक करण्याविषयी एक सूचना केली. त्यात डॉ. भांडारकर, प्रा. काथवटे, प्रा. वै. का. राजवाडे, आर्ते, आगाशे, प्रा. भडकमकर, प्रा. पेंडसे ह्यांपैकी दोन, दोन श्रुती-स्मृती पुराणतज्ज्ञ शास्त्री आणि दोन युरोपियन (संस्कृतज्ज्ञ मिळाले तर ठीक) असे पंडित असावे व ह्या सहा मंडळींनी दिलेला निर्णय क्षेत्रस्थ ब्रह्मवृंद व श्री जगद्गुरू यांचेपुढे ठेवावा व त्यांचे आज्ञापत्र व्हावे असे म्हटले.

मध्यंतरी महाराजांना धाक दाखविण्यासाठी गोष्टी पसरविण्यात आल्या की, ब्राह्मणांनी राज्याचा त्याग करताच राजांची राज्ये नष्ट झाली आहेत. वेदोक्त पद्धतीचा हट्ट धरल्यामुळे शिवाजी व त्याचा मुलगा हे अकाली मृत्युमुखी पडले. ज्या ब्राह्मणाने म्हणजे गागाभट्टाने वेदोक्त विधी केला त्याचाही शेवट फार वाईट रीतीने झाला. तरीही महाराजांनी आपला निश्चय ढळू न देता राजघराण्यातील व्यक्तींचे धार्मिक विधी वेदोक्त पद्धतीने करावयास जे ब्राह्मण तयार होणार नाहीत, त्यांना दरबारातून वेतन मिळणार नाही असा हुकूम सोडला. त्यामुळे काही जोशी वेदोक्त पद्धतीने धार्मिक संस्कार करण्यास तयार झाले. ज्यांनी तसे विधी केले त्यांच्यावर ब्राह्मणांनी बहिष्कार टाकला. हेरले गावच्या ब्राह्मण कुलकर्ण्याने तर कोल्हापुरच्या ब्राह्मणांचा जाहीरनामा ग्रामस्थांना अति उत्साहाने वाचून दाखविला. त्याला आपल्या वतनास मुकावे लागले. त्याचे दिवाणी व फौजदारी अधिकार काढून घेण्यात आले.

१९ फेब्रुवारी १९०३ रोजी पोलिटिकल एजंट कर्नल फेरिस ह्यांनी राजोपाध्याच्या प्रकरणाचा निर्णय केला. काही विशिष्ट प्रकारची नोकरी करण्यासाठी हे इनाम दिले होते. ती नोकरी करण्यास राजोपाध्ये नाकबूल झाले होते. त्यामुळे हे इनाम सरकारजमा करण्यात आले होते. १८४७ साली अर्जदाराच्या एका पूर्वजाला कुलगुरू ह्या नात्याने काम करण्यासाठी हे इनाम दिले आहे, अशी कबुली दिली होती. त्यावर राजोपाध्यांनी मुंबई सरकारकडे आपले प्रकरण पुनर्विचारासाठी पाठविले. १६ ऑक्टोबर १९०३ रोजी मुंबई सरकारने त्याबाबतीत त्यांच्या विरुद्ध निर्णय दिला. राजोपाध्यांची निराशा झाली. पुढे १९०५ सालच्या मे महिन्यात हिंदुस्थान सरकारच्या ठरावाने त्या प्रकरणास मूठमाती दिली. सर्व धमक्या वाया गेल्या. त्यामुळे ब्राह्मण विरोधकांच्या पक्षाला काही काळ पक्षाघात झाला.

राजाला धार्मिक बाबतीत निर्णय देण्याचा अधिकार होता. सातारा व कोल्हापूर येथील राजांनी दिलेले निर्णय ब्राह्मणांनी पूर्वी मान्य केलेले होते.

राजोपाध्यांची जागा महाराजांनी जोशीरावांच्या घराण्याला दिली. त्याबद्दल दरमहा वेतन २५० रुपये होते.

अगदी हताश होऊन प्रोफेसर विजापूरकर यांनी सन १९०५ मधील मे महिन्याच्या 'ग्रंथमालेत' त्याविषयी म्हटले की, "आमच्या वाचकांस एका सुरेख पण अपुऱ्या ग्रंथाचे कर्ते या नात्याने परिचित असलेले आमचे मित्र श्री. आप्पासाहेब राजोपाध्ये यांचे घराणे सपशेल बसल्याचे पूर्वी कळले आहेच. या संबंधात सर्व हकीकत वेळोवेळी कळविलीच आहे. मुंबई सरकारने श्रीमन्महाराजांचे पूर्ण अखत्यारीतील कामात आपण हात घालीत नाही, असे दर्शविले, तेव्हाच वास्तविक या प्रकरणाचा निकाल लागला. परंतु हिंदुस्थान सरकार या कामी काही निराळा सल्ला देईल अशी आशा होती. परंतु तीही निष्फळ झाल्याकारणाने १९०५ चा मे महिना १९०२ च्या ऑक्टोबरप्रमाणे येथील बहुतेक ब्राह्मणवर्गास उदास वाटला. त्या वेळचा आशातंतू तुटून आता या प्रकरणाची इतिश्री झाली.[१९]

ठेविले अनंते तैसेची राहावे ।
चित्तीं असो द्यावें समाधान "

वेदोक्त प्रकरणाची शेवटची लढाई मात्र विशेष रंगली. त्यात शाहू महाराज आणि संकेश्वरचे शंकराचार्य हे मुख्य प्रतिस्पर्धी होते. श्रीआद्यशंकराचार्यांच्या पासून ४४ वे स्वामी विद्याशंकर ह्यांनी उत्तर हिंदुस्थानचा प्रवास केल्यानंतर करवीर येथील राजा श्रीकृष्णराय याच्या आग्रहावरून करवीरक्षेत्री मठ स्थापन केला. संकेश्वर येथेही काही दिवस करवीरकर जगद्गुरू राहात असत. करवीरकर राजांनी मठाला इनाम दिलेले होते. छत्रपतींनीही इनाम उत्पन्न दिलेले होते. १८६३ च्या करारान्वये असे ठरले होते की, स्वामींनी शिष्यांच्या नेमणुकीस कोल्हापूर दरबारची मंजुरी घेतली पाहिजे, आणि मठाच्या जमिनी व इनामे गहाण ठेवायची नाहीत. वेदोक्त प्रकरण उद्भवले तेव्हा गुरुस्वामी वासुदेवशास्त्री भिलवडीकर हे शंकराचार्य करवीरपीठावर अधिष्ठित होते. त्यांनी कोल्हापुरातील मठाची मालमत्ता उधळली होती.

. ५ .

उतारवय झाल्यावर भिलवडीकर स्वामींनी काशीनाथबुवा ब्रह्मनाळकर यांना २३ फेब्रुवारी १९०३ रोजी शिष्य केले. त्यांचे दुसरे शिष्य अथणीकर शास्त्री

---

१९ ग्रंथमाला, वर्ष १२, अंक २, पृ. २.

हे त्यांच्या श्रीसंकेश्वर पीठाची व्यवस्था पाहात. पुढे शंकराचार्य वासुदेवशास्त्री भिलवडीकर ह्यांनी आत्माराम जोशी आणि आत्माराम शास्त्री पित्रे असे आणखी दोन शिष्य केले. गंमत अशी की, ब्रह्मनाळकर स्वामींची नेमणूक करतेवेळी भिलवडीकर स्वामींनी सांगलीच्या पटवर्धनांचा सल्ला घेतला. कोल्हापूर दरबारची मंजुरी घेतली नाही.

अशा वेळी कोल्हापुरचे वेदोक्त प्रकरण शंकराचार्यांकडे निर्णयासाठी ब्रह्म-वृन्दांनी पाठविले. महाराजांचे क्षत्रियत्व गुरुशिष्यांना मान्य नव्हते. कोल्हापूर दरबारची मंजुरी न घेतल्यामुळे ब्रह्मनाळकर स्वामींची नेमणूक महाराजांनी रद्द ठरविली आणि उत्पन्न जप्त केले.

ब्रह्मनाळकर स्वामींवर टिळकांची मर्जी होती. एकतर मठाची मत्ता पुणे येथील एका पुढाऱ्याकडे गहाण होती व दुसरे असे की, पुणेरी नियंत्रणाखाली ती धार्मिक सत्ता आली होती. पुणेरी बळाने नि विचाराने प्रेरित होऊन ब्रह्मनाळकर स्वामींनी आपल्या पूर्वाश्रमीची मुलेबाळे व जामातादी गोतावळ्यासहित कोकणात दौरा काढला. ब्रह्मनाळकर स्वामी हे शाहू महाराजांचे क्षत्रियत्व नाकारतात हे पाहून, महाराष्ट्रातील ब्राह्मणांनी स्वामींची शहराशहरांतून पालखीतून मिरवणूक काढली. स्वागत, पाद्यपूजा, प्रवचने व देणग्या ह्यांचा त्यांच्यावर वर्षाव करण्यात आला. पुण्यात टिळकांनी ब्रह्मनाळकरांचा भव्य सत्कार केला. संकेश्वर पीठाधिष्ठित श्रीशंकराचार्य म्हणूनच नव्हे, तर एक ब्राह्मणवीर, कोल्हापूरच्या छत्रपतींचा शूद्र नृपती म्हणून धिक्कार करणारा धर्मवीर म्हणून ब्रह्मनाळकरांचा महाराष्ट्रात जयजयकार झाला. महाडला गेल्यावर त्यांनी पेशवाईची म्हणजे ब्राह्मणी राज्याची पुन्हा एकदा कायस्थांना आठवण करून दिली. त्यांनी चांद्रसेनीय कायस्थ प्रभू मंडळींना, पुराणोक्त पूजा कराल तर पूजेस येईन, असे फर्मावले. कायस्थांनी त्यांना क्षत्रियाला शोभेल असा दणका दिला.

महाड येथे ह्या नवशंकराचार्यांनी शिवाजी महाराजांवर दुगाण्या झाडल्या. ते म्हणाले, " शिवाजी महाराज क्षत्रिय नसता गागाभट्टास लाच देऊन त्याकडून क्षत्रिय म्हणवून घेतले. त्यामुळे त्यांच्या वंशाचा अधःपात झाला. " एका बाजूने टिळकांनी शिवाजी उत्सव करावयाचा व दुसऱ्या बाजूने नव शंकराचार्यांनी असे अपवित्र उद्‍गार काढावयाचे असे ते दिवस होते ! 'श्री' आता नुसतेच ' निःशस्त्र दंडधारी ' न राहाता परशुरामी परशू धारण करते झाले. ' सुबोध पत्रिके ' ने आपल्या २८ फेब्रुवारी १९०४ च्या अंकात म्हटले की, " ( स्वामींनी ) त्यांनी

महाडास जे व्याख्यान दिले ते वाचून पाहाता त्यावरूनच त्यांचा दुराग्रही स्वभाव व धर्ममते याविषयी अनुदार वृत्ती, इतिहासज्ञानाचा अभाव, प्रस्तुत धर्मविषयक चळवळीविषयी अक्षम्य अज्ञान इत्याद्यनेक गोष्टी दिसून येतात " [२०]

स्वामींनी आपण सर्व जातींचे गुरू आहोत हे विसरता कामा नये, स्वामींचे वर्तन समबुद्धीचे नाही, असेही ' सुबोध पत्रिके 'ने म्हटले आहे. नवशंकराचार्य ब्रह्मनाळकर ही एवढीच गोष्ट करून थांबले असते, तर त्यांना ब्राह्मणांकडून मिळालेला मान नि धन ह्यांवर संतुष्ट राहता आले असते. परंतु गुरू भिलवडीकर स्वामी ह्यांनी कीर्तीचा नसला तरी कांचनाचा वाटा मागताच ह्या नवशंकराचार्यांनी आपल्या स्वार्थाचा फणा गुरूवर उगारला. गुरुशिष्याची कांचनासाठी लढाई जुंपली. टिळकांनी मध्यस्थी केली. ती वाया गेली. ' कोल्हापुरच्या प्रकरणाचा निकाल करण्यास मला तुम्ही अधिकार द्यावा, ' अशी भिलवडीकर स्वामींनी ५ डिसेंबर १९०३ रोजी ब्रह्मनाळकर शंकराचार्यांना विनंती केली. ते दाद देईनात. त्यामुळे कोल्हापुरपासून दोन मैल अंतरावर असलेल्या कोळंबी गावी भिलवडीकर स्वामींनी महाराजांना पोषाख देऊन वेदोक्त पद्धतीने आशीर्वाद दिला. त्यावरून त्यांना महाराजांचे क्षत्रियत्वाचे हक्क मान्य झाले होते असे दिसले.

परंतु त्या गोष्टीला ब्रह्मनाळकर स्वामींची संमती मिळाली पाहिजे, असे महाराजांनी निक्षून सांगितले. कोल्हापुरमधील मठाचे उत्पन्न हस्तगत करण्याची स्पर्धा गुरुशिष्यांमध्ये लागली. कोल्हापूर प्रकरणासंबंधी विचार करण्यासाठी संकेश्वर येथे आपणांस भेटावे, अशी भिलवडीकर स्वामींनी शंकराचार्य ब्रह्मनाळकर ह्यांना १ मे १९०५ रोजी विनंती केली. तो डाव उलटून टाकण्यासाठी ब्रह्मनाळकर स्वामींनीच महाराजांशी परस्पर बोलणी सुरू केली. कारण हिंदुस्थान सरकारने १९०५ सालच्या मे महिन्यात राजोपाध्याच्या प्रकरणात करवीर दरबारच्या बाजूने निकाल दिला होता. कोल्हापुरच्या मठाची संपत्ती बळकाविण्यात त्यांनी आता गुरूवर कुरघोडी केली. १० जुलै १९०५ रोजी भोसले हे क्षत्रिय असून वेदोक्त विधी करण्याचे त्यांना पूर्ण अधिकार आहेत, असा ब्रह्मनाळकरांनी निर्णय जाहीर केला. तो निर्णय पाहून बिचारे विजापूरकर आनंदमिश्रित लाजेने गहिवरले ! जुलै १९०५ च्या ' प्रथमाले 'च्या अंकात ' गतं न शोच्यम् '. आता परमेश्वरकृपे ते

२०. ठाकरे, प्रबोधनकार के. सी., 'ग्रामण्याचा साद्यंत इतिहास अर्थात् नोकरशाहीचे बंड', पृ. १४०.

सर्व सुरळीत चालण्याचा समय आला आहे, असे म्हणून त्यांनी खालसा केलेली उत्पन्ने ज्यांची त्यांजकडे चालवून सर्व प्रजाजनांचा दुवा श्रीमन्महाराज छत्रपती सरकार घेतील अशी आशा व्यक्त केली. [२१]

करवीर येथील शंकराचार्यांच्या मठाचे उत्पन्न शंकराचार्यांना मिळू लागले. त्यावर भिलवडीकर स्वामींनी ब्रह्मनाळकरांना शिष्य म्हणून दिलेले अधिकारपत्र रद्द केले, शिष्यस्वामींनी दिलेल्या निकालाची अमलबजावणी होऊ नये असे फर्मान काढले आणि ते शंकराचार्य नाहीत असे जाहीर केले. आपणास जगद्गुरू म्हणून निवड केल्यावर गुरूला आता कोणत्याही प्रकारचा अधिकार राहिला नाही. सर्व अधिकार आपले आहेत, गुरुस्वामींची आज्ञा अस्थानी आहे, असे उलट फर्मान ब्रह्मनाळकरांनी काढले. अशा रीतीने आता एका शंकराचार्यांचे दोन शंकराचार्य झाले. त्याविषयी बिचारे विजापूरकर सात्त्विक उद्वेगाने नोव्हेंबर महिन्याच्या 'ग्रंथमाले'त म्हणतात : "ग्रामस्थ मंडळीचे पहिले व्याघ्रमुख कोणीकडे? शिष्यस्वामींकडे निकालाचे काम द्या म्हणून विनंती काय करतात आणि त्यांनी दिलेल्या निकालाशी नाराजपणा काय दाखवितात. शिष्यस्वामींचे तरी, पहिले बोलणे किती जोराचे, उत्पन्नाबद्दल केवढी बेफिकीरी आणि पुढे गुपचिप कोल्हापूर मुलुखात एका खेड्यात बसून लुंग्यासुंग्या कारकुनाच्या खेपा किंवा खेटे याला भुलून, दिला तोच निकाल मुद्देसूद विचाराने समर्थन करण्याजोगा असताना अनेक गोष्टी नमूद करण्याचे सोडून देऊन पद्धतशीर रीतीने आज्ञापत्रे पाठवून काम करण्याचे बाजूस सारून घाईघाईने प्रकरण मिटवितात."

विजापूरकर पुढे म्हणतात : "धर्माभिमानी म्हणविणाऱ्या पुणेकर पत्रांचीही त्रेधा उडून गेली आहे. ज्यांनी वेदोक्त मागण्याबद्दल ते अशास्त्र म्हणून महाराजप्रभृती मंडळाची टर उडविली व शिष्य स्वामींचे पहिल्या रंगावर जाऊन त्यांचे देव्हारे माजविले, त्यांपैकी एकाने मूकभाव धारण केला व दुसऱ्याने टोपी फिरविली. मिळून खरे बोलावे तरी चोरी, खोटे बोलावे तरी पंचाईत, असा सर्वांचा सावळा गोंधळ होऊन गेला." [२२] शिष्यस्वामींचे देव्हारे माजविणारे 'केसरी' कार नि 'काळ' कर्ते होते हे सांगावयास नकोच. परंतु स्वतः विजापूरकर ह्या प्रकरणी जे सोज्वळ रूप धारण करतात ते खोटे आहे. महाराजांना उद्देशून त्यांनीच 'राक्षसी वाणी' असे म्हटले नव्हते का?

२१. ग्रंथमाला, वर्ष १२, अंक ४, पृ. १.
२२. ग्रंथमाला, वर्ष १२, अंक ८, पृ. ३–५.

त्याकाळी 'धर्म' हे साप्ताहिक चालविणारे काशीनाथ वामन ऊर्फ भाऊ-शास्त्री लेले यांनी 'पतित ब्रह्मनाळकर व कृष्णानंद' ह्या स्फुटात म्हटले की, "काशिनाथपंत ब्रह्मनाळकरांना जगद्गुरूंचे आज्ञापत्र प्रसिद्ध झाल्याप्रमाणे जरी सांप्रत सर्वांनी सोडले आहे, तरी काशीकर कृष्णानंद त्यांचे पाठीराखे असून मुंबई-तील राजारामपंत भागवतांचीही त्यांना कुमक होण्याचा संभव आहे. सांप्रत हे राजाराम शास्त्री भागवत मुंबईहून निघून बेळगाव मुक्कामी मराठ्यांच्या मुंजी लावण्याकरिता गेले असून द्विजेतर रा. आबाजी रामचंद्र सावंत ह्यांच्या घरी उतरले आहेत व त्यांचा भोजनादी व्यवहारही मराठ्यांच्या घरीच होत असतो, असे कळते. रा. रा. भागवतासारख्यांची कुमक काशिनाथपंतांना झाल्यास फार उत्तम होईल. ह्यास्तव, जरी सर्वांनी सोडिले आहे, तरी रा. रा. भागवत व कृष्णानंद या उभयता पाठिराख्यांच्या मदतीने ब्रह्मनाळकरांचे दिवस सुखाने निघण्यास हरकत नाही."[२३]

ह्या संधीस, राजारामशास्त्री ह्यांनी 'क्षत्रियांची मूळची पायरी' या लेखात मराठयांना गायत्रीचा अधिकार आहे असे म्हणताच, भाऊशास्त्री ह्यांनी 'धर्मा' त लिहिले की, "शिवाजी क्षत्रियेतर म्हणजे शूद्र होता."[२४]

ह्या दोन्ही दर्पोक्तींवरून भाऊशास्त्र्यांसारख्या धर्ममार्तंडांनी अन्यायी रूढींचे संवर्धन करून खरा धर्म कसा मारला हे सुज्ञांना सांगावयास नको. धर्म म्हणजे मनुष्याने मनुष्याशी माणुसकीने वागणे. तो धर्म त्यांच्या गावीही नव्हता. अशा शास्त्र्यांखेरीज धर्माभिमानी शास्त्र्यांचा आणखी एक प्रकार आहे. त्यांच्या धर्माभिमानाची जागृती झालेली असते ती ख्रिश्चन नि मुसलमान धर्मांच्या प्रचारामुळे. त्यांच्या धर्मात स्वधर्मीयांची सामाजिक समता नि बंधुता गृहीत धरलेली असतेच असे नाही. त्यातील खरा धर्म जाऊन पोकळ अभिमान मागे राहिलेला असतो.

वेदोक्त प्रकरणात सर्वच ब्राह्मणांनी महाराजांच्या वेदोक्ताच्या अधिकारास विरोध केला असे नाही. कुरुंदवाडचे (थोरले पाती) श्रीमंत बाळासाहेब ह्यांनी स्वामींच्या असमंजस धोरणाचा निषेध केला. काही ब्राह्मणांनी शंकराचार्यांची बाजू चूक आहे असे वाटत असतानासुद्धा मौन पाळले होते.

वेदोक्त प्रकरणाचा उल्लेख करून टिळकचरित्रकार साहित्यसम्राट केळकर

२३. संपादिका, भागवत, दुर्गा, कै. राजारामशास्त्री भागवत यांचे निवडक लेख, पृ. २७४.

२४. कित्ता, पृ. २७५.

ह्यांनी टिळकचरित्रात महाराजांनाच वृथा दोष दिला आहे. वेदोक्त प्रकरणीच नव्हे तर आयुष्यात आपल्या बंधूची अव्याहतपणे नि अव्यभिचारी भक्तीने साथ करणाऱ्या बापूसाहेब कागलकरांनाही दोष दिला आहे. वेदोक्त केल्याने क्षत्रिय व ब्राह्मण एक जात होणार होते असे नाही, पण अधिकाराची अन् सत्तेची अरेरावी महाराजांनी थोडी कमी गाजविली असती, तर वादाला इतके विकृत स्वरूप आले नसते असेही केळकरांनी म्हटले आहे. हाच सल्ला वेदोक्त प्रकरणावर प्रक्षोभक अग्रलेख लिहिणाऱ्या टिळकांना देण्याचे त्यांना धैर्य झाले असते, तर वादाला विकृत स्वरूप आले नसते. नेहमीच सुवर्णमध्याचे अवलंबन करणारे न्यायप्रिय नेते म्हणून महाराष्ट्रात गौरव पावलेल्या केळकरांचे ह्या प्रकरणी धोरण कसे होते, हे त्यांच्या लिहिण्याच्या वरील झोकावरून कळून येते. " मराठ्यांची ही मागणी न्याय्य अगर अन्याय्य कशीही असली तरी आजपर्यंतच्या परंपरेच्या व वहिवाटीच्या सर्वस्वी विरुद्ध व निव्वळ दांडगाईची होती " असे सांगून केळकर पुढे म्हणतात : " सर्व जाती मोडून एक जात करावी असे तोंडाने म्हटले आणि इष्ट आहे असे प्रतिपादिले तरी ते शक्य आहे की नाही हा प्रश्न उरतोच व आपले सर्व आयुष्य व राज्यसत्तेचे बळ खर्च करून जातिभेद मोडण्याची सामाजिक सुधारणा करण्याचा प्रयोग छत्रपतींनी मौजेखातर करून पाहिला. "[२५]

महाराजांनी तो प्रयोग प्रामाणिकपणे केला, हे ते मान्य करीत नसले, तरी सर्व आयुष्य व राज्यसत्तेचे बळ खर्च करून जातिभेद मोडण्याची सामाजिक सुधारणा करण्याचा प्रयोग करणारा छत्रपती हे केळकरांनी महाराजांना दिलेले दूषण महाराजांचे भूषण ठरले आहे, हे नवमहाराष्ट्रास मी सांगितले पाहिजे असे नाही. महाराजांना हिंदुसमाज व्यवस्थेत असलेली जातिभेदाची पद्धतीच नको होती. ह्याविषयी केळकरांनी टिळकचरित्रकार म्हणून साहजिकच वैषम्य व्यक्त केले आहे.

ह्या वादात स्वतः टिळकांनी व्यक्तिविषयक रीतीने कोल्हापूर सरकारविरुद्ध काहीच लिहिले नाही असे जे डोंगरे ह्यांनी चिरोल कमिशनपुढे साक्ष देताना म्हटले होते, त्याची केळकरांनी वाचकांना आठवण दिली आहे. टिळकांनी व्यक्तिविषयक महाराजांविषयी काही लिहिले नाही हा त्यांचा मोठेपणा आहे. त्याबरोबर हेही लक्षात ठेवले पाहिजे की, टिळक ताईमहाराज प्रकरणात गुंतले होते. त्या प्रकरणाचे

---

२५. केळकर, न, चिं; समग्र केळकर वाङ्मय, १ टिळकखंड, सन १९३८, पृ. ८७१

धागे कोल्हापुरात गुंतलेले होते, हे लक्षात ठेविले म्हणजे टिळकांनी व्यक्तिविषयक का लिहिले नाही ते कळेल.

महाराज सयाजीराव गायकवाडांचे चरित्रलेखक दाजी नागेश आपटे ह्यांनी वेदोक्त प्रकरणाविषयी लिहिताना म्हटले आहे की, " बडोदे राज्याबाहेर इतर काही ठिकाणी हा विवेक न ठेविला गेल्यामुळे, तेथे व्याधीपेक्षा औषध अधिक भयंकर अशी स्थिती झाली. तेथे सामाजिक स्थैर्य आणण्यासाठी योजिलेले उपाय इतके क्षोभकारक होते की, त्या योगाने जातिद्वेष, जुलूम व छळणूक यांची मात्र वाढ झाली. परंतु महाराजांनी ( बडोदे ) अशा अविचारांच्या आधीन न होता आपल्या कार्यांचे धोरण शांतपणाचे व विवेकाचे ठेविल्यामुळे बडोद्यास ही सुधारणा थोड्या वेळात सर्वमान्य झाली; इतकेच नव्हे, तर ती सुधारणा होती या गोष्टीची जाणीवही लोकांत उरली नाही, इतकी ती काळाने स्वाभाविक वाटली. "[२६]

आपट्यांचे बडोदे सरकार हे महाराष्ट्राबाहेर होते. तेथे पूर्वी पेशवाईत उद्भवली तशी कडवट ग्रामण्ये उद्भवली नव्हती आणि तेथे ज्ञातिछळही झाला नव्हता. येथे कोल्हापूर नि पुणे अशी ही जुनी लढाई नवमहाराष्ट्रात पुन्हा झाली. येथे पुणेरी ब्राह्मणी वृत्तीचा पराभव झाला.

ह्या वेदोक्त प्रकरणात वेदोक्त विरोधक ब्राह्मणांची बाजू या-ना त्या स्वरूपात घेणाऱ्या महाराष्ट्रातील विचारवंतांचा येथे उल्लेख केला असता योग्य होईल.

कोल्हापुरातील ब्राह्मणांची ही आग्रही अन् आक्रस्ताळी वृत्ती तीव्र करावयाला विजापूरकरच कारण झाले अशी महाराजांची समजूत होती व ती बव्हंशी खरीही होती, असे विष्णू गोविंद विजापूरकर यांच्या चरित्रात प्रसिद्ध चरित्रकार नि कोशकार श्री. गं. दे. खानोलकर ह्यांनी म्हटले आहे.[२७] अण्णासाहेब तथा विष्णु गोविंद विजापूरकर हे राजाराम महाविद्यालयात संस्कृतचे प्राध्यापक होते. ते एका ब्राह्मण शिक्षकाचे चिरंजीव, नामदार गोखल्यांचे स्नेही नि सहाध्यायी होते. ते राष्ट्रीय चळवळीला कोल्हापुरात पाठिंबा देत असत. त्यांनी श्रीशाहू छत्रपतींच्या राज्यारोहणाच्या समारंभाच्या वेळी ( एप्रिल १८९४ ) " ग्रंथमाला " नावाचे मासिक मोठ्या उत्साहाने सुरू केले. 'ग्रंथमाले'वर ब्रीदवाक्य होते :

---

२६. आपटे, दाजी नागेश, श्री महाराज सयाजीराव गायकवाड ( तिसरे ) यांचें चरित्र खंड २ रा, पृ. ७२४–७२५.

२७. खानोलकर, गं. दे., विष्णू गोविंद विजापूरकर ( चरित्र ), पृ. २७.

स्वदेश, स्वधर्म, स्वभाषादिकांचा । जगी मान व्हावा असा हेतु साचा ॥ '

देशबांधवांमध्ये ज्ञानप्रसार हेच उत्तम गुणनिर्मितीचे साधन होय, असा ग्रंथमालेचा विश्वास होता. राष्ट्रीय वृत्तीचा प्रसार करण्यासाठी त्यांनी ' समर्थ ' नावाचे साप्ताहिक ६ जुलै १८९८ साली सुरू केले. विजापूरकर ग्रंथमालेत ' गुरुजी ' तर ' समर्था ' मध्ये ' राजकारणी ' अशी ही त्यांची दोन रूपे होती. ' समर्था 'चे संपादक प्राणी नावाचे गृहस्थ नामधारी संपादक होते. पण त्यांचे धनी, स्फूर्तिदाते नि मार्गदाते सर्व काही विजापूरकर हेच होते. वेदोक्त प्रकरणाविषयी विचार करताना त्यांच्या ' गुरुजी ' पदापेक्षा ' राजकारणी ' पदाचा विचार अधिक केला पाहिजे. वेदोक्ताला विरोध करणारे विजापूरकर ह्यांची विचारसरणी कशी होती हे सांगितले म्हणजे त्यांचे मनोगत नि अंतरंग ह्यांवर प्रकाश पडेल.

विजापूरकरांनी आधुनिक वंद्य विभूतींची नावे समर्थ विद्यालयाच्या प्रार्थनेत दिली आहेत, ती अशी :—

ज्ञानेश्वर नामदेव एकनाथ जनार्दन ।
तुकाराम निळोबा हे पांच साधु सदा स्मरा ॥

त्याचप्रमाणे रामदासांवर एक स्वतंत्र श्लोक आहे. निबंधमालाकार विष्णुशास्त्री चिपळूणकर, बृहस्पतितुल्य रानडे, गीतारहस्यकार टिळक ह्यांच्यावर प्रत्येकी एक संस्कृत श्लोक व विजापूरकरांनी स्वतःवरही एक संस्कृत श्लोक प्रार्थनेत समाविष्ट केला होता. रानडे आणि टिळक ह्यांच्याबरोबर आगरकरांचे नाव शोभले नसते असे दिसते, मग बाळशास्त्री जांभेकर, शंकरशेट, भाऊ दाजी लाड, तेलंग हे पुरुष त्यांच्या विद्यार्थ्यांसाठी आदर्श वाटले नाहीत ह्यात आश्चर्य नाही. शिवाजी महाराज त्यांचे वंदनीय राष्ट्रपुरुष होण्याचा प्रश्नच नव्हता. छत्रपतींना शूद्र ठरविण्याची त्यांची मनीषा निष्फळ ठरली होती. विजापूरकरांना त्यांचे भक्तगण ' आधुनिक रामदास ' म्हणत. खरोखर त्यांनी शेवटपर्यंत वर्णवर्चस्ववादी रामदासांचा बाणा म्हणून काही सोडला नाही. राष्ट्रीय शिक्षणासंबंधी विचार करताना विजापूरकर म्हणाले, " साक्षरता पसरविण्यासाठी उच्च शिक्षणाची गळचेपी करणे आणि अंत्यजादी वर्गाचा दुवा घेण्यासाठी ब्राह्मणादी वर्गाच्या प्रगतीच्या गाड्याला खीळ घालणे हे प्रकार " धूर्त व आपमतलबी होत. [२८]

२८. कानडे, रा. गो., गुरुवर्य विष्णु गोविंद विजापूरकर ( चरित्र, कार्य व आठवणी) भाग २ रा, पृ. १७२.

राष्ट्रीय शिक्षणच का घ्यावे हे विशद करताना प्रो. विजापूरकर म्हणतात, " सरकारी शाळांत व राष्ट्रीय शाळांत अंतर काय असे विचारणारांनी बळजबरीने धर्म मोडला जातो ती सरकारी शाळा आणि चातुर्वर्ण्य व पुनर्जन्म या मूळ तत्त्वांवर अवलंबून असणाऱ्या सनातन धर्माप्रमाणे चालगारी ती राष्ट्रीय शाळा असे एक भेदक लक्षण पुढे लक्षात धरावे. "[२९]

राष्ट्रीय शिक्षणप्रवर्तक अशा ह्या आचार्यांच्या मनावर नि ध्येयावर अधिक टीका करण्याची आवश्यकता नाही. त्यांच्या चरित्रकारांनीच त्यांच्या या राष्ट्रीय शिक्षणाच्या धोरणावर झगझगीत प्रकाश टाकला आहे. समर्थ विद्यालयात आचरिला जाणारा वर्णभेद, जातिभेद व कर्मठपणा पाहून व अनुभवून विजापूरकर यांचे चरित्रकार श्री. गं. दे. खानोलकर ह्यांनी विजापूरकरांच्या ह्या वृत्तीचा कडक शब्दात निषेध करून म्हटले आहे की, " परस्परांच्या मनोभावना दुखविणारा जातिभेद व स्पृश्यास्पृश्यभेद राष्ट्रीय शिक्षण देऊ इच्छिणाऱ्या संस्थांनी कायम ठेवणे, हे राष्ट्रहितवर्धक कार्य नसून राष्ट्रविघातक कार्य आहे. " आणि त्यांच्या ' समर्थ विद्यालयाला ' राष्ट्रीय विद्यालय न म्हणता त्याला ' द्रविड ब्राह्मण विद्यालय ' हे नाव शोभले असते, असेही त्यांनी म्हटले आहे.[३०] असे होते हे चातुर्वर्ण्यवादी, वर्णवर्चस्ववादी नि ' राष्ट्रीय शिक्षणाचे आचार्य ' विजापूरकर ! शाहू छत्रपतींना विरोध करणारे कर्मयोगी नि संतरामदासानुयायी ! !

' केसरी ' चे एक माजी संपादक माधवराव बोडस ह्यांनी वेदोक्त प्रकरणी पुरोहितांची बाजू घेऊन चातुर्वर्ण्याची महती गायिली. टिळकांच्या गुरुस्थानी चमकणारे श्री. अण्णासाहेब पटवर्धन यांनी चातुर्वर्ण्याचा पुरस्कार केला आहे. ' वैदिक संस्कृती नि वैदिक राष्ट्रीयत्व ही ठळकपणे उमटून पडतील अशा रीतीने चातुर्वर्ण्यं राखण्याची शपथ घेतली पाहिजे, ' अशी पटवर्धनांची विचारसरणी होती.

राजारामशास्त्री भागवत ह्यांनी वेदोक्त चळवळीत भाग घेतला म्हणून त्यांच्यावर शिवरामपंत परांजपे ह्यांनी हल्ला चढविला. वि. का. राजवाडे ह्यांनीसुद्धा भागवतांना टोमणा मारला आहे. डॉ. केतकरांनी शास्त्रीबोवांच्या वेदोक्त चळवळीविषयी राजवाड्यांचीच री आपल्या ' संकीर्ण निबंधात ओढली आहे. '

---

२९. कानडे, रा. गो., गुरुवर्य विष्णु गोविंद विजापूरकर ( चरित्र, कार्य व आठवणी ) भाग २ रा, पृ. १७२.

३०. खानोलकर, गं. दे., विष्णु गोविंद विजापूरकर ( चरित्र ), पृ. ४७–४८.

राजारामशास्त्री भागवत नि पुढे स्वातंत्र्यवीर सावरकर हे वेदोक्ताचा अधिकार सर्व हिंदूमात्रांना आहे असे प्रत्यक्ष कृतिपूर्वक दाखविणारे दोन समाजक्रांतिकारक होते, हे येथे नमूद करणे उचित होईल.

ह्या बाबतीत श्री. जयप्रकाश नारायण ह्यांनी ब्राह्मण हा समाजक्रांतिकारक होऊ शकत नाही, असे जे म्हटले आहे ते, राजारामशास्त्री नि सावरकर हे अपवाद सोडता किती यथार्थ आहे हे पटते. जयप्रकाश आपल्या 'समाजवादच का?' ह्या ग्रंथात म्हणतात : "मला कोणी म्हणतील की प्राचीन काळच्या ब्राह्मणांचे उदाहरण पाहा की, ब्राह्मणांनी कोणती कामगिरी बजावली? धार्मिक व नैतिक पाठिंबा देऊन चालू समाजव्यवस्था त्यांनी अविच्छिन्न राखली. समाजव्यवस्थेला धोका पोचत नसला की हवी ती विचाराची बंडखोरी ब्राह्मणवर्ग चालू देई. परंतु सामाजिक सुधारणांच्या प्रत्येक चळवळीला ब्राह्मणवर्गाने कसून विरोध केलेला आहे. समाजातील विषमता मऊ, विनबोचक व्हावी म्हणून ब्राह्मणांचे प्रयत्न असत, ही समजूत चुकीची आहे. उलट सामाजिक भेद दृढ आणि कठोर व्हावेत अशीच त्यांची शिकवणूक होती. दानाची महती त्यांनी गायिली. पण दान म्हणजे वरिष्ठ वर्गाची प्रतिष्ठा वाढविण्याचे उत्कृष्ट साधन आहे. ही माझी विधाने बंडखोर ब्राह्मण व्यक्तींना उद्देशून नसून ती ब्राह्मणवर्गाला उद्देशून केलेली आहेत."[३१]

वेदोक्ताधिकाराची चळवळ चालविणाऱ्या महाराजांनी ती मोठ्या धिम्मेपणाने पण चिकाटीने चालविली. विजापूरकर म्हणतात त्याप्रमाणे 'त्यांनी कष्ट केले, हाल सोसले'[३२] आणि आपले तेज नि नेतृत्व सिद्ध केले. आपल्या मनोदेवतेस साक्ष ठेवून स्वीकृत कार्य तडीस नेण्यासाठी संकटे, विपत्ती, हालअपेष्टा सोसून परिस्थितीवर मात करीत करीत कार्य तडीस नेतो तोच खरा धीरपुरुष. परिस्थितीचा नि अंध परंपरेचा गुलाम न बनता परिस्थितीला यथाशक्ती, यथाबुद्धी वळण लावण्यासाठी प्रयत्न करण्यात जो पुरुषार्थ मानतो तोच थोर पुरुष होय.

. ६ .

'वेदोक्तामध्ये मला काहीच अर्थ दिसत नाही. केवळ ब्राह्मण विरुद्ध जातात म्हणून हा हक्क आम्ही मागतो,' असे भास्करराव जाधव म्हणाले,

---

३१. जयप्रकाश नारायण, समाजवादच का? अनुवादक, ना. ग. गोरे, दुसरी आवृत्ती १९४४, पृ. ७९.

३२. ग्रंथमाला, वर्ष १२, अंक ८, नोव्हेंबर १९०५, पृ. ४.

ह्यावरून ह्या बुद्धिप्रामाण्यवादी नेत्यास त्यातील व्यवहार नि दूरदृष्टी नव्हती असे दिसते. हा सामाजिक नि धार्मिक समतेचा मूलभूत असा प्रश्न आहे, हे त्याकाळी त्यांना तितकेसे उमगलेले दिसत नाही. महाराजांना समाजातील सामाजिक विषमता म्हणजे जातिश्रेष्ठपणा व जन्मजात असमानता काढून टाकून सामाजिक समानता प्रस्थापित करावयाची होती, म्हणजेच चातुर्वर्ण्य काढून टाकून समानता प्रस्थापित करावयाची होती.

परंतु जे भास्कररावांना उमगले नाही, ते रावबहादूर बोले ह्यांना उमजले होते. त्यांनी टिळकांची गाठ घेऊन त्यांना विचारले, " परधर्मीय मॅक्सम्युलरने वेद वाचले तर तुम्हांस चालतात. मग आपल्याच हिंदुधर्मातील ब्राह्मणेतरांना वेद वाचण्याचा व वेदोक्त पद्धतीने धार्मिक कार्ये करण्याचा अधिकार नाही असे आपल्या ' केसरी ' पत्रात कसे निवेदन करण्यात आले आहे ? " त्यावर टिळक म्हणाले, " तो लेख माझ्या अनुपस्थितीत लिहिण्यात आला. " [३३] पण तो लेख त्यांचाच आहे असे साहित्यसम्राट केळकर ह्यांनी टिळक चरित्रात म्हटले आहे. आणि ' लोकमान्यांचे केसरीतील लेख, भाग ४ ' मध्ये तो लेख प्रसिद्धही केलेला आहे.

विजापूरकरांच्या ' विश्ववृत्त ' मासिकात ह्याच चळवळीविषयी वि. का. राजवाडे ह्यांनी म्हटले होते की, " ह्या अनियमित चळवळीचा परिणाम पुढील दहा पाच वर्षांत करवीर इलाख्याबाहेरील महाराष्ट्रात काय होईल याचे चित्र काढणे मोठेसे प्रयासाचे नाही. ह्या चळवळीकडे जर कानाडोळा केला व हिला वेळीच जर हटविली नाही, तर शिष्यपक्ष व गुरुपक्ष असे दोन तट देशभर निष्कारण पडतील. वेदोक्त कर्माची विशेष आस्था नसता ते करण्याचा आव घालणाऱ्या क्षत्रियांचा एक पक्ष होईल व क्षत्रियांचा वेदोक्तभक्तीने वजन व द्रव्यलाभ वाढण्याचा संभव असता तो विसरून वेदोक्तविरोधी ब्राह्मणांचा दुसरा पक्ष होईल. ब्राह्मणांना हाणून पाडणे, हेच ज्यांचे ब्रीद असा बेजबाबदार व अव्यवस्थाप्रिय जो सुधारकांचा एक वर्ग आहे, तो नाचू लागेल व त्यांना किरिस्तावांचे व किरिस्तावतुल्य हिंदूंचे पाठबळ मिळेल. मिळून सर्वत्र सामाजिक बेबंदशाही माजेल व जी नवीन राष्ट्रकार्ये आपण आरंभिलेली आहेत किंवा आरंभू इच्छित आहो, त्यांची अंगेजणी एकजुटीने करणे दुरापास्त होईल. सारांश, कोल्हापुरात जो प्रकार आज दृष्टोत्पत्तीस येत आहे,

३३. अभ्युदय, लो. टिळक जन्मशताब्दि–विशेषांक, पृ.-११.

तोच पुढे मागे सर्व महाराष्ट्रात येईल." [३४] सामाजिक समतेच्या झगड्याला राजवाडे सामाजिक बेबंदशाही म्हणतात. परंतु त्या बेबंदशाहीचे मूळ कशात आहे ह्याचा विचार, इतर बाबतींत मूलगामी पद्धतीने विचार करावा असे म्हणणारे इतिहासाचार्य राजवाडे करीत नाहीत, ह्याचे आश्चर्य वाटते.

खरे म्हणजे चिपळूणकरांनी समाजसुधारकांवर विखारी टीका करून अन म. जोतीराव ह्यांच्यावर कठोर हल्ला करून महाराष्ट्रात दुफळी माजविली आणि टिळकांनी वेदोक्त प्रकरणात दुराग्रही ब्राह्मणांची परंपरावादी नि वर्णवर्चस्ववादी बाजू घेऊन महाराष्ट्र दुभंगून टाकला, असे म्हणणे उचित होईल. ह्या चळवळींचा परिणाम असा झाला की, शाहू छत्रपती हे महाराष्ट्रात ब्राह्मणेतर पक्षाच्या नेतेपदी आरूढ झाले. त्यांचे नेतृत्व १९२२ सालपर्यंत अबाधितपणे चालले.

दुसरा परिणाम असा झाला की, कोल्हापुरहून जी मंडळी इतर ठिकाणी गेली त्यांनी ही स्वाभिमान जागृतीची चळवळ तिकडे नेली. सर्व महाराष्ट्रात एक प्रकारचे नवे विचार, नवे तेज निर्माण झाले. अनेक ठिकाणी ही नवीन केंद्रे निर्माण झाली. महाराज म्हणू लागले की, जे क्षत्रिय असतील त्यांनीही आपल्या हक्काकडे लक्ष दिले पाहिजे. जैन, बौद्ध, लिंगायत, शेणवी आपापली धर्मकृत्ये आपल्याच पुरोहितांकडून करीत, तशीच मराठादी मंडळींने आपल्याच जातीच्या पुरोहिताकडून करावी, असे त्यांना १९०४ पासून वाटू लागले होते. २ मार्च १९०४ रोजी त्यांनी एका पत्रात म्हटले होते की, "आमच्या जातीचेच उपाध्ये नेमून ब्राह्मणांचे जू फेकून द्यावे व शेणवी, जैन, सोनार लोकांप्रमाणे आपलाही उद्धार करून घ्यावा, अशा विचारांचे आम्हांमध्ये काही लोक आहेत." ह्या विचारांचे दृश्य फळ म्हणजे महाराजांनी पुढे सुरू केलेली वैदिक पाठशाळा होय.

धार्मिक विधी वर्णवर्चस्ववादी ब्राह्मण पुरोहितांना बोलाविल्याशिवाय केले पाहिजेत अशी महाराजांची खात्री झाल्यावर, जातिनिष्ठ पुरोहितशाहीचा अंत करण्याचा त्यांनी निर्धार केला. सत्यशोधकांना त्यांनी पाठिंबा दिला. सत्यशोधकांनी सुरू केलेल्या 'पुरोहित शाळे'त जातपातनिरपेक्षबुद्धीने पुरोहित तयार केले आणि त्यांच्याकडून राजवाड्यातील धार्मिक कृत्ये नि राज्यातील इतर गावी विवाह नि धार्मिक संस्कार करवून घेतले. त्यामुळे गावोगावी खळबळ उडाली. ब्राह्मणेतरांना क्षुद्र लेखून त्यांचा तेजोभंग करणाऱ्या जन्मजात पुरोहितशाहीचा कोल्हापूर संस्थानात

३४. खानोलकर, गं. दे., विष्णु गोविंद विजापूरकर ( चरित्र ), पृ. २९-३०.

आणि महाराष्ट्रात काही ठिकाणी जेथे सत्यशोधक चळवळ प्रभावी होती तेथे अंत झाला. जन्मजात पुरोहितशाही विरुद्ध महात्मा फुले ह्यांनी जे बंड पुकारले होते, त्याचा हा विजय झाला होता.

पुढे १९१७ च्या जूनमध्ये डॉ. कुर्तकोटी ह्यांनी महाराजांशी तडजोड केली. आपण सुधारक आहोत असे सर्वांना भासविले आणि कोल्हापूर येथील शंकरचार्यांच्या पीठावर विराजमान झाले. त्यामुळे पुन्हा ब्राह्मण पुरोहितशाही डोके वर काढू लागली. स्वतः शंकराचार्य डॉ. कुर्तकोटी ह्यांनी मठाच्या अंगणात महारमांगांना वेदांतपर व्याख्यान ऐकण्यास मज्जाव केला. महाराजांनी कुलकर्णी वतने रद्द करण्याचा ठराव आणताच 'हा ब्राह्मणांच्या प्रतिष्ठेचा प्रश्न आहे' असे म्हणत म्हणत डॉ. कुर्तकोटी ह्यांनी राजीनामा दिला आणि ते कोल्हापूर सोडून गेले. डॉ. कुर्तकोटी यांनी आपले सनातनी सुधारकाचे सोवळे १९३१ सालपर्यंत पाळले. 'रत्नागिरी येथील पतितपावन मूर्तीची स्थापना श्रीमंत भागोजीशेट कीर ह्यांना वेदोक्ताचा अधिकार नसल्यामुळे त्यांच्या हस्ते होऊ नये' म्हणून डॉ. कुर्तकोटींनी विरोध केला. परंतु बंडखोर सावरकरांनी तो धुडकावून लावला.

'पुरोहितवर्गाची सत्ता नि पत नाहीशी करण्यासाठी निघालेल्या चळवळीचे नेतृत्व ब्राह्मण करणार नाही. एका शरीराचे अवयव एकमेकाशी लढणार नाहीत,' हे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे म्हणणे काही थोड्या व्यक्ती वगळल्या तर यथार्थ वाटते. जन्मजात पुरोहितगिरीची पद्धत बंद करून पुरोहिताचा धंदा सर्व हिंदूंना खुला केला पाहिजे, असे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी म्हटले आहे.[३५] "पुरोहितही, पौरोहित्यास योग्य ती विद्या नि परीक्षा पारंगतेल तर, वाटेल त्या जातीचा असला तरी चालला पाहिजे," "भटास" 'शहा' म्हणू नका, की भटशाही संपली,' असे स्वातंत्र्यवीर सावरकरांचे मत होते.[३६]

ज्याप्रमाणे पुढील काळात डॉ. आंबेडकर नि स्वातंत्र्यवीर सावरकर ह्यांनी पुरस्कारलेली सहभोजनाची चळवळ अनेक वर्षांपूर्वी शाहू छत्रपतींनी रूढ केली होती, त्याचप्रमाणे त्यांनी जन्मजात पुरोहितगिरीची पद्धत बंद करण्याचे धोरणही वीर सावरकर नि डॉ. आंबेडकर यांच्या घोषणेपूर्वीच कृतीत आणले होते. ६ जुलै

३५. Ambedkar, Dr. B. R. Annihilation of Caste with a reply to Mahatma Gandhi, pp. 63, 75.

३६. स्वातंत्र्यवीर सावरकर, जात्युच्छेदक निबंध, पृ. ९२, १६७.

१९२० रोजी त्यांनी ' शिवाजी क्षत्रिय वैदिक पाठशाला ' सुरू केली. त्यात भोई जातीचाही एक विद्यार्थी होता. इतर जातींचेही विद्यार्थी होते. राजवाड्यातील सर्व धार्मिकविधी हेच विद्यार्थी करू लागले. राज्यात त्यांच्या हस्ते वैदिक पद्धतीने विवाह होऊ लागले.

ह्यानंतर दोन वर्षांनी महाराजांनी पाटगाव येथील मौनी मठाच्या पीठावर श्री. सदाशिवराव पाटील ह्यांची १९२१ साली स्थापना केली. ह्या पीठाचे संस्थापक मौनी महाराज नावाचे ब्राह्मणेतर साधुपुरुष होते. मौनी मठाच्या महाराजांकडे शिवाजी महाराज गेल्याचा ९६ कलमी बखरीत उल्लेख आहे. त्या मठाला शिवाजी महाराजांनी काही गावे इनाम करून दिली होती. शाहू छत्रपतींच्या काळी ही गादी रिकामी होती. शाहू महाराजांनी मौनी मठाच्या पीठावर श्री. पाटील ह्यांची नेमणूक करतेवेळी त्यांना क्षात्रजगद्गुरू हे नवीन पद अर्पण केले. त्यावर भास्करराव जाधव नि प्रबोधनकार ठाकरे आदी मंडळींनी क्षात्रजगद्गुरूच्या पीठास विरोध केला. देव आणि मनुष्य ह्यांमध्ये कोणी दलाल नको, तर क्षात्रजगद्गुरूही नको असे त्यांचे म्हणणे होते.

क्षात्रजगद्गुरूंची नेमणूक करतेवेळी महाराजांनी आपले विचार विशद केले होते. ते म्हणाले की, ' क्षात्रजगद्गुरूंनी त्यांची इच्छा असल्यास विवाह करावा. पाद्यपूजा करून घेऊ नये. परमेश्वर नि देव ह्यांमधील सर्व दलाल नाहीसे करावे, देशसेवा व जनसेवा करणे हेच त्यांनी आपले जीवितकार्य समजावे. क्षत्रिय जगद्गुरूंच्या गादीवर त्यांच्या वंशजांचा हक्क राहाणार नाही.'[३७] ह्यावरून असे दिसते की, ती एक धार्मिक प्रशासकाची नेमणूक होती. त्यांनी जरी अशी व्यवस्था केली, तरी मौनी मठाच्या पीठावर ब्राम्हणेतर पुरुषाची स्थापना करताना त्याला क्षात्रजगद्गुरू असे अभिधान द्यावयास नको होते. कारण जातिभेद मोडणे हे महाराजांचे ध्येय होते. त्या तत्त्वाप्रमाणे क्षत्रिय जगद्गुरूची निर्मिती विसंगत आहे असे म्हणणे क्रमप्राप्त आहे.

जातिनिरपेक्षबुद्धीने पुरोहित तयार करणारी चळवळ सुरू करून महाराजांनी धार्मिक क्षेत्रातील ब्राह्मण पुरोहितशाहीचे वर्चस्व नष्ट केले आणि ब्राह्मण पुरोहितांच्या मानसिक गुलामगिरीतून ब्राह्मणेतरांना मुक्त केले, ही त्यांची एक महान ऐतिहासिक कामगिरी होय, हे मान्यच केले पाहिजे. भट सांगेल तो धर्म,

---

३७. लठ्ठे, आ. बा., श्रीमच्छत्रपती शाहूमहाराज यांचे चरित्र, पृ. ४३५.

तो दाखवील ती पूर्व दिशा, तो मागेल ती दक्षणा. त्याने धर्मसंस्कार केले तरच आपले पितर स्वर्गात जाणार अशी सामान्यजनात भाबडी समजूत होती, ती त्यांनी उखडून टाकली. त्याचप्रमाणे सर्व हिंदूंना वेदोक्ताधिकार आहे, हे तत्त्व त्यांनी प्रस्थापित केले.

नवीन पुरोहितांमध्ये अनेक जातींचे पुरोहित होते हेही लक्षात ठेवले पाहिजे. हे अनेक जातीचे पुरोहित सामान्य जनतेसाठी निर्माण केले म्हणून महाराजांना पुरोहितपणाची कल्पना मान्य होती, असे त्यांच्या अंतकाळच्या विचारावरून म्हणता येत नाही. त्यांच्या एका अप्रसिद्ध लेखात त्यांनी लिहून ठेवले आहे की, ' परमेश्वराला पूजा, श्रद्धा किंवा प्रार्थना यांची गरज नाही. परमेश्वर सर्वव्यापी आणि सर्वसाक्षी असेल तर त्याला मध्यस्थाची, स्तुतीची, प्रार्थनेची किंवा श्रद्धेची जरूरी नाही. ' परंतु सामान्य जनतेसाठी ही पायरी ठेवणे त्यांना आवश्यक वाटले. जातिभेद मोडण्याच्या मार्गातील ती एक पायरी होती, असे म्हणावयास हरकत नाही.

' नदान्तं क्षत्रियकुलम् ' ह्या उन्मत्त घोषणेला प्रत्युत्तर म्हणून ' जन्मजात पौरोहित्यांतम् ' अशी घोषणा करणारा, शेकडो वर्षांनी का होईना, एक धीर वीर पुरुष निर्माण झाला आणि तोही सामाजिक क्रांतीसाठी बंड करणाऱ्या महाराष्ट्रात झाला, अशी इतिहास ग्वाही देईल.



# व्यक्तिदर्शन

. १ .

छत्रपती शिवाजी महाराज हे प्रथम लोकनेते म्हणून पुढे आले. नंतर ते छत्रपती म्हणून भारताच्या इतिहासात अजरामर झाले. शाहू महाराज हे प्रथम छत्रपती म्हणून लोकांसमोर आले आणि मागाहून लोकनेते म्हणून महाराष्ट्राच्या इतिहासात अजरामर झाले. सामान्य जनतेच्या जीवनाशी, त्याने स्वतःच्या उद्धारासाठी चाल-लेल्या झगड्याशी समरस होऊन त्यांच्यामध्ये वावरणारा असा राजा त्यांच्या वेळच्या संस्थानिकांत त्यांच्यासारखा दुसरा कोणी झालाच नाही. महाराष्ट्रातही त्यांच्या कालखंडात लोकमान्य टिळक ह्यांच्याखेरीज छत्रपती शाहूएवढा कीर्तिमान नि प्रभावशाली नेता अन्य कोणी झाला नाही, असे म्हटल्यास ती अतिशयोक्ती खास ठरणार नाही. विसाव्या शतकाच्या पहिल्या दोन दशकांत भारतात जे चार पाच महान पुढारी होऊन गेले त्यात त्यांची प्रामुख्याने गणना करणे उचित होईल.

छत्रपती शाहू हे जरी भारतीय राजकारणात प्रत्यक्ष भाग घेत नसत, तरी महाराष्ट्रात त्यांना अप्रत्यक्षपणे सामाजिक क्षेत्रातील टिळकांचे प्रतिस्पर्धी म्हणून मानण्यात येत असे. टिळक नि छत्रपती ह्यांच्या विलोभनीय व्यक्तिमत्त्वातील साम्य व भेद पाहण्यासारखा आहे. दोघेही वर्णाने श्यामल. छत्रपती पाच फूट सव्वा दहा इंच उंच, तर टिळक पाच फूट अडीच इंच. टिळक हे साध्या राहणीचे नि उच्च विचारसरणीचे एक आदर्श नेते. टिळक साधे किती होते ते पाहा. एका म्हाताऱ्या बाईंनी टिळकांचे केसरी कार्यालय नि मुद्रणालय पाहण्याची इच्छा केली. एका गृहस्थाने त्या बाईंना मुद्रणालय नि कार्यालय दाखविले. त्या बाई नंतर म्हणाल्या, " आता मला टिळक महाराजांचे दर्शन घ्यावयाचे आहे. " तेव्हा ते गृहस्थ हळूच म्हणाले, " तोच मी टिळक ! "

शाहू महाराजही तसेच साधे होते. एके दिवशी भेटावयास आलेल्या गृहस्थाने महाराजांसच विचारले, " छत्रपती शाहूंची मला भेट घ्यायची आहे. ते मला

भेटतील का ?" महाराज म्हणाले, "तेथे बसून राहा. पंधरा मिनिटांनी भेटतील." महाराजांनी आपली घोड्याची गाडी चालू केली नि नंतर पंधरा मिनिटांनी काम करून परत आले. तो मनुष्य महाराजांच्या भेटीस जाताच त्याला कळले की, आपणास थोड्या वेळापूर्वी ज्यांनी बसावयास सांगितले ते स्वतः महाराजच होते. त्यामुळे त्याची गाळण उडाली. तो क्षमा मागू लागला. महाराजांनी त्याची समजूत घातली. महाराज तर राजे असून राष्ट्रोन्नतीसंबंधी उच्च नि उदार विचार बाळगणारे राजर्षी. त्यांनी राजमहालातील ऐश्वर्याचा त्याग करून मांजरपाटाचे जाडे भरडे भगवे सदरे परिधान केले. नक्षीदार पलंग अन् मखमलीच्या मऊ गाद्यागिरद्या ह्यांचा त्याग करून ते खाटेवर कांबळे टाकून झोपत आणि कांदा-भाकर खात.

दोघांनीही मादक पेयांना कधी स्पर्श केला नाही. राजे शाहू यांच्या नृपति-पदाला क्वचित वारांगनांचा स्पर्श झालेला आढळतो. टिळक शीलसंपन्न धवल कीर्तीचे सद्गृहस्थ होते. त्यांचे खासगी जीवन धुतल्या तांदळासारखे स्वच्छ होते, हे त्यांचे हितशत्रूही मान्य करतात. दोघांवरही निंदकांनी चिखलफेक केली. टिळक म्हणत, "मी सकाळच्या चहाबरोबरच वर्तमानपत्रातील शिव्या खात असतो!" महाराज म्हणत, "दोन सवयी मला जडल्या आहेत. अंग रगडून घेणे नि बामणी वृत्तपत्रांतील शिव्या खाणे!"

महाराज हे अधिकाराने नि औदार्याने राजे होते, तर टिळक औदार्याने राजे. टिळकांच्या दानतीचा नेता नवभारताच्या इतिहासात झालाच नाही, असे म्हटले तरी चालेल. टिळकांचे शिक्षणप्रसाराचे कार्य वरिष्ठ वर्गात घडले. छत्रपतींचे शिक्षणकार्य बहुजन समाजासाठी झाले. प्रजा सुबुद्ध व्हावी, जागृत व्हावी, तिने राज्यकारभार करण्यास सहकार्य करावे, तिने आपल्या उद्धारासाठी स्वतःच्या पायांवर उभे राहावे, ह्या हेतूने प्रेरित होऊन त्यांनी शिक्षणप्रसार केला.

टिळकांनी एकदा आपल्या एका व्याख्यानाच्या ओघात असे उद्गार काढले होते की, "तेली, तांबोळी, शेतकरी यांना कौन्सिलमध्ये जाऊन काय नांगर हाकायचे आहेत, की तागडी धरायची आहे?"[१] आणि त्यापूर्वी अनेक वर्षां-पासून महाराष्ट्रात टिळकांचा जयजयकार तेल्या-तांबोळ्यांचा पुढारी म्हणून होत आला होता. ह्यामुळे ब्राह्मणेतर मंडळीत संतापाची लाट निर्माण होऊन ती सर्व

१. Paranjpye R. P. YOUNG LIBERAL SERIES No, 4, p 4. आणि प्रबोधनकार ठाकरे, शेतकऱ्यांचें स्वराज्य, पृ. ११३.

महाराष्ट्रात पसरली आणि टिळकांच्या सभा सांगली, पुणे, मुंबई येथे उधळण्यात आल्या. ह्याची प्रतिक्रिया म्हणूनच टिळकांच्या निधनानंतर शाहू छत्रपतींची पुणे येथील सभा उधळून पुणेकरांनी त्यांच्यावर फिर्यादही केली, पण तो बार वाया गेला.

छत्रपती शाहू सामान्य जनतेला, दलितांना नि पददलितांना जीव एकटवून सांगत की, " मी माझी मते सोडणार नाही किंवा जीव बचावण्यासाठी देखील शरण जाणार नाही. मी मोडेन पण वाकणार नाही. सरकार रागावेल असे तुम्ही म्हणता. रागावो बिचारे. मला त्रास होईल यात संशय नाही, परंतु गरजवंतांना मदत केल्याबद्दल, अस्पृश्यांना हात दिल्याबद्दल नि मराठ्यांचा उद्धार करण्याकरिता माझी शक्ती खर्च केल्याबद्दल परमेश्वराकडून मला खचित न्याय मिळेल.[२] बहुजन समाजाच्या उद्धाराचे पवित्र कार्य मी प्राण जाईतोवर सोडणार नाही. "

टिळकांचे हरिजनांसंबंधीचे धोरण कचखाऊ होते. ते उपकारक नव्हते, न्याय्य नव्हते. ' प्रत्यक्ष देव अस्पृश्यता पाळू लागला तर मी त्याला देव म्हणून ओळखणार नाही, ' असे टिळकांनी कर्मवीर शिंदे ह्यांनी भरविलेल्या ज्या अस्पृश्यता निवारण परिषदेत भाषण केले, त्याच परिषदेत ' मी आपल्या वैयक्तिक दैनंदिन जीवनात अस्पृश्यता पाळणार नाही, ' असे जाहीर करणाऱ्या जाहीरनाम्यावर त्यांनी सही करण्यास नकार दिला. ' जर कोणी माझ्या देशाचे स्वराज्य मिळविले तर त्यांच्या पंक्तीस मी जेवेन, ' असे टिळक म्हणत. म्हणजे सामाजिक समता त्यांना मान्य नव्हती. छत्रपती शाहू हे महार, मांग, कातकरी, बुरूड ह्यांना पंक्तीस घेऊन जेवत असत. त्यांच्या मडक्यातले ते पाणी पीत असत. महाराज हा आपला महार-मांगांचा परिवार घेऊन १९२० साली मे महिन्यात नागपुरला गेले असता, त्या शिवाशिवीच्या भीतीने राजे लक्ष्मणराव भोसले आपला राजवाडा सोडून शिकारीच्या निमित्ताने बाहेर पळाले.[३]

अस्पृश्यांविषयी आपणास कळवळा का येतो, हे सांगताना छत्रपतींनी जो हंबरडा फोडला, तो ऐकून कठोर मनुष्याचेही काळीज फाटून जाईल. महाराज माणगाव येथील अस्पृश्यांच्या परिषदेत गहिवरून म्हणाले, " अस्पृश्य लोकांची हजेरी माफ करण्याची बुद्धी मला का झाली याचे कारण या प्रसंगी थोडक्यात सांगावे असे मला वाटते. हजेरी असल्यामुळे या गरीब लोकांवर गावकामगार व इतर

२. लठ्ठे, आ. बा; श्रीमच्छत्रपति शाहूमहाराज यांचें चरित्र, पृ. ४५४ ५५.

३. संपादक, कुरणे, दत्ताजीराव यशवंतराय, कै. राजर्षि छत्रपति शाहू महाराज यांच्या आठवणी, पृ. ४६.

अधिकाऱ्यांचा फारच जुलूम होत होता. म्हणजे गावात बारा आणे मजुरीचा दर असला तरी गैरहजेरीची भीती घालून त्या गरीब लोकांकडून अधिकारी लोक फुकट काम करून घेत होते. फार झाले तर त्यांच्या पोटाला म्हणून काही तरी थोडेसे देत होते. "

" गुलामगिरीपेक्षा सुद्धा या विसाव्या शतकात अशी गुलामगिरी चालली आहे. ज्यांना ही हजेरी होती त्यांना त्याप्रमाणे आपल्या जवळचे आप्तइष्ट, पै-पाहुणे कोणी आजारी पडल्यास त्यांना तावडतोब भेटता येत नव्हते व कित्येक प्रसंगी तशी भेट न होताच ते मरतही होते. मी असे प्रत्यक्ष पाहिले आहे की, कित्येक वेळा लहान आजारी मुलांच्या आयांना व बापांना वेळी-अवेळी जबरदस्तीने वेठीस धरून नेल्यामुळे ती लहान आजारी मुले, त्यांच्याकडे लक्ष देण्यास कोणीच नसल्याने, त्यांचे आईबाप परत आल्यावर त्यांना ती मेलेली सापडली आहेत. यापेक्षा जास्त जुलूम काय असावयाचा ? त्याचप्रमाणे बलुतेदारांकडून वरिष्ठ दर्जाच्या लोकांनी कामे करून घेणेची व मागाहून त्यांना काही देत नाही म्हणून सांगणेचे असे प्रसंगही पुष्कळदा येतात. कोणी जास्त तक्रार केली तर तुला हजेरीत घालीन अशी भीती घालतात.

" पाटील, कुलकर्णी वगैरेंची घरे वगैरे बांधणेची कामे असलेस गोरगरीब मराठे, सूर्यवंशी, सोमवंशी (अस्पृश्य लोक) वगैरे रयत लोकांकडून त्यांना धमकी घालून नियमापेक्षा फाजील बलुते देवविणेसही गावकामगार लोक कमी करीत नाहीत. गावात एखादी चोरी झाली म्हणजे तर या हजेरीवाल्या लोकांची दैना फारच होते. चांगल्या-वाईट सर्व लोकांना धमकावण्यात येऊन त्यांच्यावर अनेक तऱ्हेचे जुलूम होतात. गुन्ह्याचे मान पाहिले तर मी स्वतःच्या अनुभवावरून असे सांगू शकतो की, हजेरीच्या लोकांपेक्षा बिनहजेरीच्या लोकांतच गुन्हेगारांची संख्या जास्त आहे. मात्र बिनहजेरीच्या लोकांना हजेरी लावून बेशरम केल्याने त्यांची प्रवृत्ती गुन्हा करणेकडे होते. एवढा हजेरीचा उपयोग होत होता. त्यांना अब्रूने व प्रतिष्ठेने वागण्याचा फायदा काय ? कोणत्याही स्थितीत हजेरी पाठीशी लागलीच आहे व बेअब्रू कायमचीच आहे. मग त्यांनी चांगले रीतीने तरी का वागावे, असा त्यांचे मनावर परिणाम हजेरीने होत आहे. मी हजेरी बंद केल्यापासून गुन्ह्याची संख्या कमी झाली आहे. कारण प्रत्येकास अब्रूने वागावे असे वाटते. " [४]

~~~~~~

४. श्रीमन्महाराज शाहू छत्रपती सरकार करवीर यांचीं भाषणें, पृ. ७९–८१.
~~~~~~

वस्त्र, वित्त, विद्या आणि स्वाभिमान ह्यांना मुकविलेल्या अस्पृश्यांची गुलामगिरीतून मुक्तता करून त्यांना मानवी स्वातंत्र्याचे हक्क देणारी घोषणा भारताच्या इतिहासात तोपर्यन्त दुसऱ्या कोणत्याही राजाने आपल्या राज्यात केली नव्हती. अशा ह्या पददलितांनी, माणुसकीस मुकविलेल्या अस्पृश्यांनी भारताचे स्वातंत्र्य मिळविले तर टिळक त्यांच्या पंक्तीस जेवणार होते. अस्पृश्यांच्या संबंधीचे हे त्यांचे विचार रामदास आणि एकनाथ यांच्यापेक्षा काही वेगळे होते असे नाही. अस्पृश्यांना जवळ करणारे महात्मा एकनाथ ह्यांनी आपल्या 'भागवत' ग्रंथामध्ये असे लिहिले की :

अंत्यजाचा विटाळ ज्यासी । गंगास्नानें शुद्धत्व त्यासी ॥
ते गंगास्नान अंत्यजासी । शुद्धत्वासी अनुपयोगी ॥ ९१ ॥

एकनाथी भागवत, अ. २८ वा.

आणि रामदास तर बोलून चालून वर्णवर्चस्वावादी. त्यांनी म्हटले आहे की :

अंत्येज शब्दज्ञाता बरवा । परि तो नेऊन काये करावा ।
ब्राह्मणासन्निध पुजावा । हें तों न घडे कीं ॥

दासबोध, द. ५. स. १. ओ. १६

ह्यावरून महात्मा फुले व छत्रपती शाहू यांच्या मानवतावादाची महती कळून येते. जे आपणांस हक्क आहेत ते आमच्या सर्व देशबंधूंस नि धर्मबंधूंस असलेच पाहिजेत हा त्यांच्या तत्त्वज्ञानाचा गाभा होता.

टिळकांना जातिभेद मोडणे आवश्यक आहे असे वाटत नव्हते. छत्रपती शाहू जातिभेद मोडून सबगोलंकार करीत आहेत, असा त्यांच्यावर टिळक-केळकरांचा आरोप होता. आणि जातिभेद मोडणे हे तर महाराजांचे खरे ध्येय होते. समाज सुधारणेच्या उद्देशाने विधिमंडळात आलेल्या सर्व विधेयकांस टिळकांनी विरोध केला. पण छत्रपतींनी सर्व विधेयकांना पाठिंबा दिला.

छत्रपतींनी 'पटेल विधेयका'स पाठिंबा दिला, इतकेच नव्हे तर आपल्या संस्थानात पुनर्विवाहाचा त्याचप्रमाणे आंतरजातीय विवाहाचा असे दोन्ही कायदे संमत केले.

छत्रपती आणि लोकमान्य ह्यांनी आपल्या ध्येयवादासाठी निर्भयपणे, निःस्वार्थीपणे, कळकळीने लढा केला. टिळकांनी स्वराज्यासाठी आपले सर्वस्व पणास लावले. ते भारतीय स्वातंत्र्य-संग्रामाचे जनक होते. राष्ट्रीय त्यागाचे प्रतीक

होते. छत्रपतींनी आपले राज्यपद नि जीवित सामान्य जनतेच्या हक्कांसाठी पणास लावले. टिळकांच्या मनात शाहू महाराजांविषयी आदर होता. छत्रपतींच्या मनातही टिळकांविषयी आदर होता. आपला फेटा टिळकांच्या टेबलावर विसरून एकदा छत्रपती आपल्या गाडीत बसावयास आले असता टिळकांना ते मिस्किलपणे म्हणाले, " बळवंतराव, आता तुम्हीच तो फेटा आमच्या डोक्यावर ठेवा. " टिळकांनी त्यांचा तो फेटा त्यांच्या शिरावर ठेवला आणि एकप्रकारे छत्रपतींना पुन्हा वेदोक्त राज्याभिषेक केला ! टिळकांना चिरोल खटल्याच्या वेळी सरकारी गुप्त परिपत्रके पुरवून मुंबईच्या इंग्रज गृहमंत्र्याची छत्रपतींनी चांगलीच गाळण उडवून दिली. त्यावेळी ते म्हणत, " टिळक महान देशभक्त, इंग्रजांशी स्वराज्यासाठी लढतो. त्याला साह्य करायचे नाही तर कोणाला करायचे ? तो काय माझा वैयक्तिक शत्रू आहे थोडाच ? " देशभक्त अरविंद घोष यांच्यावर ब्रिटिशांनी राजद्रोहाचा खटला भरला त्यावेळी त्यांनी खासेराव जाधवांचे बंधू कॅ. माधवराव यांच्या हस्ते पाच हजार रुपये अरविंदांकडे पाठविले होते,[५] ते त्यांच्या देशभक्तीविषयी छत्रपतींना आदर होता म्हणूनच. छत्रपतींना स्वराज्यद्रोही म्हणणाऱ्या निंदकांनी ही गोष्ट लक्षात ठेवावी.

टिळक आजारी पडले तेव्हा त्यांना पन्हाळगडावर शुश्रूषेसाठी ठेवावे, अशी छत्रपतींची उत्कट इच्छा होती. तशी व्यवस्था करण्यासाठी त्यांनी वा. द. तोफखाने यांना धाडलेही होते. परंतु त्याच दिवशी लोकमान्य दिवंगत झाले. ती दुःखद वार्ता कळली तेव्हा छत्रपतींनी डोळे मिटून घेतले. त्यातून अश्रू वाहू लागले. त्यांनी पुढ्यातील ताट दूर लोटले. त्यांनी शिकारीस जाणे रद्द केले. त्या दिवशी वाघांना-सुद्धा मांस घातले नाही. जेव्हा महाराजांनी टिळकांना पन्हाळगडास आणण्यास सांगितले तेव्हा त्यांचा टिळकांविषयीचा तो आदर पाहून तोफखाने यांनी आश्चर्य प्रकट केले. तेव्हा महाराज म्हणाले, " पृथ्वीराज व त्याचा चुलता ह्यांमध्ये एकदा लढाई झाली. त्यात चुलत्याला भयंकर जखमा झाल्या. सायंकाळी आपल्या चुलत्याला पृथ्वीराज भेटावयास गेला आणि चुलत्याच्या मरणकाळच्या इच्छेस अनुसरून एका ताटात ते दोघे जेवले. वैराची अशी तऱ्हा असलेल्या आर्यभूमीत व जगातील उदात्त अशा आर्यधर्मात आमचा जन्म झाला आहे. वैराला किती महत्त्व द्यायचे ते आम्हाला कळते. या वेळी टिळकांच्या ऐवजी मी आजारी असतो, तर पोटी वैराची

५. तोफखाने, वा. द., राजर्षि श्रीशाहू छत्रपती यांचे अंतरंग, पृ. १७.

जाणीव ठेवून ते माझ्या समाचाराला आले नसते व योग्य ती माझी व्यवस्था त्यांनी केली नसती, असे का तुमचे म्हणणे!" टिळक-द्वेषाने अंध झालेल्या शाहू छत्रपतींच्या भक्तांनी ह्यापासून धडा घ्यावा असे म्हणणे वावगे होणार नाही. टिळक राजकारणातील 'शाहू' होते, तर छत्रपती समाजकारणातील 'टिळक' होते. इतिहासाच्या आकाशातील ती दोन नक्षत्रांची स्पर्धा होती. छत्रपतींना 'स्वराज्य-द्रोही' म्हणणे आणि टिळकांना 'स्वजनद्रोही' म्हणणे ही दोन्ही पातके समानच.

. २ .

शिक्षणप्रसाराने, आपल्या सामाजिक कर्तृत्वाने नि त्यागी जीवनाने छत्रपतींनी महाराष्ट्रातील ब्राह्मणेतरांत जागृती निर्माण केली. त्यांनी समाजकारण नि राजकारण ह्या दोन्ही क्षेत्रांत आपल्या हक्कांसाठी लढण्यास त्यांना उभे केले. छत्रपतींचा कोल्हापूरबाहेरील राजकारणातही उघड वा गुप्तपणे हात असे आणि ते अनेक चळवळींची सूत्रे कोल्हापुरहून हालवीत असत. त्यांनी बहुजन समाजातील कर्तृत्व-वान व्यक्तींना वृत्तपत्र काढण्यास आर्थिक साहाय्य केले त्यांच्यामध्ये सुबुद्ध आणि शहाणे कार्यकर्ते निर्माण केले. त्यांच्यात प्रचारक निर्माण केले. त्यांच्यातील भांडणे मिटविली. ज्यांनी ज्यांनी राष्ट्रजागृती केली, धर्मजागृती नि समाजजागृती केली, लोक-हितकारक ग्रंथलेखन केले, कलेत वा कुस्तीत, नाट्यात वा लोकनाट्यात चांगली काम-गिरी केली, त्यांना त्यांना त्यांनी उत्तेजन दिले, त्यांना त्यांना त्यांनी पोटाशी धरले पाठीवर थाप मारून त्यांना सढळ हाताने साह्य केले. त्यासाठी आपली सत्ता, सामर्थ्य नि संपत्ती व्यतीत केली. जनदोषांचे निर्मूलन करणे आणि नवीन गुणांची प्रस्थापना करणे, नवीन निष्ठेने आणि नव्या उत्साहाने सामान्य जनास वागण्यास शिकविणे ह्या सामजिक प्रगतीच्या दोन्ही अंगांना त्यांनी चालना दिली.

कालज्ञान ( Time-Spirit ) हे जसे शेवटच्या पेशव्यांना नीट झाले नाही, तसे पुण्यातील चिपळूणकरीय विचारसरणीच्या नेत्यांनाही ते कधीच झाले नाही. महाराजांना जगाचे ज्ञान चांगले होते. युरोपवर मजुरांचे राज्य येत आहे, अशी चाहूल त्यांनी ऐकली. समाजाच्या पुढे त्यांची दृष्टी होती. जगातील ज्ञानाचा उपयोग समाजाला, संस्कृतीला नि कलेला उजळण्यासाठी कसा करून घ्यावा, हे त्यांना चांगले कळत होते. कुळांना पिळून, नागवून सभागृहामधून राजकीय भाषणबाजी करणारे वकील आणि शेतकऱ्यांना पिळून हवेल्या बांधून राजकीय

व्याख्यान देणारे सावकार ह्यांना शाहू छत्रपतींच्या समाजोन्नतीच्या कार्याची महती कळली नाही, हा काळाचा दोष नसून त्या वृत्तीचा दोष आहे.

छत्रपतींचे शारीरिक बलही अफाट होते. त्यांचे अश्वारोहणकौशल्य वाखाणण्यासारखे होते. त्यांनी एकदा कोल्हापूरहून घोड्यावरून निघून महाबळेश्वर अवघ्या दहा तासांत गाठले. त्यामुळे त्यांची अद्वितीय घोडेस्वार अशी ख्याती झाली. एकदा दोन भयंकर घोडी त्यांनी गाडीस जुंपली आणि ती गाडी दऱ्याखोऱ्यातून भरधाव सोडली. गाडी-घोड्यांना तर मार बसलाच, पण महाराजांच्या अंगात रुतलेले काटे काढावयास डॉक्टरांना पाच दिवस लागले. महाराज आपले शांतपणे तो सोहळा उरकत होते. सर्कसमध्ये आपल्या संरक्षकाला ठार मारणाऱ्या वाघिणीला विकत घेऊन, त्यांनी तिला प्रेमाने जिंकून गयाळ करून टाकले. ते म्हणत, शक्तीपेक्षा युक्ती श्रेष्ठ, पण त्याहीपेक्षा प्रेम श्रेष्ठ.

एके दिवशी मृगया करीत असता ते झाडाच्या फांदीत अडकले आणि घोडा भरधाव पुढे गेला. झाडाची फांदी महाराजांच्या वजनाने मोडली. महाराज खाली फत्तरावर आदळले. बेशुद्ध झाले. त्यांचे सोबती त्यांना शोधत आले. डोक्यावर पाणी शिंपडताच ते शुद्धीवर आले आणि हसून पूर्ववत शिकारीच्या शोधास गेले. असा होता त्यांचा सोशिकपणा नि सहनशीलता. क्लोरोफॉर्म घेतल्याशिवाय त्यांनी आपल्या घशावर शस्त्रक्रिया करून घेतली, दोन पहिलवानांची कुस्ती ते सहज सोडवीत. ते चार बैली मोट सहज ओढीत असत.[६] क्रूर श्वापदे त्यांच्यापुढे गयाळ होऊन पडत. एका रानटी अस्वलाला त्यांनी जमीनदोस्त केले. ते सिंह-वाघांना कुत्र्यामांजराप्रमाणे लीलेने वागवीत.

छत्रपतींचा दृष्टिकोण व्यवहारवादी नि वास्तववादी होता. विज्ञाननिष्ठ दृष्टिकोणाला ते महत्त्व देत. रोगनिवारणार्थ लस टोचून घेत. संकटाच्या वेळी घोड्याचेही मांस खाण्याला हरकत नाही, असा त्यांनी महायुद्धातील सैनिकांना संदेश पाठविला होता. त्यांचा देशाभिमान, स्वभाषाभिमान नि कुलाभिमान अनन्यसाधारण होता. विंचेस्टर येथील महाविद्यालयातील सत्कारास उत्तर देताना त्यांनी अध्यक्षांच्या लॅटिन भाषणास संस्कृतमध्ये उत्तर दिले. "मी केवळ मराठ्यांचा राजा नाही, मी कोल्हापूरचा छत्रपती आहे," असे ते स्वाभिमानाने सांगत. नाटकातील शिव-

---

६. संपादक, वन्ने, रावसाहेब डॉ. एस; राजर्षी शाहू स्मारक ग्रंथ (१९६८), पृ. १३३.

जन्माच्या वेळीसुद्धा ते ताड्कन उठून शिवरायास मानाचा मुजरा करीत. ब्रिटिश राजपुत्राने पुण्यात शिवाजी महाराजांच्या पुतळ्याचे अनावरण केले आणि जेव्हा त्याने शिवरायाला मानाचा मुजरा केला, तेव्हा त्यांना अवर्णनीय असा आनंद झाला. मराठ्यांनी महत्पदासाठी लायकी मिळविली पाहिजे, लाचारी करू नये, असा तेजस्वी उपदेश ते मराठा तरुणांना करीत.

वेदोक्त प्रकरणाला अनिष्ट वळण लावले ब्राह्मणी वर्णवर्चस्ववादी नेत्यांनी. वैदिक धर्माला सामाजिक समतेची बैठक देऊन वेदोक्ताचा अधिकार सर्व हिंदूंना देऊन, वैदिक धर्माचे पुनरुज्जीवन करावयाचे असे छत्रपती शाहूंचे ध्येय होते. यास्तव त्यांनी वरिष्ठ समाजाला मानवी समानतेविषयी कळकळीने आवाहन केले आणि दलितांना नि पददलितांना त्यांनी मानवी समानता दिली. अशा रीतीने महाराष्ट्रातील ब्राह्मणांना वेदोक्ताच्या निमित्ताने त्यांनी नवीन समाजरचनेच्या निर्मितीसाठी आवाहन केले. परंतु ब्राह्मणांच्या वर्णवर्चस्ववादी धोरणामुळे त्यांनी हिंदुसमाजाच्या पुनर्घटनेची ही संधी वाया घालविली. नवीन विचारांचा, नवीन प्रेरणांचा विचार न करणाऱ्या त्या धर्ममार्तंडांनी नि सामाजिक 'टोरीं' नी ही संधी लाथेने ठोकरली. त्यात ब्राह्मणांची संकुचित भावना नि वर्णवर्चस्वाची आकांक्षा दिसून आली. ते बंधुता, समानता नि स्वातंत्र्य ह्या तीन तत्त्वांवर एकसंघ नि अभेद्य अशी समाजाची पुनर्घटना करण्यास तयार नव्हते, हे सिद्ध झाले.

पुराणमतवादी हे खरे प्रतिक्रांतिवादी असतात. परंपरावादी लोक काही सुधारणा करणे शक्य तरी असते, कारण इतिहासावरून काही धडा घेणे त्यांना शक्य असते. परंतु पुराणमतवादी हे पुराणातील अहंकाराच्या खातेऱ्यात लुडबुडत असतात. त्यांच्याकडून ही अपेक्षा करणे मुळी चुकीचे आहे. कनिष्ठ वर्गातील शेतकरी, कामगार, दलित नि पददलित यांचा उद्धार नि उत्कर्ष करणारी छत्रपतींची चळवळ ही मराठ्यांची चळवळ होती, तिने अस्पृश्यांना जवळ केले नाही, असे म्हणणे म्हणजे आंबेडकरांची चळवळ ही केवळ महारांची चळवळ होती, असे म्हणण्यासारखे हास्यास्पद आहे.

छत्रपतींच्या विचारांत, आचरणात, कृतीत नि प्रचारात दलितोद्धाराचा कळवळा म. फुले यांच्या इतकाच जळजळीत होता. त्यांची अस्पृश्योद्धाराची तळमळ नि कार्य पाहून "निःस्वार्थ मिशनरी भावनेचे अद्वितीय उदाहरण,"[७]

७. लठ्ठे, आ. बा; श्रीमच्छत्रपती शाहूमहाराज यांचें चरित्र, पृ. १४३.

असा छत्रपतींचा गौरव म. गांधींनी केला होता, तो यथार्थ होता. गांधीजींनी कर्मवीर भाऊराव पाटलांचे सर्व जातिधर्मांसाठी बांधलेले ' छत्रपती शाहू बोर्डिंग हाऊस, सातारा ' हे वसतिगृह पाहून त्यांना विचारले की, " ह्या बोर्डिंगला शाहू छत्रपतींचे नाव का दिले ? आपणांस शाहू छत्रपतींनी किती पैसे दिले ? " त्यावर कर्मवीर महात्माजींना म्हणाले, " छे ! त्यांच्याकडून मी पैसे आणले नाहीत. मी त्यांच्याकडून दिल आणले आहे ! " [७] महाराजांचा कळवळा पाहून अस्पृश्य लोक त्यांना आपला देव मानीत. शेतकऱ्यांच्या उद्धाराची त्यांची तळमळ तितकीच तीव्र होती. शेतकऱ्यांना त्यांनी साहाय्य केले, त्यांची अडचण दूर करण्याचे प्रयत्न केले. दुष्काळाच्या वेळी त्यांना सारा माफ केला. त्यांच्यामध्ये विद्येचा प्रसार केला. वरिष्ठ समाजातून कनिष्ठ समाजात शिक्षण झिरपत जाईल, ह्या तत्त्वाला जसा म. फुले ह्यांनी विरोध केला, तसाच छत्रपतींनीही केला. त्यामुळे त्यांनी प्राथमिक शिक्षण सक्तीचे केले.

जातिभेद मोडणे हे छत्रपतींचे ध्येय होते. म. फुले यांच्यानंतर जात्युच्छेदक पुढारी टिळक काळात-कर्मवीर शिंदे यांनी आपल्या कामास मर्यादा घातल्यामुळे—झाला नाही, असे म्हटले तर ते वावगे नाही. महाराष्ट्रात पंचकुळी आणि शहाण्णव कुळी ह्या वादाची धार मराठ्यांच्या वागणुकीत आज जर कमी दिसत असली, तर त्याचे श्रेय महाराजांना आहे. त्यांच्या राजवटीत अनेक आंतरजातीय विवाह झाले. ते घडवून आणण्यासाठी ते प्रयत्नशील असत. वरिष्ठ समाजाने ही पद्धत घालून आणि अशा लग्नांना प्रतिष्ठा आणून आदर्श निर्माण केला नाही, तर त्याला गती येणार नाही, असा त्यांनी निष्कर्ष काढला होता. म. फुले आणि छत्रपती शाहू ह्यांचे हे जातपात मोडण्याचे कार्य आता कोण करीत आहे ? गम्मत अशी की, समाजसुधारक समाजसुधारणेचे कार्य हाती घेतात, तेव्हा त्यांचे लग्न बहुधा त्यांच्या जातीतच झालेले असते. त्यांची मुले मतस्वातंत्र्याच्या नावाखाली स्वजातीतच लग्ने करतात. म्हणूनच डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी म्हटले की, हिंदु सुधारक जातीत जन्मतात आणि जातीतच मृत्यू पावतात. त्यात खोटे काहीच नाही.

छत्रपती शाहूंचे जातिभेद निर्दाळण्याचे कार्य हे मानवी समानतेचे कार्य होते. कारण जातिभेदाचा पाया विषमता हाच आहे. महाराजांचे हे व्यापक सहानुभूतीचे कार्य राष्ट्रवादाची बैठक व्यापक करणारे होते. परंतु विशिष्टाधिकार

७. ' महाद्वार, ' राजर्षि श्रीशाहू छत्रपती स्मृती गौरव विशेषांक, पृ. २९.

हेतूने प्रेरित झालेल्या लोकांनी सामान्यांना राज्यकारभारात नि सर्व क्षेत्रांत समाविष्ट वा भागीदार करून घेणाऱ्या त्यांच्या दूरदर्शी धोरणाचा विपर्यास केला. त्यांचा तो उद्देश हाणून पाडण्याचा त्यांनी आटोकाट प्रयत्न केला. हा राष्ट्रवादी धोरणाचा एक परी तोटाच झाला. त्यांचे कार्य लोकशाहीचे होते. कारण लोकशाहीचा पाया मानवी समानतेवर अधिष्ठित असतो. अर्थात त्यांचे विरोधक हे मानवी समानतेचे व लोकशाहीचे विरोधक होते हे सिद्ध होते. लोकशाहीचे यश हे लोकशिक्षणावर अवलंबून आहे. ह्या बाबतीत शाहू महाराजांनी महाराष्ट्रावर अनंत उपकार करून नवमहाराष्ट्र नि लोकशाही यांच्या जडणघडणीला उपयुक्त अशी भरीव कामगिरी केली आहे. इतकेच नव्हे, तर म. फुले नि छत्रपती शाहू ह्यांच्या कार्यामुळे, नांगरणीमुळे ही महाराष्ट्रभूमी आज भारतीय लोकशाहीच्या प्रांगणात मानाने तळपत आहे.

समाजवाद म्हणजे समाजरचनेच्या पुनर्घटनेची मागणी. ती ह्या दोघा महापुरुषांनी महाराष्ट्रात मोठ्या अडचणीच्या काळी केली. ते काम दुर्घट होते. शिक्षणातील विषमता, संस्कृतीतील विषमता, साधनांच्या उपलब्धतेत विषमता ही सारी त्यांना नाहीशी करावयाची होती. समाजातील सामाजिक अन्याय, पिळवणूक, यातना, दारिद्र्य, अज्ञान ह्यांपासून बहुजनांना मुक्त करून त्यांची बौद्धिक, नैतिक आणि भौतिक प्रगती महाराजांना साधावयाची होती. ह्या त्यांच्या ऐतिहासिक कार्यांची पार्श्वभूमी नि त्यांचे ध्येय ही समजताच त्यांच्या थोरपणाची महती कळते.

महाराज अष्टपैलू लोकनायक होते. त्यांच्या अंगी धैर्य, त्याग, बुद्धिमत्ता आणि लोकाभिमुखता हे गुण प्रकर्षाने विलसत होते. महाराजांचे धैर्य त्यांच्या शरीराप्रमाणे नि ध्येयाप्रमाणे मोठे होते, अलौकिक होते. वेदोक्त चळवळीच्या वेळी महाराजांच्या ऐवजी एखादा लेचापेचा नेता असता तर डावपेचात प्रवीण असलेल्या प्रतिपक्षाने त्यांना धूळ चारली असती. परंतु महाराजांनी बुद्धिचातुर्याने डावास डाव लावून आणि तोडीस तोड देऊन प्रतिस्पर्ध्यांचा डाव उधळून लावला. सर्व टीकेस नि निंदेस धैर्याने पण शांतपणे तोंड दिले. संकटाच्या वेळी ते खडकाप्रमाणे अचल राहात आणि अडचणीवर मुत्सद्दीपणाने मात करीत.

छत्रपती कुठच्याही गर्दीत निर्भयपणे मिसळत. दलितोद्धार म्हणजे खरे देशकार्य असे मानणारे त्यांच्या पिढीतील ते एक अग्रेसर भारतीय होते. त्यांनी प्रतिस्पर्ध्यांनाही औदार्याने वागविले. त्यांनी कुणावरही हात केला नाही. देण्यासाठी हात वर करणारा तो महारथी कर्ण होता. दलितांचे दुःख कमी झाले म्हणजे

त्याचे ऐश्वर्य वाढे असा तो महाभाग होता. शूरपणाने ध्येयाचे आचरण करणारा तो खरा नरवीर होता. जीवन ही लढाई आहे. जखमांवाचून लढाई नाही. त्या शूर योद्धयालाही काही जखमा झाल्या. परंतु तो पृथ्वीराज चव्हाणासारखा उदार-हृदयी वीर होता. दलितांची भक्ती हीच त्याची शक्ती होती. त्यांची सेवा हेच त्याचे अन्न. मानवी जीवनात सेवेएवढेच समतेला महत्त्व आहे. तिची स्थापना करण्यासाठी त्यांनी अविरत, अव्यभिचारी भक्तीने यथाशक्ती प्रयत्न केले. देह चंदनापरी झिजवून त्यांनी आपले जीवित मंगल आणि चिरंजीव केले.

. ३ .

महाराजांना ब्राह्मणद्वेष्टे मानणाऱ्या अनेकांना शाहूकालीन कोल्हापुरच्या राजवटीची काही माहिती नसते किंवा जी माहिती असते, ती शाहूद्वेष्टया लोकांच्या परंपरेतील लोकांकडून मिळालेली, परंपरेतून चालत आलेली असते. महाराजांचे दिवाण त्यांच्या राजवटीच्या प्रारंभापासून तो अंतापर्यंत सर रघुनाथराव सबनीस होते. महाराजांच्या विश्वासातील ' दिवाणजी ' म्हणजे कारकून हे ब्राह्मण होते. त्यांची नावे पेंडसे नि पोंक्षे. कारभारीसुद्धा ब्राह्मण असत. महाराणींचे दिवाणजी छत्रे नावाचे एक ब्राह्मण गृहस्थ होते. महाराजांचे खासगी कारभारी गोविंदराव देसाई व कुंभोजकर हे ब्राह्मणच होते. महाराजांचे आवडते वकील नि खास विश्वासातील सल्लागार अभ्यंकर नि करमरकर हेही ब्राह्मणच होते. राजाराम कॉलेजचे प्राचार्य आपटे हे ब्राह्मण होते. विद्यापीठ हायस्कूलचे तोफखाने हे ब्राह्मण गृहस्थ असून, ते छत्रपतींचे स्नेही नि सल्लागार होते. पोलीसखात्यातले पेंढारकरादी अधिकारी ब्राह्मणच होते.

महाराजांचा ब्राह्मण समाजावर कटाक्ष नव्हता. आपले धार्मिक व इतर बाबतीत अन्याय्य व माणुसकीला लाज वाटविणारे वर्चस्व इतरांवर कायम राहावे अशाविषयी धडपड करणाऱ्या ब्राह्मणांना आपला विरोध आहे; विद्येत पुढे गेलेल्या ब्राह्मण जनतेशी नाही, असे त्यांनी अनेक वेळा म्हटले आहे.

महाराजांनी बुद्धिमान, विश्वासू नि समाजसुधारक ब्राह्मणांचा कधीही द्वेष केला नाही. उलटपक्षी त्यांना सहाय्यच केले. ब्राह्मण सुधारकांनी चालविलेल्या वर्तमानपत्रांनाही त्यांनी आर्थिक साह्य केलेले आहे. आगरकरांच्या मृत्यूनंतर त्यांचे ' सुधारक ' हे साप्ताहिक मरणोन्मुख झाले असता महाराजांनी त्याला भरीव साह्य

केले.[८] जो वर्णश्रेष्ठत्वाचा टेंभा मिरवीत नसे, तो ब्राह्मण कोल्हापूर संस्थानात अधिकारपदावर चढे. ज्यांना विश्वासाच्या नि जबाबदारीच्या जागेवर घेतले ते ब्राह्मणच होते, युरोपियन अधिकारी नव्हते. याउलट बडोदेकर सयाजीरावांच्या राज्यात किती महाराष्ट्रीय दिवाण झाले, ही विचार करण्यासारखी व लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट आहे.

कलेतील असामान्य प्रवीणता, शरीरबलातील असामान्यता, गायनातील अलौकिकता ह्यांची छत्रपतींनी जोपासना केली. भारतात महाराष्ट्रीय नाट्यकला इतर राज्यांतील कलेपेक्षा बरीच पुढे गेली आहे, असे म्हणतात. छत्रपतींनी नाट्य-कलेविषयी दाखविलेली कळकळ, तिच्या उत्कर्षाविषयी केलेले श्रम, नटांना नि नाटक कंपन्यांच्या मालकांना उपलब्ध करून दिलेली साधने नि त्यांना केलेले सहाय्य ह्यांमुळे महाराष्ट्राचे नट नि कलावंत भारतीय कीर्तीचे झाले. महाराजांनी गायनमहर्षी अल्लादिया खाँ ह्यांना दरबारी गायक नेमले. ए लॉरेन्स तथा लाडीसाहेब ह्या शक्तिसम्राटास शरीररक्षक म्हणून नेमले. गायनसम्राज्ञी केसरबाई ह्यांना गायनाचे शिक्षण देण्यासाठी अल्लादिया खाँसाहेबांना विनविले. नारायणराव राजहंस यांना किर्लोस्कर कंपनीत राहावयास धोरणाने पाठविले छत्रपतींनी; आणि त्यांना बालगंधर्व ही पदवी दिली लोकमान्यांनी.

रंगभूमी गाजविणारे अण्णासाहेब किर्लोस्कर, दत्तोपंत हल्याळकर, भाऊराव कोल्हटकर, गणपतराव जोशी, केशवराव भोसले, सिनेमासृष्टी गाजविणारे व्ही. शांताराम, बाबुराव पेंटर, बाबुराव पेंढारकर, भालजी पेंढारकर, चित्रकलातपस्वी आबालाल रहिमान, गायिका सकवार, साहेबजान, सापीजान ह्या बहिणी, रंगभूमीचे नेपथ्यकार आनंदराव मिस्त्री, तबलजी दादा लाड, बळवंतराव रुकडीकर, गणपत गुरव, पखवाजपटू साधलेबुवा, नाटककार नि पेटी-वादनपटु गोविंदराव टेंबे, शाहीर हैदर आणि अनेक नाटककार हे सर्व कोल्हापुरात लौकिकास चढले आणि भारतास ललामभूत झाले. महाराजांच्या राजवटीतील पंजाबी कुस्तिगीरांशी सामना देणारे देवाप्पा, व्यंकाप्पा बुरूड, श्रीपती चव्हाण, शिल्पशास्त्रज्ञ कृष्णराव मिस्त्री, माधवराव धुरंधर, आनंदराव पेंटर, चित्रकार माधवराव बागल, जरकाम करणारे जिनगे यांनी कोल्हापुरबरोबर महाराष्ट्राचे वैभव वाढविले. प्रकांड पंडित व शिवचरित्र-कार गुरुवर्य केळूसकर यांच्यासारख्या ग्रंथकारांचा त्यांनी गौरव केला. छत्रपतींच्या

---

८. लठ्ठे, आ. बा., श्रीमच्छत्रपती शाहूमहाराज यांचें चरित्र, पृ. २२९.

घराण्याच्या आश्रयाखाली मराठी नाट्य जन्मास आले आणि शाहू छत्रपतींनी नाट्यकलेचे संगोपन केले, तिला वाढविले आणि मराठी रंगभूमीस वैभवास चढविले. महाराजांची बलोपासना नि कलोपासना ह्यांनी महाराष्ट्रास आणि महाराष्ट्राबाहेरील भारतास वैभवास चढविले. त्यांनी बांधलेले सुसज्ज भव्य नि अजोड असे केशवराव नाट्यगृह आणि पन्नास हजार लोक मावतील अशी उभारलेली भव्य कुस्तीची मैदाने ह्या सर्व गोष्टींमुळे कोल्हापुरची कलापुरी नगरी बनली. नाटक कंपन्यातील नटांची भांडणे मिटविणारा, कंपनीला नाटकासाठी मंडप घालून देणारा, नाटक कंपन्यांना समाजात मान नव्हता, तेव्हा नटांना आपल्या पंगतीचा लाभ देणारा हा छत्रपती रसिकांचा सम्राट होता.

छत्रपतींच्या व्यक्तिमत्वाचा प्रभाव नि ठसा केवळ महाराष्ट्राच्या धर्मसुधारणेवर वा समाजकारणावरच पडला आहे असे नाही. महाराष्ट्राची गेल्या पन्नास वर्षांत जी वैचारिक, शैक्षणिक, औद्योगिक, राजकीय नि कलाविषयक क्षेत्रात नवी जडण–घडण झाली, तीत त्यांचा वाटा फार मोठा आहे. मद्रासच्या " जस्टिस " ह्या पत्राने म्हटल्याप्रमाणे ' ते मनुष्यांमध्ये राजा होते आणि राजांमधील मनुष्य होते. जर ते पूर्व कालखंडात जन्मले असते, तर त्यांनी एखादे साम्राज्य स्थापन केले असते आणि राष्ट्रमंडळ निर्माण केले असते. ' साहित्यसम्राट केळकर म्हणाले, " माझे मत असे आहे की, शरीरसामर्थ्य, धैर्य, बुद्धिमत्ता, मुत्सद्देगिरी, मनुष्यस्वभावाची पारख, उद्योगप्रियता, मतप्रचाराची हौस इत्यादी गुण छत्रपतींमध्ये जितक्या प्रमाणात एकत्र आढळले, तितके गेल्या शेपन्नास वर्षांत दुसऱ्या कोणत्याही संस्थानिकात आढळले असतील असे मला वाटत नाही. कोहिनूरसारखा हिरा दैवयोगाने एकाद्याच वेळी खाणीत कामगाराच्या हाती लागतो संस्थानिकांच्या खाणीतही छत्रपती शाहूमहाराजांसारखा पुरुष यदृच्छेनेच निर्माण झाला असे म्हटले पाहिजे.[९] प्रबोधनकार ठाकरे म्हणाले, शाहू छत्रपती हे राजपुरुषांत, समाजसुधारकांत, विद्याप्रसारकांत आणि अस्पृश्योद्धारकांत सक्रिय तडफेचे अग्रणी होते. ते एक नाना रंगी महापुरुष होते. लोकजागृतीच्या चैतन्याची बीजे सर्व राष्ट्रभर पेरून त्यांपैकी कित्येकांची जोरदार रोपटी व टवटवीत कळ्या त्यांनी आपल्या डोळ्यांनी पाहिल्या हे खरे. "[१०]

---

९. संपादक व मुद्रक, पाटील, बा. आ. राजर्षि शाहू छत्रपती, १९३९, पृ. ५८-५९
१०. ठाकरे, प्रबोधनकार के. सी., प्रबोधन, मुंबई, १६ मे १९२२, पृ. ११६.

छत्रपतींची स्मरणशक्ती अचाट होती. दहा पंधरा वर्षांपूर्वी झालेल्या संभाषणातील वाक्ये ते जशीच्या तशी बिनचूक पाठ म्हणून दाखवीत असत. सरकारी प्रकरणांच्या बाबतीत संदर्भ सांगण्यात तर त्यांनी अनेक वेळा आपल्या अभिलेखपालालाही (रेकॉर्डकीपरला) चकित करून सोडले. कोण व्यक्ती कोठे, कोणती चळवळ करीत आहे, याची माहिती त्यांना भरपूर असे. त्यांची बुद्धिमत्ता तीक्ष्ण आणि अत्यंत जागरूक असे. ते विनोदाचे फवारे सोडीत. थट्टामस्करी करीत. मौजेने भांडणे लावून देत आणि गंमत पाहात, तरी ते स्वभावाने गंभीर नि सखोल होते. नोकरांच्या घरच्या बारीकसारीक गरजांची त्यांना जाणीव असे. त्याकडे त्यांचे लक्ष असे. एका नोकराची बायको बाळंत झाली, तेव्हा तो उत्तम तांदूळ नि साजूक तूप लंपास करीत असता पकडला गेला. तो नोकर गर्भगळित झाला. त्याची दयनीय स्थिती पाहून महाराजांच्या डोळ्यात अश्रू उभे राहिले आणि त्यांनी त्याच्याकडे सुवासिक तांदळाचे एक पोते आणि तुपाचा एक डबा पाठवून दिला. त्यांची चीड सात्विक होती, उन्नतिमूलक होती, वंद्य होती. ते आपल्या कार्याविषयी जागरूक असत. खोटे देयक (बील) नेमके हुडकून काढून त्यावर सही करीत नसत. "मला तू सातारचा शाहूमहाराज समजलास काय रे?" असे कारकुनाला ते विचारीत.

छत्रपती शाहू म्हणजे ममतेचा नि समतेचा सागर. उन्हातान्हात काम करणारे मजूर, रस्ते झाडणारे झाडूवाले, शेतात कामकरणारे मजूर, बांबूचे काम करणारे बुरूड, मेंढ्या पाळणारे धनगर ह्या सर्वांना तो दयेचा पवित्र सागर सदा उघडा असे. जो त्यात मनमोकळेपणाने स्नान करील, तो नवीन विचाराने, नवीन उत्साहाने, नवीन तेजाने बाहेर पडावयाचा. त्याच्या सहवासाने अनेकांची आयुष्ये उजळली.

लोकहिताच्या हेतूने चालविलेल्या कार्यात काटे पसरविणाऱ्या विघ्नसंतोषी लोकांचा युक्तीने परस्पर काटा काढण्याची कला महाराजांना चांगलीच साधली होती. आपल्या अपमानाची परतफेड ते सर्वसामान्यांप्रमाणे लगेचच्या लगेच कधी करत नसत. ज्याने त्यांचा अपमान केला असेल, त्याला काही काळानंतर उलट फेड अशा रीतीने करीत की, त्याला त्याची आठवण आयुष्यभर राहावी. परंतु त्याला पुन्हा साहाय्य लागले तर द्यायला ते तयारच. ह्याविषयी एक दोन उदाहरणे सांगावीशी वाटतात.

कोल्हापुरच्या प्रिन्सिपल कँडीची राजकोटच्या राजकुमार कॉलेजात काही

दिवस बदली झाली. हे कँडी फार उन्मत्त व चिडखोर होते. कोल्हापुरच्या विद्यार्थ्यांचा ते हरघडी अपमान करायचे. त्या वेळी महाराज राजकुमार कॉलेजमध्ये विद्यार्थी होते. तो अपमान त्यांना असह्य होई. पुढे महाराज राज्यकारभार पाहू लागल्यावर ' रे ' नावाचे पोलिटिकल एजंट आले. कँडीमहाशय तेव्हा कोल्हापुरला परत आले होते. महाराजांनी कँडींच्या विरुद्ध तक्रार कधीच केली नाही. मात्र ' रे ' आणि कँडी यांची परस्पर जुंपेल अशी व्यवस्था केली. दोन साहेबांचे भांडण. आपण त्यात कशाला पडावे असा बहाणा महाराजांनी केला. ते जरा बाजूलाच राहिले. त्याचा परिणाम असा झाला की, ' रे ' साहेबांनी कँडीचा काटा मुंबईच्या राज्यपालाकडून परस्पर काढला."[११] सुंठीवाचून खोकला गेला.

पुढे कँडी आर्थिक अडचणीत सापडल्यामुळे महाराजांकडे मदतीसाठी आले. महाराजांनी त्यांची व्यवस्था केली. पाठीवर मारले तरी पोटावर मारावयाचे नाही, असा त्यांचा बाणा होता.

त्याच काळी मेहेरजीभाई नावाचे पारशी दिवाण होते. त्यांनी एकदा एजंटाकडे तक्रार केली की, महाराज आपल्या सल्ल्याप्रमाणे वागत नाहीत, आपल्या इच्छेप्रमाणे गोष्टी करतात. ते होते प्लेगचे दिवस. डॉक्टर पाहिजे म्हणून एजंटाने मेहेरजीभाईंना डॉ. देव यांचे नाव सुचविले. महाराज म्हणाले, ' जाहिरात देऊन अर्ज मागवा आणि मग निवड करा. ' अर्ज आले. त्यांतील एका पारशी डॉक्टराची दिवाणांनी निवड केली. दिवाण महाराजांविरुद्ध खोटी तक्रार करतो आणि आपलीच माणसे नोकरीस लावतो ह्याविषयी एजंटाची खात्री झाली. त्यांचे मन दिवाणांविषयी कलुषित झाले. त्याचा परिणाम दिवाणांची नोकरी जाण्यात झाला. दिवाणांना स्वतः न काढता महाराजांनी परस्पर त्याचा काटा काढून टाकला[१२] आणि नवीन दिवाण नेमण्यास महाराज मोकळे झाले.

ताईमहाराजांच्या दत्तक प्रकरणासंबंधी टिळक १८ ऑगस्ट १९०१ रोजी महाराजांना भेटले. बाळामहाराजांच्या दत्तक विधानास मंजुरी देऊ नका अशी त्यांनी महाराजांना विनंती केली. त्या वेळी वेदोक्त प्रकरणावर कोल्हापुरात चर्चा

११. लेखक व संग्राहक, बागल, माधवराव, राजर्षि छत्रपति श्रीशाहूमहाराज यांच्या आठवणी ( १९५० ), पृ. ३२–३३.

१२. लेखक व संग्राहक, बागल, माधवराव, राजर्षि छतपति श्रीशाहूमहाराज याच्या आठवणी (१९५०), पृ. ३१–३२.

चालली होती. महाराजांनी टिळकांचे म्हणणे ऐकून घेतले. त्याच वेळी ताई-महाराज कोल्हापुरात बाळामहाराजांचे दत्तकविधान उरकून घेत होत्या. दत्तक समारंभ संपेपर्यंत महाराजांनी टिळकांना चातुर्याने संभाषणात गुंतवून ठेवले. तिकडे दत्तकविधान समारंभ पारसुद्धा पडला.

महाराज म्हणत, " मागासलेल्या लोकांमध्ये शिक्षणप्रसार करण्यासाठी महत्प्रयास केले पाहिजे, ही गोष्ट प्रथम मी न्यायमूर्ती रानडे व गोपाळराव गोखले ह्यांच्यापासून शिकलो. " ब्राह्मण टीकाकारांच्या तोंडावर ही नावे फेकली, म्हणजे टीकेची धार कमी होते की काय, हे पाहाण्याची ही एक खुबी असावी. रानड्यांविषयी त्यांच्या मनात आदर वसत होता हे सत्यच आहे. तथापि, रानडे यांच्या इतिहासलेखनाविषयी त्यांचे मत चांगले नव्हते, असे दिसते. " काही जुन्या बखरीत मला असे आढळून आले की, ब्राह्मण इतिहासकारांनी खरी बाजू मांडली नाही व खुद्द रानड्यांचा इतिहासदेखील ह्या दोषापासून अलिप्त नसून त्यात ब्राह्मणांची बाजू उचलून धरली आहे. " असे त्यांनी आपले मत व्यक्त केले आहे.

. ४ .

' असंतोषः श्रियो मूलं । ' असंतोष हे सर्व भावी उत्कर्षाचे, प्रयत्नांचे, ऐश्वर्याचे, मोक्षाचे बीज आहे. यशप्राप्तीला असंतोष हे एक साधनच आहे. लोकमान्य टिळकांच्या जीवनाचे हे एक प्रमुख सूत्र होते. परंतु त्या काळच्या राष्ट्रीय शिक्षणाचा मुख्य हेतू जसा काहीसा राजकीय होता, तसेच हा असंतोष राजकीय ध्येयासाठी त्यांना प्रामुख्याने वापरावयाचा होता. छत्रपती शाहू महाराज असंतोष पसरवीत होते. परंतु त्याचे स्वरूप प्रामुख्याने नैतिक नि सामाजिक होते. तो असंतोष ब्राह्मण समाजाच्या विरुद्ध नव्हता. सर्वसामान्य समाजाच्या उन्नतीला प्रतिरोध करणाऱ्या त्यांच्या प्रवृत्तीविरुद्ध होता. मानवास आपल्या दैन्याची, अज्ञानाची, धर्मभोळेपणाची चीड येऊन त्याने अन्यायाचे मूळ उखडून टाकण्यासाठी असंतोष बाळगावा असा त्यांच्या शिकवणीचा आशय होता. त्या असंतोषाची मूळ प्रेरणा आत्मोद्धाराची होती. आपण कोण आहोत, आपल्या जीवनाचा अर्थ काय, माणसाचे ध्येय काय असावे हेच प्रश्न मनुष्याने स्वतःस विचारावे, असेच ते त्यांच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न करीत. ह्या सामाजिक जागृतीची शक्ती राजकीय सुधारणांच्या मागणीविरुद्ध उपयोगात कशी आणावी, ह्या दृष्टिकोणातून ब्रिटिश सरकार त्या सामाजिक असंतोषाकडे पाहात असे. त्या असंतोषाचा उपयोग राजकीय शक्तीविरूद्ध वापरून

आपले आसन स्थिर करण्याच्या कामी करावयाचा, हा त्यात हेतू असे सरकारचा.

टिळकांचा असंतोष हा प्रामुख्याने राजकीय म्हणून परिस्थितिजन्य आणि विशिष्ट कालमर्यादेपर्यंत शक्तिमान नि उपयुक्त ठरला. त्याचा प्रभाव केवळ आपल्या राष्ट्रावरच पडला असे नाही. त्याचा प्रभाव साम्राज्यशाहीच्या गुलामगिरीत पडलेल्या आशियातील लोकांवरही पडला होता, हे लक्षात ठेवले पाहिजे. ब्रिटिशांचा त्या दोन्ही असंतोषांकडे पाहण्याचा दृष्टिकोण स्वार्थी होता. छत्रपती शाहूंनी पसरविलेला असंतोष हा मूलगामी, सनातन नि माणुसकीवर्धक होता. आणि म्हणूनच मी त्यांना एक महान हेतूने प्रेरित झालेला अलौकिक राजपुरुष म्हणतो. छत्रपतींनी वैदिक धर्माला समतेचे अधिष्ठान देऊन हिंदुधर्माचा नि हिंदुसमाजाची पुनर्घटना करण्याचे ऐतिहासिक आवाहन केले, ह्यात त्यांच्या कामगिरीचे आणि कार्याचे महत्त्व दिसून येतेच. तथापि, मानवी मनात मानवी हक्कांसाठी नि मानवी समानतेसाठी जागृती व्हावी त्यासाठी असंतोष निर्माण व्हावा म्हणून त्यांनी केलेली सेवा अमोल आहे. मानवाला त्याचे मानवी हक्क मिळावे आणि त्याने त्यासाठी झगडावे, असे त्यांचे मानवतावादी ध्येय होते.

जे पुरुष आपल्या कालखंडातील सुधारणासंबंधीच्या समस्या मांडून त्या सोडविण्याचा प्रयत्न करतात ते इतिहास घडवितात, असे रशियन विचारवंत प्लेकनाव्ह यांनी " The Role of the Individual in History " या आपल्या प्रबंधात म्हटले आहे. इतिहास घडविणारे हे थोर पुरुष आपल्या कालखंडाच्या पुढील काळात डोकावून पाहातात व आपल्या काळातील समस्या ऐतिहासिक परिस्थितीप्रमाणे सोडविण्यासाठी जनतेशी संपर्क साधून झगडत असतात. या कामी त्यांची इच्छाशक्ती नि कळकळ ही इतरांपेक्षा प्रबलतर असतात.

छत्रपती शाहू महाराजांनी आपल्या राज्यात मानवी स्वातंत्र्याची घोषणा केली. त्यांनी पददलितांची गुलामगिरीतून मुक्तता केली. त्यांनी पुढील काळात उपयुक्त होतील अशा सुधारणा केल्या. त्यांनी सामाजिक समतेसाठी केलेला झगडा आणि दाखविलेली तळमळ आणि युरोपातील राष्ट्रांत कामगारांची राज्ये स्थापन होत आहेत, त्याकडे कामगारांनी पाहून त्यांनी आपल्या संघटना स्थापाव्या व येणारी राज्यसत्ता आपल्या नि सर्वसामान्यांच्या हाती घ्यावी अशी त्यांना दिलेली शिकवण ह्या सर्व गोष्टी लक्षात घेता त्यांचे स्थान इतिहास घडविणाऱ्या पुरुषांच्या मालिकेत आहे, असे म्हणणे योग्य होईल.

नवमहाराष्ट्र घडविण्यात अशा इतिहास घडविणाऱ्या थोर पुरुषांचा फार

मोठा भाग आहे. आधुनिक महाराष्ट्रातील समाजक्रांती ज्यांनी पुढे नेली, त्या चार समाजक्रांतिकारकांच्या मालिकेत छत्रपती शाहूमहाराज यांचा क्रमांक दुसरा आहे. पहिले महात्मा फुले, दुसरे छत्रपती शाहू, तिसरे स्वातंत्र्यवीर सावरकर व चवथे डॉ. बाबासाहेब आंबेडकर. लोकहितवादी, रानडे, आगरकर हे समाजसुधारक होते तरी प्रत्यक्ष जातिभेद मोडणे हे त्यांचे ध्येय नव्हते.

छत्रपतींची देशभक्ती म्हणजे त्यांच्या हृदयाचा विकास होय. त्यांची देशभक्ती म्हणजे त्यांच्या ठायी असलेल्या मानवसेवेचा विकास. भारतात काही चांगले राजे होऊन गेले. काही चांगले नेतेही होऊन गेले. भारतातील रत्नजडित सिंहासने काळाच्या उदरात गडप झाली. राजराजेश्वरांची राज्ये नकाशावरून, नाहीशी झाली. परंतु जे राजे राजर्षी झाले, त्यांचे नाव इतिहासात चिरंतन राहिले. लोकनेता असून राजर्षी असणारा आणि जनसागराच्या लाटेवर आरूढ होऊनही सतत राजवैभवात विलसणारा शाहू छत्रपतींसारखा राजर्षी दुर्मिळच.

लोकशाहीचा पाया भक्कमपणे भरणारा हा नवयुगातील राष्ट्रपुरुष होता. ज्ञानाची ज्योत सर्व महाराष्ट्रात पेटती ठेवणारा हा ज्ञानदीप आहे. अस्पृश्यतेचा काळिमा दूर करणारा हा छत्रपती होता. कामगार-राज्याचे स्वप्न पाहणारा हा लोकनेता होता. सहकारी तत्त्वाचा हा उद्‌गाता होता. सत्तेचा उपयोग लोकोद्धारासाठी करावयाचा असतो, हे तत्त्व कृतीत आणून दाखविणारा हा आदर्श राजपुरुष होता. "बोले तैसा चाले" ह्या वचनाची सत्यता पटविणारा हा वंदनीय नृपती होता. जेव्हा भारताच्या धार्मिक नि सामाजिक पुनर्घटनेचा इतिहास लिहिला जाईल, तेव्हा समाजाला मानवी समानतेचे नि राष्ट्रवादाला व्यापक तत्त्वाचे अधिष्ठान देणाऱ्या शाहू छत्रपतींच्या नावाचा व त्यांच्या ऐतिहासिक कामगिरीचा त्यात गौरवपर उल्लेख होईल, यात मुळीच संदेह नाही.

* * *

## लोकमान्य बाळ गंगाधर टिळक : जीवनपट

| | |
|---|---|
| १८५६, जुलै २३ | जन्म दिनांक; जन्मस्थळ रत्नागिरी. |
| १८६१ | प्राथमिक शिक्षणास आरंभ. |
| १८६२ | शिक्षण निरीक्षक माधवराव बर्वे यांच्याशी वडिलांचे खटके. |
| १८६४ | बाळची मुंज (मूळ नाव केशव). |
| १८६५ | वडिलांची पुण्यास बदली. |
| १८६६, जुलै २४ | आईचा मृत्यू. |
| १८७१ | सॉ–मिल कंपनीचे संचालक ऑर्थर क्राफर्ड ह्यांनी गंगाधरपंतांचे पैसे बुडविले. |
| १८७१ | विवाह. |
| १८७१, ऑगस्ट ३१ | गंगाधरपंतांचा मृत्यू. |
| १८७२ | मॅट्रिक परीक्षा उत्तीर्ण. |
| १८७६ | बी. ए. परीक्षा पहिल्या वर्गात उत्तीर्ण. |
| १८७९, मार्च ते मे | वासुदेव बळवंत फडके यांचे बंड. |
| १८८०, जानेवारी १ | न्यू इंग्लिश स्कूलची स्थापना. |
| १८८०, जुलै | एल्. एल्. बी. परीक्षा उत्तीर्ण. |
| १८८१, जानेवारी २ | ‘केसरी’ सुरू, संपादक–गो. ग. आगरकर. |
| १८८१, जानेवारी ४ | ‘मराठा’ सुरू, संपादक–बाळ गंगाधर टिळक. |
| १८८२, फेब्रुवारी ८ | केसरी–मराठ्यावर कोल्हापुरचे दिवाण माधवराव बर्वे यांची फिर्याद. |
| १८८२, मार्च १७ | विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचा मृत्यू. |
| १८८२, जुलै ७ | टिळक आगरकर यांनी बर्व्यांची माफी मागितली. |
| १८८२, जुलै १७ | टिळक आगरकर यांना चार महिन्यांची तुरुंगवासाची शिक्षा. |

| | |
|---|---|
| १८८२, ऑक्टोबर २६ | टिळक आगरकर यांची सुटका. |
| १८८३ | आबासाहेब, कागल संस्थानाधिपती व ' रीजंट ' कोल्हापूर, यांची न्यू इंग्लिश स्कूलला देणगी. |
| १८८४ | छत्रपती शाहू महाराज डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे अध्यक्ष. |
| १८८५, जानेवारी २ | फर्ग्युसन कॉलेजची स्थापना. |
| १८८६ | रखमाबाईचा खटला. |
| १८८७ | टिळक ' केसरी'चे संपादक. |
| १८८८ ते १८८९ | क्राफर्ड प्रकरण–टिळकांची पहिली राजकीय चळवळ. |
| १८९०, आक्टोबर | पंचहौद मिशन चहा–प्रकरण. |
| १८९०, डिसेंबर १५ | डेक्कन एज्युकेशन सोसायटीचा राजीनामा. |
| १८९०, डिसेंबर | काँग्रेसचा मंडप सामाजिक परिषदेसाठी देऊ नये असा पुण्यातील सनातनी मंडळींचा अर्ज टिळकांनी कलकत्ता काँग्रेसच्या अध्यक्षांना सादर केला. |
| १८९१, जून | कायद्याच्या शिक्षणाचा वर्ग सुरू केला. |
| १८९१ ते १८९२ | पंचहौद मिशन चहा–ग्रामण्य प्रकरण. |
| १८८९ ते १८९१ | समंती वयाचे विधेयकासंबंधी चर्चा. |
| १८९१ | नागपूर येथे सामाजिक परिषदेत टिळक रानडे खडाजंगी. |
| १८८९ ते १८९३ | पंडिता रमाबाईचे शारदासदन ह्या संबंधी वादविवाद. |
| १८९३ | हिंदू–मुसलमान दंगे. ' ओरायन ' ग्रंथ. |
| १८९७, सप्टेंबर १४ | पहिला राजकीय खटला व दीड वर्षाची कारावासाची शिक्षा. |
| १८९८, सप्टेंबर ६ | सुटका. टिळक महाराष्ट्राचे नेते. |
| १८९९, जानेवारी | सिलोनचा प्रवास. |
| १८९९, डिसेंबर | ' टाइम्सने ' टिळकांची क्षमा मागितली. |
| १९००, नोव्हेंबर | लंडनच्या ' ग्लोब ' पत्राने टिळकांची क्षमा मागितली |
| १९०१, जानेवारी | ब्रह्मदेशाचा प्रवास. |
| १९०१–२० | ताई महाराज दत्तक प्रकरण. |
| १९०१, ऑक्टोबर | वेदोक्त प्रकरण. |
| १९०३ | ' आर्क्‌टिक होम इन दि वेदाज ' ग्रंथ. |

| | |
|---|---|
| १९०५ | वंगभंगाची चळवळ. टिळक भारतीय नेते झाले. |
| १९०५, डिसेंबर | बनारस काँग्रेस. गो. कृ. गोखले अध्यक्ष. |
| १९०६ | कलकत्ता काँग्रेस. |
| १९०७ | सुरत येथे रणकंदन. काँग्रेस दुभंगली. |
| १९०८, जुलै २२ | काळे पाण्याची सहा वर्षे शिक्षा. मंडाले तुरुंगात. |
| १९१४, जून १६ | सुटका. |
| १९१५, जून | गीता-रहस्य ग्रंथ. |
| १९१५ | शास्त्री विधेयकास विरोध. |
| १९१६, एप्रिल २८ | होम रूल-लीगची बेळगांव येथे स्थापना. |
| १९१६, डिसेंबर | लखनौ काँग्रेस. |
| १९१८ | पटेल विधेयकास विरोध. |
| १९१८, सप्टेंबर २४ | चिरोल खटला लढविण्यासाठी लंडनला प्रयाण. |
| १९१९, फेब्रुवारी २१ | चिरोल खटला हरले. |
| १९१९, नोव्हेंबर १७ | मुंबईस परत आले. |
| १९१९, डिसेंबर | अमृतसर काँग्रेस. |
| १९२०, फेब्रुवारी ते मार्च | टिळकांच्या सभा उधळण्यात आल्या. |
| १९२०, ऑगस्ट १ | मुंबई येथे मृत्यू. |

* * *

## राजर्षी शाहूमहाराज : जीवनपट

| | |
|---|---|
| १८७४, जुलै २६ | जन्मदिनांक : जन्मस्थळ–कोल्हापुरातील लक्ष्मी विलास राजवाडा म्हणजे हल्लीचे ' सर्किट हाऊस. ' |
| १८८४, मार्च १७ | राज्यारोहण. |
| १८८६, मार्च २० | वडील आबासाहेब घाटगे ' रीजंट ' यांचा मृत्यू. |
| १८८६ ते १८८९ | राजकोट येथील राजकुमार कॉलेजमध्ये शिक्षण. |
| १८८८ | कोल्हापूर स्टेट रेल्वेच्या बांधकामास छत्रपती शाहूंच्या हस्ते विधिपूर्वक आरंभ. |
| १८८९ ते १८९३ | धारवाड येथे एस्. एम्. फ्रेजर यांच्या देखरेखीखाली अध्ययन. |
| १८९१, एप्रिल १ | विवाह. |
| १८९१, नोव्हेंबर | दक्षिण हिंदुस्थानचा प्रवास. |
| १८९२, ऑक्टोबर | सिंध, पजाब, दिल्ली प्रवास. |
| १८९४, एप्रिल २ | राज्यसूत्रे हाती घेतली. |
| १८९५, मार्च २८ | फर्ग्युसन कॉलेजच्या नव्या इमारतींचे उद्‌घाटन. |
| १८९७ | दुष्काळी कामे काढली. शेतकऱ्यांना तगाई, स्वस्त धान्याची दुकाने. |
| १९०० ते १९०५ | वेदोक्त प्रकरणाची चळवळ. |
| १९०२, मे ते ऑगस्ट | लंडनचा प्रवास. |
| १९०१ ते १९११ | मराठा, जैन, लिंगायत, मुसलमान, शिंपी, दैवज्ञ, अस्पृश्य, सारस्वत विद्यार्थ्यांसाठी वसतिगृहे. |
| १९०२, जुलै २६ | मागासलेल्या जातींना नोकरीत पन्नास टक्के जागा राखीव ठेवण्याची घोषणा. |
| १९०६, सप्टेंबर | शाहू मिल कोल्हापूर स्थापना. |
| १९०९ | लक्ष्मीबाई तलावाच्या कामास आरंभ. |

| | |
|---|---|
| १९११ | कोल्हापूर येथे सत्यशोधक समाजाची स्थापना. |
| १९१२ | कोल्हापुरात सहकारी कायदा मंजूर केला. |
| १९१२ | मराठ्यांच्या हस्ते वेदोक्त श्रावणी. राजपुत्रांच्या अध्ययनाची सोय करण्यासाठी लंडनला रवाना. |
| १९१२ | प्राथमिक शिक्षण सक्तीचे करण्याची घोषणा. |
| १९१३ | सत्यशोधक शाळेला वर्षासन. |
| १९१३ | पाटलांच्या मुलांना शिकविण्यासाठी 'पाटील शाळा' काढली. |
| १९१३ | जहागिरदारांच्या बाबतीत क्रांतिकारक ठराव केला. इनामे अविभाज्य. ती गहाण ठेवायची नाहीत. |
| १९१३ | १५१३ धार्मिक संस्कार आणि २२६ विवाह कोल्हापूर संस्थानात सत्यशोधकांनी पार पाडले. |
| १९१४ ते १९१६ | महायुद्धाचा काळ. सैनिकीकरण. लढाऊ वृत्ती जोपासली. |
| १९१७, जून १० | कोल्हापुरच्या शंकराचार्य पीठावर डॉ. कुर्तकोटी यांची स्थापना. |
| १९१७, जुलै | पुनर्विवाहाचा कायदा मंजूर केला. |
| १९१७, डिसेंबर २७ | खामगाव येथे 'अकराव्या मराठा शिक्षण परिषदेचे' अध्यक्ष. |
| १९१८, फेब्रुवारी | आंतरजातीय विवाह कायदा मंजूर. |
| १९१८, फेब्रुवारी २३ | कुळकर्णी वतने बंद. तलाठी पद्धत सुरू. |
| मार्च ३ | बलुतेपद्धत बंद. |
| जून २५ | महारकी बंद. |
| ऑगस्ट ३१ | गुन्हेगारी बंद. |
| सप्टेंबर १५ | डॉ. कुर्तकोटींचा शंकराचार्य पीठाचा राजीनामा. |
| १९१८, नोव्हेंबर १० | लोकहितवादी सी. के. बोले यांच्या (पीपल्स युनियन) 'लोकसंघा'च्या विद्यमाने विद्येत मागासलेल्या वर्गांतील लोकांची जाहीर सभा. |
| १९१८, नोव्हेंबर २४ | कित्ता— |
| १९१८, डिसेंबर १४ | नवसारी येथे 'आर्यधर्म परिषदे'चे अध्यक्ष. |

| | |
|---|---|
| १९१९, एप्रिल १९ ते २१ | कानपूर येथे 'हिंदुस्थानातील सर्व कुर्मी क्षत्रियांच्या तेराव्या परिषदे 'चे अध्यक्ष. |
| १९१९, जुलै ते नोव्हेंबर | प्रकृती बिघडली. |
| १९२०, मार्च ६ ते ८ | भावनगर येथे ' आर्यधर्म परिषदे 'चे अध्यक्ष. |
| १९२०, मार्च २२ | माणगांव येथे ' अस्पृश्य वर्गाच्या परिषदे ' पुढे भाषण. डॉ. आंबेडकरांचा गौरव. |
| एप्रिल १५ | नाशीक येथे श्री उदाजी मराठा विद्या वसतिगृहाची कोनशिला बसविण्याचा समारंभ. |
| एप्रिल १६ | नाशीक येथे ' निराश्रित सोमवंशीय समाजाच्या ' सभेत भाषण. |
| १९२०, मे ३० | नागपूर येथे 'अखिल भारतीय बहिष्कृत समाज-परिषदे'चे अध्यक्ष. |
| जुलै ६ | शिवाजी-क्षत्रिय-वैदिक पाठशाळेची स्थापना. |
| १९२०, जुलै २७ | हुबळी येथे ' कर्नाटक ब्राह्मणेतर सामाजिक परिषदे ' चे अध्यक्ष. |
| १९२०, ऑक्टोबर ३ | पुणे येथील भवानी पेठेतील शाहूंची सभा उधळली गेली. |
| १९२१, जानेवारी | क्षात्र जगद्गुरूंची स्थापना. |
| १९२२, फेब्रुवारी १६ | दिल्ली येथे ' अखिल भारतीय अस्पृश्य परिषदे ' चे अध्यक्ष. |
| १९२२, मे ६ | मुंबई येथे मृत्यू. |

* * *



ज्ञानाची पाणपोई सर्वांना मोकळी व्हावी यासाठी ज्ञानेश्वरांपासून मांडलेल्या कार्यातला शाहू महाराज हा एक फार मोठा दुवा होता हे सदैव दृष्टीआड झाले. योगायोगाने ते राजकुळात जन्माला आले. एरवी फुले, आगरकर आणि शाहू महाराज ह्याच्यांत कोणताही फरक नाही. जन्मजात उच्चनीचतेविरुद्ध चाललेल्या लढ्यातला हा केवढा मोठा वीरपुरुष. त्यांना ब्राह्मणद्वेष्टे म्हणणे हा पहिला अन्याय...

त्या राजाच्या अंतरंगाचे श्री. कीरांनी किती सुंदर दर्शन घडविले आहे. 'वेदांचा तो अर्थ आम्हांसीच व्हावा येरांनी वहावा भार माथा ' म्हणणाऱ्या तुकोबाचा हा वारस. आजच्या पिढीला ह्या महापुरुषाचे यथार्थ दर्शन घडविण्याचे कार्य ह्या छोट्याशा पुस्तकाने घडले आहे. मतभेदाचे दर्शन देखील किती सुसंस्कृतपणाने घडविता येते, याचा श्री. कीरांनी आपल्या व्याख्यानांतून आदर्श घालून दिला आहे.

—पु. ल. देशपांडे.

सुप्रसिद्ध चरित्र–लेखक श्री. धनंजय कीर यांची कोल्हापूरच्या शिवाजी विद्यापीठात प्रभावी व माहितीपूर्ण अशी तीन व्याख्याने झाली......श्री. धनंजयराव कीर यांनी शाहू महाराजांना व त्यांच्या थोर राष्ट्रकार्याला योग्य न्याय देण्याचा प्रयत्न केला आहे... श्री. कीर यांनी एक मोठे राष्ट्रीय कार्य केले, असे आम्ही मानतो आणि त्याबद्दल श्री. धनंजय कीर यांचे मनःपूर्वक अभिनंदन करतो.

—' सत्यवादी ' अग्रलेख.

श्री. कीर यांची लेखनपद्धती आणि भाषणपद्धती अशी आहे की ते भरभक्कम पुराव्याशिवाय लिहीत किंवा बोलत नाहीत.. त्यांचे विवेचन चिकित्सक स्वरूपाचे असते. कोल्हापूरचे छत्रपती शाहू महाराज यांच्याविषयी दिलेल्या ह्या तीन व्याख्यानांत त्यांच्या विद्वत्तेचा व सुबोध नि निर्भय विवेचनाचा पुन्हा प्रत्यय येतो.

—' समानता ' अग्रलेख.

श्री. धनंजय कीर यांनी शाहू छत्रपतींच्या तेजस्वी नि उद्बोधक अशा जीवनाची पराक्रमी गाथा तीन व्याख्यानांत सूत्ररूपाने सादर केली आहे.

द. म. सुतार—' मराठा '